# अनुक्रमणिका

॥ अल्लाह, असीम दयावंत व अत्यंत कृपावंतच्या नावाने ॥

# प्रस्तावना

पवित्र कुरआन या पृथ्वीतलावर अल्लाहकडून आलेली सर्वांत महान देणगी आहे. दासांच्या दृष्टीने पवित्र कुरआन त्यांची सर्वांत मोठी गरज आहे. मनुष्य पवित्र कुरआनपासून अपरिचित असेल तर मानवी कल्याण एक निरर्थक शब्द ठरतो. त्या सत्यांची सर्वप्रथम स्पष्ट निकड अशी आहे की मानवजातीच्या प्रत्येक सदस्याला या ग्रंथाचा परिचय व्हावा आणि जे लोक याने परिचित नसतील त्यांना याने परिचित केले जावे. हा परिचय करून देण्याचा प्रयत्न केवळ पवित्र कुरआन लोकांच्या हातात देऊन त्यांना त्याचा अभ्यास करावयास सांगणे आणि जेव्हा ते, मान्य करतील तेव्हा पवित्र कुरआनचा अर्थ समजून घेण्यासाठी त्यांना सहाय्य केले जावे. परंतु जर आपण मानसशास्त्रीय परीक्षण व सखोल दृष्टीचा अवलंब केला तर आपल्याला कल्पना येईल की या महान धार्मिक कर्तव्याच्या पूर्ततेसाठी यापूर्वीदेखील बरेच काही केले जाणे आवश्यक आहे, कारण पवित्र कुरआन अल्लाहचा ग्रंथ आहे, काही मानवी लिखाण नाही. म्हणून याच्या अध्ययनाचा प्रश्नदेखील काही साधा प्रश्न नाही तर एक विशिष्ठ स्वरूप असणारा प्रश्न आहे. एखाद्या मानवी लिखाणाला केवळ एक लिखाण म्हणून पाहिले व वाचले जाते. परंतु ज्या ग्रंथाचा 'ईशग्रंथ' असल्याबद्दल दावा आहे त्याचे वाचन करण्यापूर्वी साधारणपणे काही प्रश्न डोक्यात येणे स्वाभाविक आहे. उदाहरणार्थ असे की काय हा ग्रंथ खरोखर ईशलिखाण व आकाशातून उतरलेला ग्रंथ आहे? काय तो ग्रंथ त्याच मूळ स्वरूपात अद्याप सुरक्षित आहे की ज्या स्वरूपात तो आणणाऱ्या पैगंबराने (प्रेषिताने) जगासमोर प्रस्तुत केला होता? त्याच्या अवतरणाचा, त्याची पध्दत व त्याचे संकलन आणि त्याची सुरक्षा व त्याची प्रसिध्दी व प्रसारणाचा इतिहास काय आहे? हे स्पष्ट आहे की कुरआनच्या बाबतीत महत्त्वाच्या प्रश्नांची उत्तरे मिळत नाहीत तोपर्यंत कोणत्याही अशा व्यक्तीमध्ये त्याच्या अध्ययनाची गरज व महत्त्वाची खरी भावना मोठया मुष्किलीने निर्माण होऊ शकते की ज्यांची त्यावर पैतृक धार्मिक श्रध्दा नसते.

खरे तर हे पुस्तक हीच गरज पूर्ण करण्यासाठी लिहिले गेले आहे. मागे याशिवाय अन्य कोणताही उद्देश नाही की लोकांनी पवित्र कुरआनच्या अभ्यासाचे महत्त्व जाणून घ्यावे आणि मग त्याचा हक्क अदा करण्याचा प्रयत्न करावा. हे पुस्तक मुस्लिमापेक्षा अधिक मुस्लिमेतरांना डोळ्यांसमोर ठेऊन लिहिले गेले आहे. म्हणूनच यात काही तपशील व चर्चा आहेत ज्या कदाचित मुस्लिम वाचकांना इतक्या आवश्यक नाहीत. परंतु

मुस्लिमेतरासाठी त्या अत्यंत आवश्यक होत्या म्हणूनचे त्यांच्याकडे डोळेझांक करणे योग्य ठरले नसते.

असा विचार होता की सदर पुस्तकात आणखी एक भाग 'पवित्र कुरआनच्या मौलिक शिकवणींचासुध्दा समावेश करावा. परंतु दोन कारणास्तव हा विचार सोडून द्यावा लागला. एक तर असा की केवळ 'मौलिक शिकवणी'च्या परिचयाने पवित्र कुरआनच्या सर्व शिकवणी समजून घेणे अशक्य तर होईलच परंतु त्याचबरोबर काही चुकीच्या धारणासुध्दा होण्याची शक्यता होती. दुसरे कारण असे की 'पवित्र कुरआनच्या शिकवणी' या विषयावर तपशीलाने लिहावयाची आणि एका संपूर्ण पुस्तकाची रचना करण्याची इच्छा आहे. जो एकाप्रकारे या पुस्तकाचा दुसरा भाग असेल. पाहू या, महान अल्लाह ही इच्छा प्रत्यक्षात आणण्याची केव्हां सुबुध्दी व सवड प्रदान करतो. जोपर्यंत असे घडत नाही तोपर्यंत समोरच्या उद्देशाची अंशत: पूर्तता माझे एक अन्य पुस्तक 'इस्लाम एक नजर में' (खरा तो एकचि धर्म) च्या अध्ययनाने होऊ शकेल. म्हणून जे सज्जन पवित्र कुरआनच्या या परिचयानंतर हेही जाणू इच्छित असतील की त्याने कोणता धर्म प्रस्तुत केला आहे तर त्यांच्यासाठी हे पुस्तक लाभदायी सिध्द होईल.

महान अल्लाह जवळ प्रार्थना आहे की ज्या उद्देशाने हे पुस्तक लिहिले गेले आहे तो पूर्ण होवो व त्याने याला आपल्या दासात आपल्या ग्रंथाच्या अध्ययनाचे महत्त्व व आवश्कतेची जाणीव निर्माण करण्याचे साधन बनवावे.

तथास्तु.

**सदरुद्दीन इस्लाही**

शुक्रवार दिनांक १५ जिलहज्जह १३८२ हिजरी

# पवित्र कुरआनची प्रतिष्ठा

## सृष्टिकर्त्याचे अस्तित्व व त्याच्या मार्गदर्शनाचे लाभ

मनुष्य सदैव अशा एका महानतम शक्तीबद्दल अनुभूति व विश्वास ठेवीत आला आहे की जी या संपूर्ण सृष्टीची निर्माती व स्वामी आहे. वर्तमान काळातील साम्यवादी भौतिकतेचे पूजक आणि काही अदूरदर्शी तत्त्वज्ञ आणि त्यांचे अंधानुकरण करणाऱ्या अनुयायींचा अपवाद सोडला तर या सत्याचा इन्कार इतिहासात क्वचितच आढळेल. ही विश्वव्यापी अनुभूति व विश्वास यामुळे मनुष्यासमोर आपल्या निर्मात्या व स्वामीविषयी काही प्रश्न येतात. या महानतम शक्तीशी आमच्या संबंधाचे काय स्वरूप आहे? काय तिची निर्माण शक्ती व स्वामित्व आमच्याकडून एखाद्या विशिष्ठ प्रकारच्या विचारसरणी व कृतीची अपेक्षा करते? जर असे करीत असेल तर कोणत्या विचारसरणी व कृतीची? या प्रश्नांनी शक्तिशाली उचल खाल्ली की त्यामुळे मनुष्य त्यांच्याकडून आपले कान बंद ठेऊ शकला नाही. आणि मग त्याच्या बुद्धी व प्रवृत्तीने त्यांचे जे उत्तर दिले ते असे होते की 'तुम्ही एक जबाबदार निर्मिती आहात कारण निर्मात्याने तुम्हाला समज व ज्ञानाच्या एका विशिष्ठ व श्रेष्ठ गुणाची देणगी प्रदान केली आहे. वाईट व चांगल्यात फरक करण्याची पारख तुम्हाला दिली आहे. कृती व अधिकाराचे स्वातंत्र्य प्रदान केले आहे. म्हणून निर्जीव जड पदार्थ व जनावरापेक्षा तुमची स्थिती मुळातच भिन्न आहे. हे विशिष्ठ गुण व शक्तीचे तुमच्यात अस्तित्व असणे या गोष्टीचे स्पष्ट प्रमाण आहे की तुमचा निर्माता तुम्हाला एखाद्या विशिष्ठ कार्यप्रणालीचे अनुसरण करताना पाहू इच्छितो. तुम्हाला तुमच्या इच्छेप्रमाणे वागण्याचे जरी पूर्ण स्वातंत्र्य असले तरी या स्वातंत्र्याचा योग्य प्रयोग असा नव्हे की तुम्ही निर्बुध्द जनावराप्रमाणे मनात येईल तसे करीत जावे. केवळ तेच काही करा जे तुम्ही मनुष्य असल्याच्या प्रतिष्ठेला साजेसे, योग्य असेल आणि ज्याला खुद्द तुमच्या निर्मात्या व स्वामीकडून योग्य असल्याचे प्रमाणपत्र मिळालेले असेल.'

बुध्दी व प्रवृत्तीच्या या उत्तराने नैसर्गिकरित्या माणसाला या गोष्टीची गरजवंत ठरविले की 'बरोबर' व 'चूक' दोन्ही अनिवार्यपणे त्याच्यासमोर पूर्णत: स्पष्ट असतील. जीवनाच्या विस्तीर्ण क्षेत्रात पावलो पावली त्याला हे खात्रीने माहीत असेल की कोणत्या दिशेत जाणे त्याच्या खऱ्या स्वामीच्या दृष्टीने बरोबर व पसंत पडणारे आहे आणि कोणीकडे जाणे चुकीचे व नापसंत आहे? स्वाभाविकपणे हा प्रश्न उपस्थित होतो की मनुष्याची सर्वांत महत्त्वाची व सर्वांत खरी गरज कशी पूर्ण व्हावी? त्याला 'दुरुस्त' व 'नादुरुस्त', 'बरोबर' आणि 'चूक' 'पसंत' व 'नापसंत' हे ज्ञान, स्पष्ट व पूर्ण ज्ञान

कोठून व कोणाकडून मिळेल? त्याच्या स्वत:च्या सामर्थ्यांचा बलावर, त्याची ही गरज कशा ही प्रकारे पूर्ण होईल असे दिसत नाही. या बाबतीत तर त्याच्या प्रकृतीने कसलीही मदत केली नाही, ती तर बिचारी हा प्रश्नच समजू शकली नाही. त्याची रसिकता व त्याची बुध्दी उपयुक्त ठरली नाही. त्याची त्यांनीही काही अंतरापर्यंत चालल्यावर आपल्या विवशतेची घोषणा करून टाकली. याचा अर्थ असा होता की या आकाशाखाली अशी कोणतीही शक्ती नाही की जी प्रश्नाची सोडवणूक करू शकेल. कोणतेही ज्ञानाचे साधन नाही की ज्याकडून या प्रश्नाचे खरे उत्तर मिळू शकेल. ही वास्तविकता स्वत:च साक्ष की या प्रश्नाची सोडवणूक व या प्रश्नाचे खरे उत्तर आकाशाखाली नाही तर त्याच्या वरच मिळू शकते. अशा स्थितीत त्या निर्मात्या व पालनकर्त्याला मनुष्याच्या भौतिक गरजा उपलब्ध करून देण्यासाठी एवढा मोठा कारखाना स्थापित केला आहे. त्याने यासंबंधीच्या आवश्यक शक्ती व जन्मजात मार्गदर्शनाने त्याला पूर्णपणे सज्ज ठेवले आहे. त्याला निर्माणच मुळी या मार्गदर्शनासह करतो की त्याने आपले जीवन कशाप्रकारे जगावे आणि त्यासाठी आपल्या आईच्या स्तनातून कशाप्रकारे दूध प्राशन करावे. अशा विवेकी व बुध्दिमान आणि अशा दयाळू व कृपाळू निर्माणकर्त्या व पालनकर्त्याला हे कसे शक्य होते की त्याने त्याच्या या सर्वांत मोठया प्रश्नाची उकल त्याला प्रदान करू नये? आणि त्याच्या या सर्वांत महत्त्वाच्या गरजेकडे कानाडोळा करावा? निश्चितच हे पालनकर्त्याच्या वैभवशाली गुणाला शोभनीय नव्हते. त्याची बुध्दिमत्ता, त्याची कृपाशीलता, त्याची दया, त्याचा न्याय. तात्पर्य असा की त्याचा एक-एक गुण या गोष्टीला अशक्य ठरवीत होता. म्हणून जग ईशमार्गदर्शन व ईशग्रंथाच्या अस्तित्वापासून कधीही रिक्त राहिले नाही हे याच सत्याचे द्योतक आहे.

# पवित्र कुरआन ईशग्रंथ असल्याबद्दल पुरावा

अवतरित मार्गदर्शनाच्या स्वरुपात जगात जे ग्रंथ अस्तित्वात आहेत, त्यापैकी एक पवित्र कुरआनदेखील आहे. ऐतिहासिकदृष्ट्या हा अंतिम ईश ग्रंथ व सर्वांत अंतिम मार्गदर्शन-पत्र आहे. पुढील ओळीत याच ईशग्रंथाचा सविस्तर परिचय करून देणे हा उद्देश दृष्टीसमोर आहे.

परंतु हा परिचय करून देण्यापूर्वी आवश्यकता आहे की खुद्द या ग्रंथाचे वास्तविक स्थान व तो ईशग्रंथ असल्याबद्दल पुरावा प्राप्त व्हावा. जर एखाद्या ग्रंथाबद्दल असा दावा केला जातो की तो अवतरित ग्रंथ आहे तेव्हा तर एवढ्याने हे कोणत्याही प्रकारे आवश्यक ठरत नाही की तो खरोखर अवतरित ग्रंथ आहे असा विश्वास केला जावा. जसे खऱ्या गोष्टींचे दावे केले जातात, तसे खोट्या गोष्टींचेसुध्दा केले जातात. म्हणून धर्मांच्या इतिहासात अशा उदाहरणांची उणीव नाही की ज्याप्रकारे प्रेषितत्व व वह्य (ईशसंदेश) अवतरणाचे खोटे दावेदार जन्मले त्याचप्रकारे कित्येक धार्मिक संतांना ईश्वराचे प्रेषितच नव्हे तर ईश्वरच बनवून टाकले गेले. आणि त्यांची वचने ईशवचने ठरविली गेली. वास्तविक त्यांनी कधीही आपण प्रेषित असल्याचा दावा केला नव्हता आणि आपल्या वचनांना ईशवचने ही ठरविले नव्हते. इतिहासातील या वास्तविकतांच्या उपस्थितीत पवित्र कुरआनच्या बाबतीतसुध्दा असा प्रश्न उद्‌भवणे क्रम प्राप्त आहे की अखेर हा ग्रंथ ईशग्रंथ असल्याबद्दल काय पुरावा आहे? पवित्र कुरआनचा सर्वांत मौलिक परिचयदेखील हाच आहे की हा ग्रंथ ईशग्रंथ आहे हे निर्विवाद सत्य लोकासमोर स्पष्ट व्हावे.

पवित्र कुरआन ईशग्रंथ असल्याबद्दल काही विशिष्ठ पुरावे खालीलप्रमाणे आहेत.

**(१) पहिले प्रमाण -** या गोष्टीचा प्राथमिक आवश्यक पुरावा तर हा आहे की खुद्द पवित्र कुरआनचे हे आपले स्पष्ट कथन आहे, केवळ हा त्याला मानणाऱ्यांचा दावा नव्हे. त्याने ही गोष्ट वारंवार स्पष्ट केली आहे की मी एखाद्या मनुष्याचे वचन अथवा कथन नाही तर जगाच्या पालनकर्त्या अल्लाहची वाणी आहे की जिला त्याने आपल्या विशेष फरिश्ते (देवदूत) जिब्रईल (अ.) यांच्यातर्फे आपल्या दास प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यापर्यंत पोचविले. उदाहरणार्थ -

*'यात कांही शंका नाही की हा (पवित्र कुरआन) जगाच्या पालनकर्त्याकडून उतरविला आहे. त्याला प्रामाणिक फरिश्त्याने (देवदूताने) (हे मुहम्मद (स.) तुमच्या हृदयावर उतरविले आहे, जेणेकरून (तुम्ही लोकांना परलोकातील प्रकोप) पासून खबरदार (सावध) करणारे बनावे, स्पष्ट व स्वच्छ अरबी भाषेत.'* (सुरतुश्शुअरा-१९२-१९५)

निस्संशय पवित्र कुरआनचे स्वत:संबंधी असे कथन करणे की मी अल्लाहचा ग्रंथ

आहे, एक दावाच आहे. आणि यावरून हा अल्लाहचा ग्रंथ असल्याचे सिध्द होत नाही, परंतु असे असूनदेखील या कथनाचा दर्जा, जसे की सांगितले गेले आहे, 'प्राथमिक आवश्यक पुरावा म्हणूनदेखील आहे कारण याच्याशिवाय पुरावा व प्रमाणाची चर्चा पुढे चालूच शकत नाही, इतकेच नव्हे तर असे म्हणा की सुरूच होऊ शकत नाही. आणि हे अशासाठी की हेच कथन ती गोष्ट आहे जी पवित्र कुरआनच्या बाबतीत ईशग्रंथ असण्याच्या दाव्याला नियमित व लक्षणीय बनविते आणि या गोष्टीच्या आधारेच हा दावा विचारणीय व चर्चेस पात्र ठरतो. याची दोन अत्यंत महत्त्वाची व सैध्दांतिक कारणे आहेत.

एक तर असे की महान अल्लाहकडून येणारा ग्रंथ काही असे सामान्य अर्थाचे पुस्तक व लिखाण असत नाही की त्याच्याशी सहमती अथवा विरोध व्यक्त करण्यास लोक स्वतंत्र असतील, ते मुळातच त्याचे पठन करण्यासदेखील सज्ज नसतात, इतकेच नव्हे तर सृष्टीच्या बादशाहकडून जारी केलेला हा फर्मान आहे, त्याच्यासमोर नतमस्तक व्हावे त्याची कसलेही आढेवेढे न घेता अंमलबजावणी अनिवार्यपणे करावी, नाही तर मनुष्यासाठी विनाशच विनाश असेल. हे स्पष्ट आहे की ज्या ग्रंथाचा उद्देश, महत्त्व व प्रतिष्ठा अशी हे तर मग हे अगदी अटळ आहे की त्याने स्वत: आपल्या जिभेने आपल्या या स्थितीची स्वच्छ व स्पष्ट शब्दांत घोषणा करावी. त्याशिवाय तो सैध्दान्तिक रूपाने यास कदापि पात्र ठरणार नाही की लोकांनी त्याचे अनिवार्यपणे पठन करावे. त्याच्या स्थितीची अवश्य चर्चा केली जावी, त्याच्या बाबतीत या गोष्टीची कोणत्याही परिस्थितीत चौकशी करावी की तो ईशग्रंथ आहे किंवा नाही? आणि मग त्याला आपल्या खऱ्या स्वामीची आज्ञा व आकाशातून आलेले मार्गदर्शन-पत्र असल्याचे मान्य करून त्याचे अनुसरण करावे. अगदी त्याचप्रकारे ज्याप्रकारे राज्यशासन आपले कायदे गॅझेट (राज पत्र) मध्ये प्रकाशित करून या गोष्टीची नियमानुसार घोषणा करतात की देशातील जनतेसाठी हे कायदे बनविले गेले आहेत आणि जोपर्यंत राज्ये असे करीत नाहीत तोपर्यंत जनतेवर या कायद्यांच्या बाबतीत कसलीही जबाबदारी टाकली जात नाही.

दुसरे असे की कोणत्याही ग्रंथाचा ईशग्रंथ असल्याचा दावा वास्तविक: त्याचा स्वत:चा (अथवा त्याला आणणाऱ्या पैगंबराचा) दावा असतो, त्यांचे अनुसरण करणाऱ्या लोकांचा नव्हे. त्याचे अनुसरण करणारे तर हा दावा मान्य करीतच असतात. म्हणून त्यांचे असे म्हणणे की हा ग्रंथ एक ईशग्रंथ आहे केवळ या दाव्याची एक साक्ष असू शकते, मूळ दावा नव्हे आणि कोणत्याही साक्षीचा प्रश्न त्याच वेळी उद्‌भवू शकतो की जेव्हा एखादा कायदेशीर दावा समोर आलेला असेल. त्याशिवाय साक्ष अगदी अकाळी अनावश्यक व लक्ष न देण्याजोगी असेल कारण हे अगदीच शक्य आहे की साक्ष एखाद्या अशा दाव्याची दिली जात असावी की ज्याचे वास्तविकत: अस्तित्वच असू नये आणि

एखाद्या अशा व्यक्तीला अल्लाहचा पैगंबर (प्रेषित) आणि एखाद्या अशा ग्रंथाला अल्लाहचा ग्रंथ असल्याबद्दल साक्ष दिली जात असावी की ज्याने स्वत: अशा प्रकारचा कोणताही दावा कदापि केलेला नसेल, धर्मांच्या इतिहासाची पुस्तके चाळली तर असे लक्षात येईल की या शक्यतेला लोकांच्या अनावश्यक श्रध्देने वारंवार वास्तविकता बनविण्याचा प्रयत्न केलेला आहे. ग्रंथात एक वाक्यदेखील असे नाही की ज्यात असा दावा केलेला असेल की मी आकाशातून अवतरित ग्रंथ आहे. परंतु लोकांनी खुद्द आपल्याकडून हा दावा केला आणि एका मानवी वचनाला वह्य (ईशसंदेश) व ईशआदेश बनवून टाकले.

याच कारणास्तव हे आवश्यक ठरते की पवित्र कुरआन ईशग्रंथ असल्याच्या विवादाच्या बाबतीत असे पाहिले जावे की तो आपल्यासंबंधी स्वत: आपल्या जिभेने या गोष्टीचा स्पष्ट दावा करतो की नाही? जर करीत असेल तर ही चर्चा पुढे नेण्यायोग्य व चिंतन आणि संशोधनास पात्र आहे असे समजण्यात यावे अन्यथा नाही. म्हणून पवित्र कुरआनचे स्वत:चे हे स्पष्ट कथन, की मी महान अल्लाहकडून अवतरित ग्रंथ आहे. हे मोठ्या मौलिक महत्त्वाचे आहे आणि त्याची स्थितीदेखील एकप्रकारे पुराव्याची बनते.

**(२) दुसरे प्रमाण** - पवित्र कुरआनच्या व त्याला प्रस्तुत करणाऱ्या प्रेषित (स.) यांच्या आगमनाचा उल्लेख व घोषणा पूर्वी अवतरित ग्रंथ (तौरात व बायबल (इंजील)) मध्ये अगोदरच 'शुभ-सूचना' म्हणून झालेली होती आणि हा अगदी त्याच गुण व चिन्हासह जगात प्रकट झाला की ज्यांचा उल्लेख त्या ग्रंथात केला गेला होता. म्हणून त्याने या शुभसूचनेला वारंवार एक उघड पुरावा म्हणून प्रस्तुत केले आहे.

*'हा पवित्र कुरआन काही - रचलेली (आणि मानवी) वाणी नव्हे तर (अल्लाहची वाणी आहे आणि) आपल्यासमोर उपलब्ध असलेल्या आकाशातून पूर्वी उतरलेल्या ग्रंथांच्या भविष्यवाणीप्रमाणे आहे.'* (सूरह युसूफ - १११)

*'जे या निरक्षर रसूल (स.) व नबी (स.) यांचे अनुसरण अवलंबितील, ज्याचा उल्लेख त्यांना आपल्या तौरात व इंजीलमध्ये लिहिलेला आढळत आहे.'*

(सुरतुल अअराफ - १५७)

तौरात व इंजील (बायबल) मध्ये ही शुभ-सूचना अथवा भविष्यवाणी कोठे-कोठे आणि कोणत्या शब्दांत केली होती? या प्रश्नाचे बरोबर व पूर्ण उत्तर त्याचवेळी मिळणे शक्य होते जेव्हा हे ग्रंथ आजसुध्दा आपल्या खऱ्या रूपात अस्तित्वात असते, आणि त्यात कसलेही न्यूनाधिक व परिवर्तन झाले नसते. परंतु ऐतिहासिकदृष्ट्या हे एक इन्कार न करण्याजोगे सत्य आहे की हे ग्रंथ अगदी त्याच शब्दांत व वाक्यात आता सुरक्षित व शिल्लक राहिलेले नाहीत ज्यात ते अल्लाहकडून उतरले होते. त्यांच्या ध्वजवाहकांनी

त्यात भरपूर फेरबदल केलेला आहे. अशा स्थितीत स्पष्ट आहे की त्या भविष्यवाणी व शुभ-सूचनादेखील आपल्या मूळ स्वरूपात शिल्लक राहू शकत नव्हत्या ज्या पवित्र कुरआन व कुरआन प्राप्त करणाऱ्या प्रेषित (स.) यांच्या संबंधाने त्या ग्रंथात अवतरल्या होत्या. विशेषत: ही वास्तविकता डोळ्यांसमोर ठेऊन तर हे कदापि अपेक्षित नाही की या ग्रंथाला मानणाऱ्यांना पवित्र कुरआन व मुहम्मद (स.) यांची पैगंबरी (प्रेषितत्व)च्या बाबतीतील सत्य कोणत्याही परिस्थितीत सहन होणारी गोष्ट असावी. परंतु हे सर्व असूनदेखील त्या ग्रंथात आजदेखील अशी वाक्ये विपुल प्रमाणात आहेत की ज्यात एका विशिष्ट प्रकारच्या ग्रंथाबद्दल एका विशिष्ट वैभवाच्या पैगंबराच्या आगमनाबद्दल स्पष्ट भविष्यवाणी आढळतात. आणि या भविष्यवाणी जर कोणाला लागू होत असतील तर ते पवित्र कुरआन व प्रेषित मुहम्मद (स.) हेच होत. उदाहरण म्हणून खालील काही वाक्ये पाहा -

**१)** 'ईश्वर सीनाहून आला व शईरहून त्यांच्यावर प्रकट झाला. त्याने फारान पर्वतावरून दर्शन दिले आणि लक्षावधी पवित्र जनामधून आला, त्याच्या उजव्या हातावर त्यांच्यासाठी आतशीं (अग्निपूर्ण) धर्म-कायदा होता.' *(बायबल, इस्तिस्ना अध्याय - २२)*

**२)** 'मी त्यांच्यासाठी त्यांच्याच भावापैकी तुझ्यासारखा एक पैगंबर (प्रेषित) उभा करीन आणि आपली वाणी त्याच्या तोंडी घालीन. आणि जो कोणी ....माझ्या या गोष्टी, की ज्या तो माझे नाव घेऊन सांगेल, ऐकणार नाही तर मी त्यांचा हिशेब त्याच्याकडून घेईन.'

*(बायबल, इस्तिस्ना अध्याय १८, आयती १८-१९)*

**३)** 'यसूअने त्यांना सांगितले 'काय तुम्ही पवित्र ग्रंथात कधी वाचले नाही की जो दगड गवंड्यांनी रद्द केला होता तोच कोपऱ्याच्या टोकाचा दगड बनला. हे प्रभुकडून घडले आणि आमच्या दृष्टीने आश्चर्यकारक आहे, म्हणून मी तुम्हाला सांगतो की प्रभुची बादशाही तुमच्याकडून घेतली जाईल आणि त्या जातीला, की जी त्याचे फळ आणील, दिली जाईल. आणि जो या दगडावर पडेल तुकडे तुकडे होईल, परंतु ज्याच्यावर तो पडेल त्याचा चक्काचूर करून टाकील.'

*(मत्ताचे बायबल-भाग २१, आयती ४२ ते ४४)*

**४)** 'मला तुम्हाला आणखी बऱ्याचशा गोष्टी सांगावयाच्या आहेत, पण आता तुम्ही त्या सहन करू शकत नाही. परंतु जेव्हा तो म्हणजे सत्याचा आत्मा येईल तेव्हा तुम्हाला सर्व सत्याचे मार्ग दाखवील. ते अशासाठी की तो स्वत:तर्फे सांगणार नाही, परंतु जे काही ऐकेल तेच तो सांगेल आणि तुम्हाला भविष्यातील वार्ता देईल.'

*(यूहन्नाचे बायबल, भाग १६ - आयती १२, १३)*

५) 'पाहा मी आपल्या प्रेषिताला (पैगंबराला) पाठवीन आणि तो माझ्या पुढे मार्ग प्रशस्त करील आणि प्रभु, ज्याचे तुम्ही इच्छुक आहात अकस्मात आपल्या रूपात येऊन उपस्थित होईल. होय, वचनाचा प्रेषित ज्याचे तुम्ही इच्छुक आहात येईल. अनेक सैन्यांचा स्वामी फर्मावितो.' *(बायबल, मुलाकी, अध्याय ३ आयत १)*

६) 'त्या वेळेपासून यसूअने दवंडी देण्यास व असे सांगण्यास प्रारंभ केला की पश्चाताप करा, कारण आकाशाची बादशाही जवळ आली आहे.'

*(बायबल, मत्ता अध्याय ४ - आयत १७)*

७) 'जर तुम्ही माझ्यावर प्रेम करीत असाल तर माझ्या आज्ञांची अम्मल बजावणी कराल. आणि मी पित्याला विनंती करीन तर तो तुम्हाला दुसरा सहाय्यक (वकील अथवा शिफारस करणारा) देईल की जो अंतिम दिनापर्यंत तुमच्याबरोबर राहील.'

*(बायबल, यूहन्ना अध्याय १४ आयती १६, १७)*

'परंतु सहाय्यक म्हणजे रूहुलकुद्स (जिब्रईल) ज्याला पिता माझ्या नावाने पाठवील तोच तुम्हाला सर्व गोष्टी शिकवील आणि जे काही मी तुम्हाला सांगितले आहे तो सर्वांची तुम्हाला आठवण करून देईल.' (आयत २६) आणि आता मी तुम्हाला ते घडण्यापूर्वी सांगून टाकले आहे जेणेकरून तुम्ही ते घडल्यावर विश्वास करावा. त्यानंतर मी तुमच्याशी बऱ्याचशा गोष्टी करणार नाही कारण जगाचा नायक येत आहे आणि माझ्यात त्याचे कांहीही नाही.' *(बायबल, आयत २९-३०)*

'परंतु मी तुम्हाला खरे सांगतो की माझे जाणे तुमच्यासाठी लाभदायक आहे कारण जर मी गेलो नाही तर तो सहाय्यक तुमच्यापाशी येणार नाही पण जर मी जाईन तर त्याला तुमच्या पाशी पाठवीन आणि तो येऊन जगाला पाप व सत्य आणि न्यायालयाच्या बाबतीत दोषी ठरवील. *(बायबल, अध्याय १६ - आयती ७, ८)*

८) 'पाहा जुन्या गोष्टी पूर्ण झाल्या आणि मी नवीन गोष्टी सांगतो या अगोदर की त्या घडाव्यात मी तुम्हाला सांगतो. हे समुद्रावरून जाणाऱ्याने! आणि त्यात वसणाऱ्यांनो! हे व्दीपसमूहानो! आणि त्यांच्या रहिवाश्यांनो! ईश्वरासाठी नवीन गीत गा. पृथ्वीवर त्याचेच गुणगान करा, वन व त्यातील वस्त्या 'कीदार'च्या वस्ती असलेल्या गांवानी आपला आवाज उंच करावा, 'सुलअ'च्या रहिवाश्यांनी गीत गावे, पर्वतांच्या शिखरावरून गर्जना करावी, त्यानी ईश्वराचा प्रताप प्रकट करावा आणि व्दीपसमूहात त्याचे स्तुति-स्तवनं करावे ईश्वर शूराप्रमाणे निघेल, तो योध्द्या पुरूषाप्रमाणे आपला स्वाभिमान दाखवील, तो आपल्या शत्रूवर मात करील. मी दीर्घकाळापर्यंत गप्प राहिलो. मी पर्वत व टेकड्यांना ओसाड करीन आणि आंधळ्यांना त्या मार्गावरून की ज्यांना ते जाणत नाहीत, घेऊन

जाईन मी त्यांना त्या मार्गावरून ज्यांची त्यांना कल्पना नाही घेऊन चालेन. मी त्यांच्या पुढील अंधाराला प्रकाश व उंच सखल जागाना समतल करीन. मी त्यांच्याशी असा व्यवहार करीन आणि त्यांना सोडणार नाही. जे कोरलेल्या मूर्त्यावर श्रध्दा ठेवतात व ओतीव मूर्त्यांना म्हणतात, 'तुम्ही आमचे उपास्य आहात' त्या मागे जातील व फार लज्जित होतील. *(बायबल, यसअयाह - अध्याय ४२ - आयती ९ ते १७)*

तौरात व बायबलच्या या वाक्यावर व भविष्यवाणीवर कसलीही तपशीलवार चर्चा तर येथे केली जाऊ शकत नाही, तथापि त्यांच्या मुख्य-मुख्य अंशासंबंधी स्पष्टीकरण अवश्य खाली दिले गेले आहे.

'फारान पर्वत' मक्केत आहे. 'आतशीन शरीअतचा' (अग्निपूर्ण धर्म-कायदा) अर्थ धर्मयुध्द व रक्तपात आणि प्रभावी व अधिकार पूर्ण धर्म-कायदा आहे.

'त्यांच्याच बंधुंपैकी (बनी इस्त्राईलचे बंधु) याचा अर्थ पैगंबर इस्माईल (अ.) आहेत ज्यांच्यात प्रेषित मुहम्मद (स.) यांनी जन्म घेतला होता 'तुझ्यासारखा'चा म्हणजे तोदेखील तुझ्याचसारखा (म्हणजे मूसा अ. यांच्यासारखाच) एक स्थायी ग्रंथ व धर्मकायदा आणणारा पैगंबर (प्रेषित) असेल.' 'ज्या दगडाला गवंड्यांनी रद्द केले' हा संकेतदेखील बनी इस्माईलकडे आहे, कारण जेव्हा बनी इस्माईल एका दीर्घकाळापर्यंत इमामत (नेतृत्व) च्या पदावर आसीन होते आणि ते ग्रंथधारक व प्रेषितत्व (पैगंबरी) धारक राहिले. या काळात हे लोक या प्रतिष्ठेपासून पूर्णतः वंचित होते. 'तोच कोपऱ्याचा दगड (कोनशिला) झाला' म्हणजे अखेरीस त्याच कुळाला ते नेतृत्वपद दिले गेले आणि अंतिम ग्रंथ जो अल्लाहकडून उतरला तो यातच उतरला. 'प्रभुची बादशाही'चा अर्थ पूर्ण व आदर्श 'ईशराज्य' होय. 'फळ आणील' म्हणजे महान अल्लाहच्या आज्ञा व इच्छा पुरेपूर जारी करील आणि आपल्या भरभराटी प्रत्यक्षात आणील. 'पण आता तुम्ही त्या सहन करू शकत नाही' अर्थात तुम्ही अल्लाहच्या आज्ञांच्या ठेवीचे अधिक ओझे सहन करू शकत नाही. म्हणून माझ्याव्दारे महान अल्लाह आपल्या धर्माला पूर्ण ही करीत नाही. 'अकस्मात आपल्या रूपात येऊन उपस्थित होईल' म्हणजे त्या नेमस्त प्रेषिताचे आगमन अशाप्रकारे आणि अशा ठिकाणी आणि अशा लोकात होईल ज्याने तुम्हाला आश्चर्य वाटेल.

'वचनाचा प्रेषित'मध्ये 'वचन'चा अर्थ 'सुंता'चे वचन आहे, जे इब्राहीम (अ.) आणि त्यांच्या संततीकडून घेतले गेले होते. (जसे पुस्तक 'जन्म', अध्याय १७, आयत १० मध्ये स्पष्टीकरण दिले गेले आहे.) म्हणून 'वचनाचा प्रेषित'चा अर्थ असा होईल की असा प्रेषित (स.) जो सुंताच्या इब्राहीम (अ.) यांच्या सुन्नतला (परंपरेला) आम व

जगव्यापी बनवील. ही परंपरा त्याच्या धर्मकायद्याचे व त्याच्या अनुयायाचे एक सुपरिचित व वैशिष्ठ्यपूर्ण चिन्ह असेल. 'सहाय्यक' ज्या मूळ इब्रानी भाषेतील शब्दाचे भाषांतर आहे त्याचे अरबी भाषेतील इंजील (बायबल) मध्ये भाषांतर 'फारकलीत' असे केले गेले आहे. आणि 'फारकलीत'चा अर्थ जवळ जवळ तोच आहे जो शब्द 'मुहम्मद' अथवा 'अहमद'चा आहे. 'अंतिम दिनापर्यंत तुमच्याबरोबर राहील'चा अर्थ अगदी स्पष्ट आहे आणि तो असा की त्याने आणलेला ग्रंथ व धर्म-कायदा तौरात व इंजील (बायबल)प्रमाणे एका मर्यादित काळासाठी नव्हे तर चिरकाळासाठी आहे. 'जगाचा नायक' म्हणजे संपूर्ण जग व पूर्ण मानवजातीसाठी अल्लाहचा प्रेषित असेल. असे नव्हे की एखाद्या विशिष्ठ जातीसाठी अथवा देशासाठी. 'माझ्यात त्याचे काही नाही.' म्हणजे माझ्या (येशू ख्रिस्त) तुलनेत तो फार महान व उच्च श्रेणीचा प्रेषित असेल. 'ईश्वरासाठी नवीन गीत गा.'चा अर्थ असा आहे की संपूर्ण जग व त्यातील सर्व महासागर व भूभागासाठी एक नवीन ग्रंथ व एक नवीन धर्म-कायदा येणार आहे. 'कीदार' ही बनी इस्माईलमधील एक प्रसिध्द व्यक्ती होऊन गेली आहे. प्रेषित मुहम्मद (स.)देखील त्याच व्यक्तीच्या वंशात जन्मले. 'सुलअ' मदिन्याजवळील एका डोंगराचे नाव आहे. 'मी दीर्घकाळापर्यंत गप्प राहिलो' म्हणजे दीर्घकाळापर्यंत वह्य (ईशसंदेश) व प्रेषितत्वाचा क्रम स्थगित राहिला.

आशा आहे की ही संक्षिप्त स्पष्टीकरणेसुध्दा त्या वाक्यांचे वास्तविक हेतु जाणून घेण्याच्या प्रयत्नात पुरेशी सहाय्यक सिध्द होतील. यावरून प्रत्येक सदाचारी व सत्यवादी मनुष्यासमोर हे सत्य पूर्णपणे प्रकाशमान होईल की तौरात व इंजील (बायबल) मधील या भविष्यवाणीत ज्या ग्रंथाच्या व ज्या पैगंबरांच्या (प्रेषितांच्या) आगमनाची शुभ-सूचना दिली गेली आहे. ते निश्चितपणे पवित्र कुरआन व प्रेषित मुहम्मदच (स.) आहेत. म्हणून जेव्हा पवित्र कुरआनचे अवतरण झाले तेव्हा यहूदी (ज्यू) घ नसरानी (ख्रिस्ती) पंडितांना हे कळण्यास थोडीदेखील अडचण आली नाही की हा तोच ग्रंथ आहे ज्याची आम्ही प्रतीक्षा करीत होतो आणि ज्याच्यासंबंधी आम्हाला निरंतर शुभ-सूचना दिल्या जात राहिल्या आहेत. जसे की पवित्र कुरआनमध्ये महान अल्लाहने फर्माविले आहे.

*'ज्या लोकांना आम्ही आपला ग्रंथ (तौरात) दिला आहे ते जाणतात की निश्चितपणे हा (पवित्र कुरआन) तुमच्या पालनकर्त्याकडून सत्यासह उतरविला गेला आहे.'*

(सुरतल-अनआम - ११५)

*'असे की बनी इसराईलचे पंडित याला (पवित्र कुरआनला) जाणतात व ओळखतात.'*

(सुरतुश्शुअरा - ११७)

म्हणून त्यांच्यापैकी खऱ्या अर्थाने जे धर्मपंडित होते आणि ज्यांच्या हृदयात ईश

भय होते. आणि सत्याच्या प्रेमावर सांप्रदायिक व्देषाचा प्रभाव पडला नव्हता त्यांनी नि:संकोचपणे या ईशग्रंथाला आपलेसे केले. त्यांच्यासमोर पवित्र कुरआनचे आवाहन प्रस्तुत केले गेले तेव्हा असे वाटले जणू ही त्यांची आपली स्वत:ची संपत्ती आहे. जी त्यांना बहाल केली जात आहे. पवित्र कुरआनमध्ये हे ऐतिहासिक तथ्य या शब्दांत प्रकट केले गेले आहे.

*'मग ते लोक ज्यांना आम्ही (खऱ्या अर्थाने) ग्रंथ प्रदान केला होता त्या (पवित्र कुरआन) वर ईमान आणीत आहेत.'* (सूरतुल अनकबूत - ४७)

*'आणि हे सुहृदयी (ख्रिस्ती) जेव्हा अल्लाहच्या प्रेषितावर उतरणाऱ्या वाणीला (पवित्र कुरआनला) ऐकतात तेव्हा तुम्ही पाहता की त्यांचे डोळे अश्रू ढाळतात ते म्हणतात की हे प्रभु! आम्ही याच्यावर ईमान आणले, म्हणून तू आमची (सुध्दा याच्या) साक्षीदारांत नोंद कर.'* (सूरतुल माइदह - ८३)

या सत्यप्रिय लोकांची जी यादी इतिहास प्रस्तुत करतो ती फार मोठी आहे. यात अँबिसीनीयाचे राजे नजाशी, त्यांचे पुतणे जूमुखमिर, पॅलेस्टाईनचे रोमन गव्हर्नर व पादरी असकफ इब्ने नातूर, नजरानच्या ख्रिश्चन शासकाचे बंधु कुर्ज बिन अलक़मा, बनी तै टोळीचे सरदार अदी बिन हातिम, तौरातचे सुप्रसिध्द धर्मपंडित कअब-अल-अहबार, वहब बिन मुनाब्बिह आणि अब्दुल्लाह बिन सलाम (रजि.) सारखे लोकदेखील सामील आहेत. या असंख्य यहूदी (ज्यू) व नसरानीचे (ख्रिश्चनांचे) पवित्र कुरआनवर ईमान आणणेच खुद्द या गोष्टीचे एक बोलके प्रमाण आहे की हे सर्व तौरात व इंजील (बायबल) मध्ये उल्लेखिलेल्या भविष्यवाणीच्या अनुरूप होते. कारण ही मंडळी अगोदरपासूनच ग्रंथधारक व धर्मकायदाधारक होती. कुरैशसारखे ते ग्रंथधारक नसलेले नव्हते की आपल्या या उणीव व निराशेला दूर करण्यासाठी विनाकारण पवित्र कुरआनलादेखील ईशग्रंथ म्हणून मान्य केले असते. त्यांनी तौरात व इंजीलऐवजी आता पवित्र कुरआनचे अनुसरण अवलंबिले आणि मूसाच्या व ख्रिश्चन जातीच्या लोकांशी आपले जुने भावनात्मक संबंध तोडून मुहम्मद यांच्या संप्रदायाच्या क्षेत्रात सामील झाले. मानस शास्त्रीय व बौध्दिक अशा दोन्ही दृष्टीने असे याच कारणामुळे शक्य झाले की एकीकडे त्यांनी आपल्या सहीफा (अल्लाहकडून उतरलेले ग्रंथ) मध्ये उल्लेखित भविष्यवाणी पाहिल्या. दुसरीकडे पवित्र कुरआन व पवित्र कुरआन आणणाऱ्या प्रेषित मुहम्मद (स.) वर दृष्टी टाकली. त्यांच्या हृदयांनी त्वरित उद्‌घोष केला की ज्या ग्रंथाबद्दल आम्हाला वार्ता (पूर्वसूचना) दिली गेली होती तो ग्रंथ प्रत्यक्षात आलेला आहे. आणि मग त्यांच्या सत्यप्रिय वृत्तीने त्यांना त्याचा अवलंब करण्यास भाग पाडले.

**(३) तिसरे प्रमाण** - पवित्र कुरआनमध्ये कसलेही मतभेद व विरोधाभास आढळत नाही, त्याचे हे वैशिष्ठ्य त्याच्या सत्यतेचे एक स्पष्ट प्रमाण आहे जसे की त्याने स्वत: म्हटले आहे,

*'जर हा कुरआन अल्लाहऐवजी एखाद्या दुसऱ्याकडून (आला) असता तर त्यांना यात मोठे मतभेद आढळले असते.'* (सूरतुन्निसा)

हे अशासाठी की हा ग्रंथ तेवीस वर्षांच्या दीर्घ मुदतीत आणि अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत पूर्णत्वाला पोचला होता. हे मानवी लिखाण असते तर सवयीनुसार व प्रत्यक्षत: हे कदापि शक्य नव्हते की त्याचे विषय, त्याची तत्त्वे व चिंतन व त्याची शिकवण विरोधाभास व मतभेदापासून पूर्णत: मुक्त असते. मानवी लिखाण तर सामान्यत: अशा स्थितीतदेखील त्या दोषापासून मुक्त असत नाही की जेव्हा ते समान परिस्थितीत केवळ काही महिन्यात निरंतर लिहिले गेले असेल. मग ज्या ग्रंथाच्या पूर्णत्वास शेकडो महिने व हजारो दिवस लागले असतील आणि ज्याला परिस्थितीच्या असामान्य चढ-उताराला तोंड द्यावे लागले असेल. त्यात विरोधाभास व मतभेदांचा अभाव असणे कसे शक्य आहे? परंतु आम्ही पाहतो की पवित्र कुरआनमध्ये ही 'अशक्यता' स्पष्टपणे शक्यता बनून एका वास्तविकतेच्या रूपात अस्तित्वात आहे आणि त्याच्या विस्तृत विषय व तपशीलपूर्वक आदेश व मार्गदर्शनात परमकोटीची एकवाक्यता आढळते. याचा अर्थ याशिवाय काय असू शकतो की त्याचा 'लेखक' कोणी मानवी व्यक्ती नाही तर तो ज्ञानी व खबर राखणारा आणि सर्वशक्तिमान आहे. ज्याच्या ज्ञानात मतभेदाला कधीही वाव मिळू शकत नाही आणि त्याने सांगितलेल्या गोष्टीत काळातील मोठ्यात मोठे अंतरदेखील कसलाही विरोधाभास निर्माण करू शकत नाही.

**(४) चौथे प्रमाण** - पवित्र कुरआनने आपल्या प्रेषणकार्यासंबंधी अनेक भविष्यवाणी केलेल्या आहेत आणि सामान्यपणे अशा परिस्थितीत केलेल्या आहेत की जेव्हा त्यांचे पूर्ण होण्याची प्रकट कारणे व लक्षणे नव्हती. परंतु जगाने त्यांच्यापैकी प्रत्येकीला पूर्ण होताना पाहिले आणि कोणतीही भविष्यवाणी चुकीची ठरली नाही. उदाहरणार्थ -

**(अ)** पवित्र कुरआनने हिजरी सन सहामध्ये हुदैबियाच्या तहाप्रसंगी मुस्लिमाना ही शुभवार्ता ऐकविली होती,

*'अल्लाहने इच्छिले तर तुम्ही निश्चितपणे मस्जिदे हराममध्ये प्रवेश कराल, पूर्ण शांती व समाधानासह, आपल्या डोक्यावरील केस पूर्णपणे कापून घ्या व केसांना कातरून घ्या, अशा स्थितीत की तुम्हाला कोणाचेही भय असू नये.'* (सुरह फतह - २७)

या शब्दांतील दृढ निश्चय व दृढ विश्वास पाहा. शिवाय या सत्याचे स्मरण करा

की हे शब्द त्या वेळी सांगितले गेले होते जेव्हा मुस्लिमांना मक्केतील काफिरांशी बरीच पडती बाजू घेऊन तहाचा करार करावा लागला होता. तेव्हा त्यांना आपल्या धर्मकेंद्राच्या (काबाच्या) दारावर पोचल्यानंतर जबरदस्तीने रोखले गेले होते. आणि त्यांना भग्न हृदयाच्या स्थितीत काबागृहाचे दर्शन न घेता परत यावे लागले होते. निश्चितच ही परिस्थिती अशी नव्हती की ज्या वेळी मुस्लिमांत मक्केत विजयी होऊन प्रवेश करण्याची आशा निर्माण केली जावी. परंतु पवित्र कुरआनने केवळ आशाच उत्पन्न केली नाही तर पूर्ण दृढता व विश्वासाने फर्माविले की असे निश्चितपणे घडेल. येथपावेतो की या प्रवेशाचे चित्रांकनदेखील केले आहे. आणि मग दोन वर्षानंतरच असे घडलेसुध्दा! मुस्लिम अगदी त्याच वैभवाने मक्केत दाखल झाले ज्याची खबर वरील शब्दांत दिली गेली होती.

**(ब)** पवित्र कुरआनने मुस्लिमांना सांगितले होते,

*'तुमच्यापैकी जे लोक खरे ईमानधारक व सदाचारी आहेत त्यांच्याशी अल्लाहचा असा वायदा आहे की तो त्यांना पृथ्वीवर खिलाफत (प्रतिनिधित्व) प्रदान करील जशी की त्याने त्यांच्या पूर्वीच्या लोकांना प्रदान केली होती आणि त्यांच्या त्या धर्माला दृढतेने प्रस्थापित करील, ज्याला त्याने त्यांच्यासाठी पसंत केलेले आहे आणि त्यांच्या भयग्रस्त अवस्थेला शांतीच्या स्थितीत अनिवार्यपणे परिवर्तित करून टाकील.'*

(सूरतुन्नर - ५५)

ही गोष्ट मुस्लिमांना ज्या वेळी व जशा स्थितीत सांगितली गेली होती त्यांचे स्पष्टीकरण त्याच शब्दांत आहे. म्हणजे असे की ही स्थिती पूर्णपणे भय व दहशतीची होती. धर्म अस्थिर होता, प्रभाव व सत्तेपासून वंचित होती. मग काही वर्षात आंतल्याआत ही स्थिती ज्याप्रकारे पालटली आणि अरबस्थानची भूमी व आकाश परिवर्तित झाले त्याचा तपशील संपूर्ण जगाला ज्ञात आहे. ज्याने उपरोक्त आयतीच्या शब्दांना घटनांचे रूप धारण करताना आपल्या विवेकाच्या डोळ्यांने पाहिलेले आहे.

**(क)** पवित्र कुरआनने आपल्या प्रेषित (स.) यांच्या बाबतीत मदीनाच्या संकटग्रस्त व युध्दाच्या धोक्याने भरलेल्या वातावरणातदेखील घोषणा केली होती की-

*'अल्लाह तुम्हाला सर्व लोकांपासून सुरक्षित ठेवील.'* (सूरतुल माइदह - ६७)

मक्काच्या भयावह अत्याचार पीडित व असहाय स्थितीच्या काळातदेखील भरवसा दिला होता,

*'तुम्ही आपल्या पालनकर्त्यासाठी दृढ रहा कारण तुम्ही आमच्या (म्हणजे अल्लाहच्या) दृष्टीत आहात.'* (सुरतुतूर - ४८)

या बाबतीत हे सांगण्याची अजिबात आवश्यकता नाही की मक्केतील सामर्थ्यवान

अनेकेश्वरवादी, मदीना येथील कपटी ढोंगी लोक व कपट कारस्थान करणारे यहूदी (ज्यू) आणि संपूर्ण अरबस्थानातील इस्लामशी शत्रुत्व बाळगणाऱ्या असंख्य लोकांच्या दुरेच्छा व दुष्ट प्रयत्न असूनदेखील पवित्र कुरआनने दिलेला दिलासा एक उघड सत्य सिध्द झाले. आणि अल्लाहच्या पैगंबरांच्या विरूध्द कोणतीही युक्ती, कोणतेही कटकारस्थान व कोणतेही प्रयत्न फलद्रूप झाले नाहीत. पैगंबरीच्या (प्रेषितत्वाच्या) तेवीस वर्षाच्या काळात त्यांना अनेकदा अशा धोकादायक परिस्थितीतून जावे लागले ज्यातून ते जिवंत राहणे कोणत्याही प्रकारे अपेक्षित नव्हते. असे ही घडले की मक्केच्या निर्बळतेच्या काळात एक बनी हाशमच्या कुळाला सोडून कुरैशच्या उरलेल्या सर्व टोळ्यांनी पैगंबरांना ठार करण्यासाठी संयुक्त प्रयत्न केले. असेही घडले की हिजरतच्या (देशत्यागाच्या) काळात पाठलाग करणारे त्या गुहेच्या तोंडावर जाऊन उभे ठाकले की ज्यात पैगंबर लपून बसलेले होते. असेही घडले की या पाठलागाच्या काळात शस्त्रास्त्राने सज्ज शत्रूने त्यांना रस्त्यात पाहिले परंतु त्यांना पकडण्याच्या प्रयत्नात असता त्याच्या घोड्याला वारंवार ठोकर खावी लागली. त्याचे पाय जमिनीत रूतले. यहूदीनी एका मेजवानीचा बहाणा करून त्यांना एका खास रस्त्याने घेऊन जाण्याचे ठरविले की जेथे त्यांच्यावर एक मोठा दगड टाकून त्यांना यमसदनास पोचवावे. असेही घडले की जंगलात त्यांना झोपलेल्या स्थितीत पाहून त्यांच्या तलवारीवर एका इस्लामच्या शत्रूने ताबा मिळविला आणि विश्वासपूर्ण रीतीने सांगितले, 'सांग आता तुला माझ्या हातून कोण वाचवू शकेल?' कधी तर असे घडले की उहद व हुनैनच्या युध्दात कित्येक हजार इस्लामशत्रूंच्या विळख्यात एकटेच सापडले. थोडक्यात असे की असे कित्येक प्रसंग आले की ज्यात मानवी कल्पना व अनुभवाच्या दृष्टीने त्यांचे जिवंत राहणे अत्यंत अनपेक्षित होते. परंतु प्रत्येक प्रसंगी असेच दृष्टीला आले,

'(तुम्ही आमच्या (अल्लाहच्या) दृष्टीत आहात)' ची निकड आपल्या जागेवरून टळू शकली नाही आणि अल्लाह तुम्हाला सर्व लोकापासून सुरक्षित ठेवील हे वचन आपल्या जागी जसेच्या तसे टिकून राहिले.'

**(ड)** पवित्र कुरआनने महान अल्लाहतर्फे आपल्यासंबंधी घोषणा केली होती,

*'निश्चितपणे आम्ही त्याला (पवित्र कुरआनला) सुरक्षित ठेवू.'*

(सूरतुल हजर - ९०)

ही घोषणा अथवा भविष्यवाणी ज्याप्रकारे एक वास्तविकता व सत्य घटना सिध्द होत चालली आहे त्यावरून एखादा प्रामाणिक इस्लामचा इन्कार करणारादेखील इन्कार करू शकणार नाही. पवित्र कुरआन ज्या शब्दांत आणि ज्या स्वरूपात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडून प्रस्तुत झाला होता, आजसुध्दा तो तसाच त्याच शब्दांत आणि अगदी त्याच

स्वरूपात पूर्णपणे सुरक्षित असल्याचे आढळते. की जेव्हा या पूर्वीच्या ईशग्रंथापैकी कोणता एकसुध्दा असा ग्रंथ नाही की जों पूर्णपणे सुरक्षित असल्याचा दावा केला जाऊ शकतो. मग तो खरा सिध्द होण्याची गोष्ट तर दूरच परंतु पवित्र कुरआनने आपल्यासंबंधी जी खबर दिली होती की 'मी सदैव सुरक्षित राहीन' त्याबद्दल आजपर्यंतचा इतिहास साक्षी आहे की ती खबर कणभरदेखील खोटी नव्हती.

**(इ)** पवित्र कुरआनने जेव्हा इराणी मजूसियांकडून (अग्निपूजकाकडून) रोमन ख्रिश्चनांचा दारूण पराभव केला गेला तेव्हा अशी सूचना दिली होती,

*'रोमन लोक अरबस्थानाच्या भूमीच्या परिसरात परास्त झाले परंतु आपल्या या पराजयानंतर काहीच वर्षात ते पुन्हा विजयी ठरतील.'* (सुरर्तुरूम २ ते ४)

सात वर्षे लोटली न लोटली की हे ग्रंथधारी रोमन लोक अग्निपूजक इराणी लोकांवर खरोखरच विजयी झाले आणि अशा प्रकारे पवित्र कुरआनने केलेली भविष्यवाणी इतिहासाची एक सत्य घटना ठरली.

**(ई)** पवित्र कुरआनने यहूदींच्या (ज्यू लोकांच्या)संबंधी त्यांच्या सत्याच्या शत्रुत्वासंबंधी शिक्षेबद्दल फर्माविले होते,

*'तो (अल्लाह) त्यांच्यावर कयामत (अंतिम दिन)पर्यंत अशा लोकांना नियुक्त करीत राहील जे त्यांना अत्यंत वाईट संकटात टाकतील.'* (सूरतुलअअराफ - १६७)

ही जात एका दीर्घकाळापासून ज्याप्रकारे पुन्हा पुन्हा लज्जित व अपमानित आणि नष्ट व ध्वस्त होत राहिली आहे त्याचे अन्य उदाहरण नाही. कधी आशूरियांनी त्यांना पायाखाली तुडविले, कधी बॉबिलोनियाच्या राजा बख्ते नस्रने त्यांचा विध्वंस केला. कधी रोमन सम्राट ट्यूसने त्यांना नष्ट-भ्रष्ट केले, कधी मुस्लिमांच्या हातून त्यांना कत्तल आणि निर्वासन व गुलामगिरीचा प्रकोप सहन करावा लागला, कधी हिटलर त्यांच्यावर प्रकोप म्हणून कोसळला. आता भविष्यकाळात जे काही घडणार आहे ते त्या वेळीच पाहिले जाईल. हल्ली तर वर्तमान काळापर्यंतचाच इतिहास चर्चेचा विषय बनू शकतो आणि या बाबतीत प्रत्येक मनुष्य पाहू शकतो की तो सर्वव्यापी निराशा व विनाशापासून धडा घेण्याजोग्या घटनांनी भरलेला आहे.

या काही महत्त्वाच्या व स्पष्ट भविष्यवाणीव्यतिरिक्त पवित्र कुरआनमध्ये आणखी भविष्यवाणीसुध्दा आहेत आणि यांच्याप्रमाणेच त्या सर्वदेखील एक-एक करून पूर्ण झालेल्या आहेत. ही वास्तविकता या गोष्टीचे इन्कार न करण्याजोगे प्रमाण आहे की या भविष्यवाणी करणारा परोक्षाचे पूर्ण ज्ञान बाळगणारा आहे. नाहीतर हे कदापि शक्य नव्हते की त्या अशा प्रकारे सर्वच्या सर्व खऱ्या ठराव्यात आणि त्यापैकी कोणती एकसुध्दा खोटी

सिध्द होऊ नये. तसे पाहिले तर ज्योतिषी व काहिन (जिन्नांना विचारून भविष्यवाणी करणारे) सुध्दा भविष्यवाणी करीतच असतात, परंतु कोणत्या अशा एकसुध्दा ज्योतिषी अथवा काहिनचे नाव घेतले जाऊ शकत नाही की ज्याच्या सर्वच्या सर्व भविष्यवाणी खऱ्या ठराव्यात, याउलट असे घडते की जर त्यांची एखादी भविष्यवाणी खरी ठरली तर चार चुकीच्या ठरल्या. त्याचे कारणसुध्दा अगदी स्पष्ट आहे आणि या भविष्यवाणी अनिवार्यपणे केवळ कयास व अंदाजावर आधारित असतात. ही जाहीर गोष्ट आहे की हुशारातील हुशार माणसाचेसुध्दा अंदाज नेहमी खरे ठरू शकत नाहीत. मग जेव्हा पवित्र कुरआनातील भविष्यवाणीची स्थिती या सामान्य व सर्वव्यापी स्थितीपेक्षा भिन्न ठरली आहे आणि त्या निर्विवाद सर्वच्या सर्व खऱ्या ठरलेल्या आहेत. तेव्हा हे या गोष्टीचे उघड प्रमाण आहे की त्यांचा पाया मानवी कयास व अंदाजावर कदापि नव्हता तर परोक्षाच्या स्पष्ट व निर्विवाद ज्ञानावर होता. याचा अर्थ असा की त्या एखाद्या माणसाकडून नव्हत्या तर त्या अल्लाहकडून होत्या ज्याच्याशिवाय अन्य कोणालाही परोक्षाचे स्पष्ट व अंतिम ज्ञान नाही. दुसऱ्या शब्दांत असे की या भविष्यवाणी ज्या ग्रंथाने केलेल्या आहेत तो कदापि एखादे मानवी लिखाण नव्हे तर निश्चितपणे दिव्यवाणी आहे.

**(५) पाचवे प्रमाण** - पवित्र कुरआन दिव्य ग्रंथ असण्याचे पाचवे प्रमाण असे आहे की त्याने पूर्वीच्या प्रेषितांचा वृतान्त अशा प्रकारे वर्णिला आहे जसे एखादा डोळ्यांने पाहत असलेल्या घटनांचा वर्णन करतो. हे वृत्तान्त बहुतेक असे आहेत ज्यांचा खरा तपशील या पूर्वी प्रेषित मुहम्मद (स.) यांना ज्ञात नव्हता आणि त्यांच्या देशवासीय लोकांत आणि त्यांच्या जातीत याची चर्चाही नव्हती. जसे की पवित्र कुरआनमध्ये काही कथा सांगून शेवटी फर्माविलेदेखील आहे,

*'आजच्या पूर्वी ही पूर्ण कथा तुम्हालाही माहीत नव्हती आणि तुमच्या जातीलादेखील ज्ञात नव्हती.'* (सूरह हूद - ४९)

याशिवाय हे पैगंबर! ज्यांच्या कथा पवित्र कुरआनने आपल्या आवाहनाच्या हेतूने जागोजागी सांगितल्या आहेत ते बहुतेक बनी इस्त्राईलपैकी पैगंबर होते. बनी इस्त्राईल म्हणजे अरब जातीशी संबंधित नव्हते. की जेणेकरून या जातीय व वांशिक संबंधामुळे या जातीला (अरबांना) त्यांच्याबद्दल नैसर्गिक आपुलकी असेल आणि आपल्या इतिहास व कथामध्ये त्यांना स्थान देतील. म्हणून नैसर्गिकरीत्यादेखील, पैगंबरांना (प्रेषित मुहम्मद (स.)) व सामान्यत : बनी इस्त्राईलना त्यांच्या स्थितीची काही विशेष माहिती असणे शक्य नव्हते. अशा परिस्थितीत पवित्र कुरआनने त्यांचे वृत्तान्त सांगितले आणि अशा प्रकारे सांगितले की खुद्द तौरातला, जो त्याच पैगंबरांच्या पुस्तिकांचा (सहिफे) संग्रह आहे,

त्यालादेखील त्यांच्यापैकी कोणाचेही खंडन करण्याचे धाडस करणे शक्य झाले नाही. आणि कोठे त्याने असले धाडस केलेदेखील तरी तो यशस्वी झाला नाही. तर त्याव्दारे त्याने वास्तविकत: स्वत: आपलेच खंडन केले. या संकलनाचा तपशील असा आहे की तौरातची कथने पवित्र कुरआनच्या कथनापासून जेथे कोठे भिन्न आहेत तेथील हा मतभेद वास्तविक व मूळ तौरातचा नाही तर हा त्या फेरफार करण्याचा मतभेद आहे. जो अल्लाहकडून अवतरलेल्या तौरातमध्ये त्याच्या अनुयायांकडून समाविष्ट केला गेला आहे. म्हणून ज्या कोणा माणसालादेखील नुबुव्वत (प्रेषितत्व)चे स्थान व हुद्दा कळतो, इतिहासाच्या तत्त्वांची माहिती आहे आणि समीक्षेची तत्त्वे व लक्षणांचा उपयोग करून या कथनांचे परीक्षण करू शकतो. तो संशोधनाची सखोल दृष्टी टाकून स्पष्टपणे जाणू शकेल की जेथे-जेथे पवित्र कुरआन व तौरातच्या कथनात मतभेद आहेत तेथे तौरातची कथने कदापि सत्यानुरूप असू शकत नाहीत आणि असे की सत्य पूर्णपणे पवित्र कुरआनच्या बाजूनेच दिसते.

पवित्र कुरआनने पूर्वीच्या पैगंबरांच्या कथा अशा प्रकारे वास्तविक स्वरूपात कथन करणे की जेणेकरून वर्तमान तौरातमधील चुकांचे शुध्दीकरण होते. याचा याशिवाय अन्य काही अर्थ नाही की त्याची ही कथने ज्ञानी व खबर राखणाऱ्या अल्लाहकडून आहेत आणि तो नि:संशय आकाशातून उतरलेला ग्रंथ आहे.

**(६) सहावे प्रमाण** - या गोष्टीचे सहावे प्रमाण असे आहे की पवित्र कुरआनमध्ये अशी अनेक ज्ञानपूर्ण सत्येदेखील वर्णित झालेली आहेत जी तो अवतरणेच्या वेळेपर्यंत संपूर्ण जगासाठी व विशेषत: अरबस्थानासाठी मोहरबंद रहस्ये होती. आणि विज्ञान व तत्त्वज्ञानाच्या ज्ञानी मंडळीपैकी कोणालादेखील त्याचे ज्ञान नव्हते. त्यानंतर जेव्हा शतके लोटली आणि ज्ञॅन व वैज्ञानिक संशोधनाने आपल्या प्रगतीचे अनेक टप्पे पूर्ण केले तेव्हा कोठे त्यांचे ज्ञान प्राप्त होऊ शकले. उदाहरणार्थ -

**अ)** सृष्टीच्या निर्मिती संबंधाने पवित्र कुरआनने म्हटले आहे -

*'नि:संदेह हे सर्व आकाश आणि पृथ्वी सर्वच्या सर्व आपसात जुडलेले होते तेव्हा आम्ही त्यांना वेगवेगळे केले.'* (सूरतुल अंबिया - ३०)

'सर्व आकाश आणि पृथ्वीचा पवित्र कुरआनच्या भाषेत संपूर्ण सृष्टी असा अर्थ आहे. आयतीचा उघड अर्थ असा आहे की ही सृष्टी आपले वर्तमान रूप धारण करण्यापूर्वी पूर्णपणे एकाच मूळ तत्त्वाच्या रूपात होती, एकाच प्रकारची अशी एक विशिष्ठ वस्तु होती जी वातावरणात पसरलेली होती. मग विवेकी निर्माणकर्त्याने (अल्लाहने) तिला विभिन्न भागात विभाजित केले आणि त्यांच्यापासून अनेक ग्रहांच्या रूपात त्यांना

निर्माण केले. हे मूळ तत्त्व काय व कसे होते? याचे स्पष्टीकरणदेखील पवित्र कुरआन नुसार. 'सूरह हा मीम सजदा'वरून असा होतो की 'हेसुध्दा एक प्रकारचे धूर अथवा गॅस होते.'

**ब)** सर्व प्राणीमात्रासंबंधी पवित्र कुरआनने सांगितले आहे की या सर्वांचे मूळ पाणी आहे. प्रत्येक प्राण्याची रचना पाण्याने झालेली आहे.

*'आम्ही (अल्लाहने) प्रत्येक प्राण्यास पाण्यापासून बनविले आहे.'*

(सुरतुल अंबिया - ३०)

**क)** पवित्र कुरआनने सर्व सजीव व निर्जीव निर्मितीसंबंधी सांगितले आहे,

'आम्ही प्रत्येक वस्तूच्या जोड्या निर्माण केल्या आहेत.' *(सूरतुज़्ज़ारियात - ४९)*

म्हणजे सद्य जगात जे काही आहे त्यातील प्रत्येक निर्मितीचे जोडपे निर्माण केले आहे. जेणेकरून त्यांनी एकमेकाची पूर्तता करावी आणि दोघांनी मिळून एकमेकाच्या सहयोगाने ती फलश्रुती आणावी. या जगाच्या हित व गरजांसाठी हे आवश्यक आहे. असे घडू नये की विभिन्न वस्तूच्या स्वाभाविक भेदामुळे त्यांनी आपापसात संघर्ष करीत राहावे. आणि त्याच्या परिणामस्वरूप हे मानवी जीवनमान शांतीपूर्ण निर्माण व विकासाऐवजी फाटाफूट, दुर्दशा व विनाशाचे भक्ष्य ठरावे.

**ड)** चंद्र व सूर्य वगैरेंची स्थायी स्थिती कुरआन स्पष्ट करत आहे,

*'सूर्य आपल्या मुक्कामाच्या ठिकाणाकडे धाव घेत आहे, हा सर्वशक्तिमान व प्रत्येक गोष्टीचे ज्ञान बाळगणाऱ्या व्यक्तित्वाने ठरविलेला कायदा आहे आणि चंद्रासाठी आम्ही मजल निश्चित केलेल्या आहेत. आणि प्रत्येकजण आपल्या विशिष्ट परिघात निरंतर पोहत (म्हणजे भ्रमण करीत) राहतो.'* (सूरह यासीन - ३९, ४०)

निश्चितपणे या सर्व गोष्टी हल्ली सिध्द झालेली सत्ये आहेत. वैज्ञानिक संशोधने दर्शवितात की सृष्टी आपल्या प्रारंभिक स्थितीत एका गॅसच्या खजिन्याच्या स्वरूपात होती. जीवन-स्त्रोत पाणी आहे, निर्मितीत जोडपींचा कायदा लागू आहे, चंद्र व सूर्य आणि सर्व ग्रहे आपापल्या कक्षेत भ्रमण करीत आहेत. परंतु ज्या काळात पवित्र कुरआन या सर्व गोष्टी इतक्या विश्वासपूर्ण स्वरात सांगत होता त्या काळातील ज्ञानी मंडळी व संशोधक या सत्यांची कल्पनादेखील करू शकत नव्हते. तर मग त्यांनी प्रमाणित सत्यांचा स्वीकार करणे तर लांबचीच गोष्ट होय. मग प्रश्न असा पडतो की पवित्र कुरआनमध्ये शेकडो वर्षापूर्वी या वैज्ञानिक तथ्यांचे वर्णन कसे आहे? आणि ही गोष्ट कशी शक्य झाली की अरबस्थानातील एका निरक्षर व्यक्तीच्या वाणीतून सृष्टीच्या त्या महान तथ्यांचे वर्णन बाहेर पडावे? ती तथ्ये केवळ त्याच काळात नव्हे तर त्यानंतरसुध्दा एका दीर्घकाळापर्यंत ज्ञान-

विज्ञानासाठी रहस्ये बनून रहावीत? स्पष्ट आहे की त्याचे एकच उत्तर शक्य आहे आणि ते असे की ज्या पवित्र कुरआनने या तथ्यांची उकल केली. ती एखाद्या मानवाकडून नव्हे तर ती त्या अल्लाहकडून आहे जो संपूर्ण सृष्टीचा निर्माता आहे आणि त्याने स्वतःच त्या तथ्यांना आपल्या या सृष्टीत अस्तित्व प्रदान केले आहे.

**(७) सातवे प्रमाण** - या वास्तविकतेचे सातवे प्रमार्ण पवित्र कुरआनची अनुपम रचनाशैली व असामान्य माध्यम, वक्तृत्व आणि प्रभावी शक्ती आहे.

पवित्र कुरआन मानवी शब्दानेच रचलेली वाणी आहे. त्यातसुध्दा स्वाभाविकपणे तेच नियम व कायदे कार्यरत आहेत ज्यांचा अरबी भाषा व वाङ्मयाशी संबंध आहे. असे असूनदेखील त्याचे शब्दचयन व वर्णनशैली अशी आहे जी अरबी वाङ्मयाच्या भांडारात कोठेही आढळत नाही. तिचे एक चमत्कारिक व्यक्तिगत वैभव आहे जिची उपमा ती स्वतःच आहे. तिच्या खऱ्या स्वरूपाची कल्पना करण्यासाठी पवित्र कुरआन व इस्लामवर श्रध्दा बाळगणाऱ्या एखाद्या व्यक्तीची गरज नाही. तर त्याचा प्रखर विरोध करणाऱ्यांच्या काही साक्षी आपण येथे पाहू या.

प्रसिध्द कुरेशी सरदार वलीद बिन मुगीरा पैगंबरांच्या सेवेत उपस्थित झाला. पैगंबरांनी प्रथेप्रमाणे त्यालासुध्दा पवित्र कुरआनचे पठन करून ऐकविले. असे स्पष्ट होत होते की अल्लाहच्या वाणीने त्याच्या हृदयाच्या कठोरतेवर मात केली होती. गुपचुप घरी परत आला. ही वार्ता अबूजहलपर्यंत पोचली, तेव्हा तो घाबरून त्याच्यापाशी आला आणि म्हणाला, 'काका! मुहम्मद (स.)संबंधी आपली स्थिती स्पष्ट करा आणि असे काही शब्द सांगा की जे ऐकून आपल्या जातीच्या लोकांना समाधान होईल. आपण त्या व्यक्तीच्या दाव्याची सत्यता मान्य करीत नाही.' वलीदने उत्तर दिले, 'अखेर काय सांगू? ईश्वर शपथ! काव्याचा कोणताही प्रकार शेर (काव्याच्या दोन ओळी) रज़्ज़ (युध्दात सैनिकांना प्रेरणा देणारे काव्य) कसीदे (प्रशंसा गीत) जिन्नी शेर (भुताखेतांना वश करावयाचे काव्य). थोडक्यात अरबी काव्यातील एक-एक प्रकाराला मी तुमच्यापेक्षा चांगल्या प्रकारे जाणतो. अल्लाहची शपथ! हा मनुष्य जे काव्य प्रस्तुत करीत आहे त्याचे यांच्यापैकी कोणत्याही प्रकाराशी साम्य नाही. अल्लाह शपथ! त्याच्या काव्यात एक अजब माधुर्य आणि एक विशिष्ट प्रकारचे सौंदर्य आहे. त्यांच्या शाखा फळाने लादलेल्या आहेत. आणि त्यांच्या मुळ्या प्रफुल्ल आहेत, निश्चितपणे प्रत्येक काव्यापेक्षा ते श्रेष्ठ आहे. आणि कोणतेही काव्य त्याला खाली पाडू शकत नाही, कसलीही शंका नाही ते त्या प्रत्येक वस्तूला तोडून टाकील जी त्याच्या खाली येईल'. *(हाकिम व बैहकी)*

कुरैशचा एक पारखी सरदार उत्बा बिन रबीआ पैगंबरांच्या सेवेत उपस्थित झाला

आणि या इच्छेने उपस्थित झाला की पैगंबरांच्या आवाहनाचे परीक्षण करावे आणि त्यांना त्यापासून रोखण्याचा प्रयत्न करावा. पैगंबरांनी त्याला सूरह हाऽमीऽम सजदह ऐकविण्यास सुरवात केली. जेव्हा ते आयत *(कुरआनची ओळ)* 'तर जर ते पराङ् मुख झाले तर सांगा मी तुम्हाला (प्रकोपाचे) भय दाखवितो.' पर्यंत पोचले तेव्हा त्याने त्यांच्या मुख कमलावर आपला हात ठेऊन आणि रक्ताच्या संबंधाची आठवण करून देत विनंती केली की ईश्वरांसाठी आता यापुढे पठन करू नका आणि मग परत घरी परतला. अबु जहल त्याच्या पाशी गेला आणि त्या भेटीचा वृत्तान्त समजून घेण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्याने तपशील देत सांगितले, 'अल्लाहची शपथ! त्यानी प्रस्तुत केलेले काव्य जादूही नाही, काव्य पंक्तीही नाही आणि ज्योतिषवाणी ही नाही.' *(बैहकी)*

काव्यातील अलंकारिक भाषा ती होय की जी श्रोत्यांच्या हृदयात स्थान प्राप्त करते आणि तिने अशा प्रकारे स्थान प्राप्त करावे की श्रोत्यांच्या बुध्दीला समाधान व हृदयाला शांती प्रदान करावी. अलंकारिक भाषेची ही वास्तविकता दृष्टीसमोर ठेऊन जर निरीक्षण केले तर असे आढळले की संपूर्ण मानवी इतिहासात कोणतेही असले काव्य नाही. जे आपल्या प्रभाव शक्तीच्या दृष्टीने आणि हृदय व बुध्दीला जिंकण्यात पवित्र कुरआनच्या बरोबरीला पोचले असेल. पवित्र कुरआनच्या त्या अलंकारिक शैलीला, त्याच्या त्या मोहक शक्तीला आणि त्याच्या त्या वशीभूत करणाऱ्या गुणाची स्थिती घटनांच्या प्रकाशात पाहा.

१) कुरैशच्या सरदारांनी इस्लामी आवाहनाला तोंड देण्यासाठी आपल्या लोकांना जे निर्देश दिले होते त्यापैकी एक असाही होता,

*'या कुरआनचे श्रवण करू नका आणि हा (ऐकविला जात असता दंगा व कोलाहल माजवून) त्याच्यात व्यत्यय आणीत जा. अपेक्षा आहे की अशा प्रकारे तुम्ही प्रभावी ठराल.'* (सूरह हामीऽम सज्दह - २५)

अनेकेश्वरवादींची ही युक्ती व निर्देश स्पष्टपणे या गोष्टीचा स्वीकार होता की जर लोक हा कुरआन लक्षपूर्वक ऐकत राहिले तर ते स्वत: त्याच्या आहारी गेल्याशिवाय राहणार नाहीत.

२) जेव्हा मक्का शहरात अनेकेश्वरवादींचा ईमान धारकावर अत्याचार पराकोटीला पोचला तेव्हा अबू बक्र (रजि.) यांनीसुध्दा देश त्याग करावयाचे ठरविले आणि घरा बाहेर पडले. रस्त्यात इब्ने दगन्ना नावाचा एक गृहस्थ भेटला आणि त्यांचे संरक्षण करण्याचे वचन देऊन त्यांना परत मक्केस आणले. जेव्हा तेथील लोकांना या प्राण रक्षणाच्या वचनाची बातमी कळाली तेव्हा त्यांनी इब्ने दगन्नाला सांगितले की आम्ही अबू बक्र

(रजि.) यांना केवळ एका अटीवर मक्केत राहू देऊ की त्यांनी मोठ्या आवाजात कुरआनचे पठन करू नये आणि आमच्या स्त्रिया व मुलांना तो ऐकण्याची संधी देऊ नये.

*(इब्ने हिशाम भाग - १)*

**३)** अबू जहल आणि अख़नस बिन शुरैकपेक्षा अधिक पवित्र कुरआनचा तिरस्कार करणारे आणि इस्लाम-विरोधक अन्य कोण बरे असतील? परंतु त्यांचा सर्व तिरस्कार, विरोध असूनदेखील त्यांची स्थिती अशी होती की एकदा पवित्र कुरआन ऐकल्यानंतर त्याचे असामान्य माधुर्य व त्याची आकर्षक मोहकता ते कदापि विसरू शकले नाहीत. ते दिवसा शत्रुत्व व विरोधाचा कळस करीत परंतु रात्री जेव्हा ते पैगंबरांच्या वाणीने पवित्र कुरआन ऐकत असत तेव्हा पुढे चाल करणारी त्यांची पाऊले आपोआप जायबंद होत असत आणि लपून-छपून ते उशीरापर्यंत पवित्र कुरआन ऐकत असत.

*(इब्ने हिशाम - भाग - १)*

अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांचे कथन आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी एकदा काबामध्ये सुरतुन्नज्मचे पठन केले, उपस्थित लोकात श्रद्धावंत व नास्तिक सर्व प्रकारचे लोक होते, पठन करता करता जेव्हा ते सजद्याच्या आयत (पवित्र कुरआनचे ते वाक्य ज्याच्या पठनानंतर अल्लाहच्या आज्ञेनुसार सजदा (साष्टांग नमस्कार) करणे अनिवार्य ठरते)पर्यंत पोचले तेव्हा अल्लाहच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी जमिनीवर कपाळ टेकले, त्यांना सजदा (नतमस्तक) करताना पाहून (केवळ एक व्यक्ती, अबू लहबशिवाय) सर्व उपस्थित मंडळींनी जमिनीवर कपाळ टेकले. *(बुख़ारी)*

४) विचार करून पाहा की शरीअतच्या आज्ञेप्रमाणे (इस्लामी कायद्याप्रमाणे) मुस्लिमांना सजदा करणे भाग पडले, परंतु नास्तिक मंडळी कां नतमस्तक झाली? निस्संदेह अल्लाहच्या वाणीची ही जादुमय अभिव्यक्ती होती की ज़िच्या आश्चर्यकारक व मधुर अभिव्यक्तीमध्ये ते निमग्न झाले होते आणि त्यांना कल्पना नव्हती की ते काय करू पाहत आहेत?

**५)** तुफैल बिन उमरू दौसी आपल्या टोळीचा सरदार व एक मोठा कवी होता. एके दिवशी तो मक्केला आला. तेव्हा कुरैशपैकी काही लोक त्याच्याकडे आले आणि त्याला खबरदार करीत म्हणाले, पाहा, त्या मुहम्मद (स.) नावाच्या व्यक्तीकडे कदापि जाऊ नका आणि त्या व्यक्तीचे म्हणणे ऐकू नका कारण तिच्या बोलण्यात कमालीची जादू आहे. ते ऐकून मनुष्य आपल्या शुध्दीवर नियंत्रण राखू शकत नाही, परंतु तुफैलने त्यांचे म्हणणे ऐकले नाही, स्थितीची चौकशी करण्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीने त्याला त्यांच्या सेवेत हजर केले. पैगंबरांनी त्याला पवित्र कुरआन ऐकविले, तेव्हा तो स्वत: वरील ताबा हरवून

उद्‌गारला, 'अल्लाह शपथ! याच्यापेक्षा चांगली वाणी मी कधीही ऐकली नाही.' आणि असे म्हणून त्याने स्वत: इस्लाम धर्म स्वीकारल्याची घोषणा केली.

**६)** उमर (रजि.) इस्लाम धर्म स्वीकारण्यापूर्वी प्रेषित (स.) यांचे कट्टर शत्रूपैकी एक होते. एकेदिवशी रागाच्या भरात या निश्चयाने बाहेर पडले की मी या उपद्रवाचा अंतच करून टाकीन. परंतु रस्त्यातच आपल्या बहिणीच्या घरी सूरह ताऽहाऽ ऐकण्याचा योग आला. ते ऐकल्यावर इस्लाम व इस्लामच्या प्रेषितांशी त्यांचे शत्रुत्व विश्वास व श्रध्देत परिवर्तित झाले. *(इब्ने हिशाम - भाग - १)*

**७)** जुबैर बिन मुतइम एकदा रस्त्याने जात होते. प्रेषित (स.) मगरिब (संध्याकाळ)च्या नमाजमध्ये सूरह तूरचे पठन करीत होते. जुबैर उभे राहून ऐकू लागले आणि सूरहचे शब्द बाण बनून हृदयात उतरत गेले अंतत: तेथेच त्यांनी इस्लाममध्ये प्रवेश केला.

पवित्र कुरआन्‌च्या मंत्रमुग्ध करून टाकणाऱ्या अलंकारिक शैलीचे वैशिष्ट्य असे आहे की हा काही काव्य अथवा वाङ्‌मयाचा ग्रंथ नाही तर नीतिमत्ता, उपदेश, आज्ञा व निर्देशांचा ग्रंथ आहे. प्रसाद गुण व अलंकारिक शैलीच्या चमत्काराचे खरे क्षेत्र काव्य, साहित्य व रज़्ज़चे (युध्दात सैनिकांना प्रेरणा देणारे काव्य) जगत होय. म्हणूनच जागतिक इतिहासात ज्या लोकांनी आपल्या अलंकारिक भाषेच्या नैपुण्याची छाप बसविली आहे त्यांनी साहित्यिक लेख व काव्याव्दारेच बसविली आहे. असले एकही उदाहरण प्रस्तुत केले जाऊ शकत नाही की एखाद्याने नीतिमत्ता व धर्मासारख्या शुष्क विषयावर बोलून अथवा लिखाण करून अलंकारिक शैलीचा एखादा मानबिंदु प्रस्थापित केला असेल. याशिवाय साहित्यिक लेख व रज़्ज़ व काव्याची स्थितीदेखील अशीच आहे की कोणत्याही श्रेष्ठतम रचनेतसुध्दा प्रांरभापासून अखेरपर्यंत अलंकारिक भाषेचा प्रभाव एक समान टिकून राहत नाही. त्यांच्या काही भागांचा दर्जा जर उच्च कोटीचा असेल तर काहीचा सामान्य कोटीचादेखील असेल. परंतु पवित्र कुरआनची गोष्ट काही वेगळीच आहे. तो धार्मिक निर्देश व धर्मकायद्याच्या आज्ञांचा ग्रंथ असूनदेखील अनुपम अलंकारिक भाषेने युक्त आहे. आणि अलंकारिक भाषेच्या शोभिवंत वस्त्राने त्याचे संपूर्ण शरीर झाकून टाकले आहे. मानवी बुध्दीला हे स्वीकार करावे लागेल की ही वस्तुस्थिती प्रत्यक्षात येऊ शकली नसती जर पवित्र कुरआन मानवी रचना असता. म्हणूनच हा ग्रंथ प्रेषित मुहम्मद (स.) यांची किंवा एखाद्या अन्य माणसाची वाणी नाही. ही निश्चितपणे त्या अल्लाहची वाणी आहे जो सर्व अलंकारिक भाषा - तज्ज्ञाप्रमाणेच खुद्द अलंकारिक भाषा-नैपुण्याचासुध्दा निर्माता आहे.

**(८) आठवे प्रमाण** - पवित्र कुरआन अल्लाहची वाणी असण्याचे आठवे प्रमाण 'त्याची

शिकवण' आहे. कुरआन शिकवणींचें परीक्षण केले गेले तर असे कळेल की एकीकडे तर त्यात पराकोटीचा समतोलपणा व नैसर्गिक बुध्दिमत्ता आढळते व दुसरीकडे तो मानवजातीसाठी एक अत्यंत व्यापक मार्गदर्शन आहे. त्यात अध्यात्माची आवश्यक तथ्ये आणि धर्माच्या नियम व श्रध्देचा तपशीलसुध्दा आहे आणि मानवी नैतिकता व शिष्टाचाराचे विश्लेषणसुध्दा आहे. खऱ्या उपास्याच्या उपासनेसंबंधी विस्तृत निर्देशसुध्दा आहेत आणि त्याच्या अधिकारासंबंधी तपशीलवार उपदेशसुध्दा आहेत. व्यक्तीला प्रशिक्षण देण्याच्या पध्दतीसुध्दा आहेत आणि समाज रचनेचे नियमसुध्दा आहेत. कौटुंबिक, सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक व राजनीतिक आज्ञादेखील आहेत आणि तह व युध्दांचे शिष्टाचार आणि कायदेही आहेत. या शिकवणीपैकी जेथे सामूहिक आज्ञांचा संबंध आहे त्यांचे स्वरूप जगातील सर्व व्यवस्थेंपेक्षा भिन्न आहे. त्या प्रत्येक जात, प्रत्येक काळ आणि प्रत्येक देशासाठी समान रूपाने योग्य आहेत, शतकानुशतके योग्य सिध्द झाल्या आहेत. भविष्यातदेखील जेव्हां-जेव्हा त्यांचा अंगीकार केला जाईल तेव्हा त्या योग्य असल्याचे सिध्द होईल. याशिवाय हे मार्गदर्शन आपल्या औचित्य व सत्यतेवर आणि आपल्या व्यावहारिक परिणामांच्या चांगुलपणावर दृढ प्रमाण व अटळ साक्ष बाळगतात. त्यांच्या पायावर मानवी जीवनाची जेव्हा-जेव्हा उभारणी केली गेली त्याला आनंदच आनंद प्राप्त झाला...विचार करा की या अनुपम मार्गदर्शन प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या स्वनिर्मित होत्या का? हा विचार करताना दोन उघड वास्तविकतांना अवश्य डोळ्यांसमोर ठेवा. एक तर असे की हे पारलौकिक, धार्मिक, नैतिक, सांस्कृतिक व या राजनीतिक ज्ञान व चर्चा ज्यांच्यासंबंधी पवित्र कुरआनने इतक्या यशस्वीरित्या चर्चा केलेली आहे त्या सामान्य दर्जाचे ज्ञान व चर्चा नाहीत. ते असे उच्चकोटीचे ज्ञान आहे ज्याच्याविषयी बोलण्याचा अधिकार व अंतर्दृष्टीचे स्थान प्राप्त करण्यासाठी आयुष्ये खपविली जातात. तेव्हा कोठे एखाद्या दुसऱ्या व्यक्तीला हा अधिकार व स्थान प्राप्त होतो. दुसरे असे की ज्या माणसाने पवित्र कुरआन प्रस्तुत केला होता त्याची जीवनकथा अशी आहे की तो अरबस्थानसारख्या मागासलेल्या देशात जन्मला होता. त्याचे बालपण एक अनाथ म्हणून गेले होते. कुमारावस्था मेंढपाळ म्हणून व तारूण्य व्यापारात व्यतीत झाले होते. तो उम्मी (अशिक्षित) होता. त्याला शिक्षण-प्रशिक्षणाचे वारेदेखील लागले नव्हते. तो साहित्यकारांच्या नावानेदेखील अपरिचित होता. मक्केतील लोक त्याला एक शांत, चारित्र्यसंपन्न, शांतताप्रिय, सत्यनिष्ठ व सज्जन नागरिक म्हणून तर अवश्य ओळखत होते. परंतु चाळीस वर्षापर्यंत कोणीही त्याला कधीही ज्ञान व विवेकाच्या गोष्टी करतांना ऐकले नव्हते. कोणीही त्याला अध्यात्म व नैतिकता, जीवनाचे सामूहिक प्रश्न, कायदा व राजकारणावर एकदादेखील चर्चा करताना पाहिले नव्हते. कोणीही त्याला अल्लाहचे अस्तित्व, एकेश्वरत्व वह्य (ईशसंदेश)

प्रेषितत्व, परलोक, सत्कर्माचे बक्षिस व दुष्कर्माची शिक्षा, स्वर्ग व नरक, दैवी ग्रंथ व पूर्वीच्या प्रेषितत्वावर कधी एक शब्दसुध्दा उच्चारताना ऐकले नव्हते. परंतु आपल्या चाळीस वर्षाच्या जीवनाच्या साध्या पार्श्वभूमी वर त्याने अकस्मात जगाला ती वाणी ऐकविण्यास सुरवात केली जी या अनुपम मार्गदर्शनवर आधारित आहे. निस्संदेह ही दोन्ही सत्ये ज्यांचा मध्यान्हाच्या सूर्याप्रमाणे इन्कार करणे शक्य नाही त्यांना डोळ्यांसमोर ठेऊन विचार करणारा कोणताही मनुष्य असा विचार करू शकत नाही की हे मार्गदर्शन प्रेषित मुहम्मद (स.) यांचे स्वनिर्मित आहे. याउलट त्याचा निर्णय केवळ असाच असेल की हे मार्गदर्शन अल्लाहच्या संदेशाचा परिणाम आहे. जसे की त्यांच्या प्रस्तुत करणाऱ्याने वारंवार भर देऊन आणि पूर्णत: स्पष्टपणे सांगितले आहे.

**(९) नववे प्रमाण** - या दाव्याचे नववे प्रमाण ते निर्णय आहेत जे पवित्र कुरआनच्या अनुसरणाने जगासमोर प्रस्तुत केले आहेत. मसीह (अ.) (येशू ख्रिस्त) यांनी खऱ्या पैगंबरांची ओळख अशी सांगितली आहे की 'तुम्ही त्यांना त्यांच्या फळाने ओळखाल.' हीच गोष्ट खुद्द पवित्र कुरआनने एका वेगळ्या पध्दतीने अशी सांगितली आहे की 'कलमा तय्यबा' (म्हणजे पवित्र कुरआनचे आवाहन) याचे उदाहरण एखाद्या चांगल्या जातीच्या वृक्षाप्रमाणे आहे की ज्याच्या मुळ्या जमिनीत खोलवर गेलेल्या आहेत आणि फांद्या आकाशापर्यंत पसरलेल्या आहेत आणि ते वृक्ष सदैव आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने उत्तम फळे देत असते. (सूरह इब्राहीम - २४, २५) जणू एखाद्या ग्रंथाचे दैवी ग्रंथ असण्याचे स्पष्ट चिन्ह असे आहे की तो आचार-विचार व व्यवहार प्रत्येक दृष्टीने मनुष्याला किती सरळ मार्गी, सदाचारी व यशस्वी बनवितो. जर एखाद्या पैगंबर व ग्रंथाचा खरेपणा जाणून घेण्याची ही एक अचूक व यशस्वी कसोटी असेल आणि निस्संदेह गोष्ट अशीच आहे तर हे मान्य करावे लागेल की प्रेषित मुहम्मद (स.) एक पैगंबर व पवित्र कुरआन एक दिव्य ग्रंथ आहे. कारण धर्मांच्या ज्ञात इतिहासात कोणताही अन्य ग्रंथ असा नाही जो या कसोटीवर पवित्र कुरआनपेक्षा अधिक यशस्वी सिध्द झाला असेल. या ग्रंथाव्दारे जी क्रांती प्रत्यक्षात आली त्यापेक्षा अधिक महान अधिक परिपूर्ण व अधिक सदाचारी क्रांतीचे कोणतेही उदाहरण मिळू शकत नाही. बारा लक्ष चौरस मैलांच्या विस्तृत प्रदेशात पसरलेले लढवय्ये, अवज्ञाकारी, असभ्य व विखुरलेल्या अरबांना या ग्रंथाने जगातील सर्वांत अधिक मानवता-प्रिय, संगठित, मवाळ स्वभावी व कल्याणकारी समुदाय बनवून टाकले. त्याच्या मार्गदर्शनाने असले लोक तयार केले ज्यांचे अस्तित्व मानवतेच्या उच्चतम बिंदूची व्याख्या आहे. असला समाज निर्माण केला जो साक्षात न्याय व उपकार होता. असले राज्य स्थापन केले जे या पृथ्वीवरील खऱ्या अर्थी स्वर्गीय साम्राज्य होते. पवित्र कुरआनने दिलेल्या या फळांना पाहून कोण सांगू शकतो की त्याने आपल्यासंबंधी

जो दावा केला होता, तो चुकीचा व खोटा होता? दुष्कर्मीच्या वेलीवर चांगुलपणाचे व असत्याच्या फांदीवर सत्याचे पुष्प आजपर्यंत कदापि उमललेले नाही. मग हे कसे शक्य आहे की ज्या ग्रंथ व आवाहनाचा पायाच असत्य व फसवेगिरीवर आधारित असेल. त्यापासून जगात सन्मार्गीपणा व प्रामाणिकपणाचा वसंत ऋतु कसा बहरेल?

**(१०) दहावे प्रमाण -** याचे दहावे प्रमाण असमर्थतेमुळे स्पष्ट झालेली ती पूर्ण शांतता आहे जी पवित्र कुरआनच्या स्पष्ट आव्हानाच्या उत्तरादाखल अवलंबिली गेली आहे. पवित्र कुरआनचा इन्कार करणाऱ्यांनी जेव्हा प्रत्येक प्रमाणाकडून आपले कान बंद करून घेतले आणि त्याला अल्लाहचा ग्रंथ न मानण्याचा आग्रह धरून बसले तेव्हा पवित्र कुरआनने त्याला उतरविणाऱ्या अल्लाहकडून त्यांना आव्हान देऊन टाकले.

*'जर तुम्हाला या ग्रंथाच्या बाबतीत की जो आम्ही आपल्या दासावर (मुहम्मद (स.)) उतरविला आहे. (आमच्याकडून असल्याबद्दल) काही शंका असेल तर त्याच्यासारखा एकच सूरह रचून आणा आणि या कार्यासाठी अल्लाहला सोडून आपल्या सर्व प्रतिनिधींनासुध्दा बोलवून घ्या, जर तुम्ही आपल्या विचारात खरे असाल.'* (सुरतुल बक़रह - २३)

म्हणजे जर तुम्ही आपला हा विचार खरा समजत असाल की हा पवित्र कुरआन अल्लाहची वाणी नाही आणि एका मनुष्याची वाणी आहे. तर ही चर्चा तुमच्या बाजूने आता समाप्त होऊ शकते. आणि ती अशा प्रकारे की तुम्हीसुध्दा शब्द व अर्थ या गुणांनी युक्त असाच एक ग्रंथ जसा की पवित्र कुरआन आहे रचून आणा. इतकेच नव्हे तर त्याच्यासारखा एखादाच सूरह (अध्याय) रचून प्रस्तुत करा. याशिवाय या बाबतीत तुमच्यावर असेही बंधन नाही की तुमच्यापैकी कोणी एकाच व्यक्तीने हे कार्य करून दाखवावे. उलट तुम्हाला या बाबतीत पूर्ण स्वातंत्र्य आहे. तुम्ही सर्वांनी मिळून आणि ज्या कोणाला तुमच्या सहाय्यासाठी तुम्ही बोलवू इच्छिता त्याला बोलवून प्रयत्न करून पाहा. येथपावेतो की संपूर्ण मानवजातीला या कामासाठी गोळा करण्याची तुम्हाला पूर्ण मुभा आहे. जर तुम्ही या आव्हानाचे योग्य उत्तर देण्यात यशस्वी झाला तर पवित्र कुरआन मानवी वाणी आहे ही गोष्ट मान्य होईल. मग पवित्र कुरआन स्वत:ला दिव्यवाणी म्हणण्याचे सोडून देईल. ही गोष्ट उघड आहे की जर एकटा मनुष्य (प्रेषित मुहम्मद (स.)) पवित्र कुरआनची रचना करू शकतो की जो निरक्षर आहे आणि ज्याच्या वक्तृत्व व काव्याची ख्याती अद्याप कोणीही ऐकली नाही, तर तुमच्या संपूर्ण टोळीसाठी, की ज्यात मोठमोठे कवी व प्रसिध्द वक्ते आहेत, त्याचे उत्तर संपादित करून प्रस्तुत करणे अजिबात दुष्कर ठरणार नाही. तुम्ही अगदी सहजपणे हे आव्हान स्वीकारून त्या माणसाचे तोंड बंद करू शकता. हे आव्हान त्या अरबांना दिले गेले होते की ज्यांना आपल्या अलंकारिक

भाषेच्या सौंदर्याचा गर्व होता आणि जे आपल्या वक्तृत्वचातुर्याच्या सार्थ अभिमानात उरलेल्या संपूर्ण जगास अजम (मुका) म्हणून संबोधित असत. परंतु संपूर्ण अरबस्थान हे आव्हान ऐकून स्वत:च मुका झाला. हे सांगण्याची गरज नाही की या लोकात पवित्र कुरआनला मानवी वाणी असल्याचे सिध्द करण्याची किती उत्कट अभिलाषा होती. हे कदापि शक्य नव्हते की आपली ही इच्छा पूर्ण करून घेण्यासाठी काही शक्कल लढविणे अथवा युक्ती करणे त्यांच्या हातात असते तर ती अवलंबिण्यास त्यांनी एका क्षणाचादेखील विलंब केला असता. त्यांनी पवित्र कुरआनला दैवीग्रंथ न मानून अशी कोणती हानि होती जी त्यांनी संहन केली नाही? त्यांची सरदारकी हिरावून घेतली गेली, तुरूंगवासाचा अपमान त्यांना सहन करावा लागला. काबागृहातून आपल्या पैतृक उपास्यांची हकालपट्टी व त्यांचा धराशायी होण्याचा अशुभ दिवस त्यांना पाहावा लागला. ते रक्तबंबाळ झाले. परंतु हे धोके व अत्यंत वाईट परिणामापासून वाचण्यासाठी जी एक सोपी युक्ती त्यांच्या समक्ष ठेवली गेली होती तिचा त्यांनी उपयोग केला नाही. वास्तविकत: त्या बाबतीत त्यांना वारंवार सावध केले गेले होते. मक्केतसुंध्दा कित्येक वेळा त्यांच्यासमोर हे आव्हान ठेवले गेले होते आणि नंतर मदीना शहरातदेखील त्याची पुनरावृत्ती केली गेली. परंतु त्यांनी त्याचा कदापि स्वीकार केला नाही. काय बुध्दी ही गोष्ट मान्य करू शकते की त्यांच्यात स्वीकार करण्याची शक्ती असूनदेखील त्यांनी स्वत: असे केले नाही?

हे आव्हान आजसुध्दा आपल्या जागी जसेच्या तसे आहे. जगातील अन्य दैवीग्रंथाप्रमाणे पवित्र कुरआनची भाषा मृत झालेली (अप्रचलित) नाही. उलट आपल्या प्राचीन व वर्तमान सर्व प्रकारच्या भांडवलासह जिवंत आहे. आणि ती भाषा बोलणाऱ्या व जाणणाऱ्या लोकांत मोठमोठाले प्रसिध्द साहित्यिक व तज्ञ-पंडित आहेत की ज्यात इस्लामच्या कडव्या विरोधकांचीसुध्दा काही उणीव नाही. हवे तर त्यांनी ते आव्हान स्वीकारावे. परंतु चौदाशे वर्षांची शांतता ओठांना गती देईल असे वाटत नाही.

हे लक्षात असावे की जगाच्या विभिन्न कोपऱ्यात मुस्लिम पसरले आणि त्यांच्याबरोबर पवित्र कुरआनच्या लक्षावधी व कोट्यवधी प्रती तेथे पोचल्यामुळे हे आव्हान हिजरी सनाच्या पहिल्या शतकापासूनच प्रसिध्द झाल्यामुळे सर्वांना कळलेले आहे. जर ते कुठेही आणि केव्हाही स्वीकारले गेले असते तर ही एक अशी घटना ठरली असती जी नैसर्गिकरीत्या संपूर्ण जगात प्रसिध्द झाली असती. त्याला कारण असे की इस्लाम व पवित्र कुरआनच्या विरोधकासाठी हा उघड विजय व एक महान देणगी ठरली असती. त्यानी या वार्तेला इतकेच नव्हे तर पवित्र कुरआनच्या या उत्तराचे खंडन करण्यासाठी पूर्ण जोश व तन्मयतेने सर्वत्र पसरविले असते आणि त्याच्या परिणामस्वरूप केवळ असेच नव्हे तर मुस्लिमेतर जगताला पवित्र कुरआनसंबंधी आपल्या नकाराच्या बाबतीत प्रमाण व पुष्टी

मिळाल्याबद्दल समाधान प्राप्त झाले असते. इतकेच नव्हे तर ही घटना खुद्द मुस्लिमांसाठीदेखील धर्म त्यागाचे कारण ठरली असती. परंतु ही वास्तविकता मुस्लिम व मुस्लिमेतर सर्वच मान्य करतात की इतिहासात अशा प्रकारच्या कोणत्याही घटनेचा अजिबात उल्लेख नाही.

**(११) अकरावे प्रमाण** - पवित्र कुरआन दैवीग्रंथ असल्याबद्दलचा अंतिम पुरावा प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलेल्या लोकांची साक्ष आहे. हा पवित्र कुरआन पैगंबर मुहम्मद (स.) यांनी प्रस्तुत केला आहे. त्यांनी हा आपल्याकडून प्रस्तुत केला नाही. तर महान अल्लाहकडून प्रस्तुत केलेला आहे. त्यांनी ही गोष्ट वारंवार सांगितली आहे की मी जी वाणी प्रस्तुत करीत आहे ती माझ्यावर महान अल्लाहकडून अवतरली आहे. तो आपल्या ज्येष्ठ फरिश्त्याला - देवदूताला (जिब्रईल अ. यांना) माझ्याकडे पाठवीत असतो आणि ते मला ती वाणी ऐकवीत असतात. अशी विचारणा होईल की काय हे आवश्यक आहे की त्यांचे हे कथन व ही साक्ष सत्य असल्याचे मान्य केले जावे? याचे उत्तर असे आहे की त्यांचे व्यक्तित्व ते व्यक्तित्व आहे की ज्यांचा सत्यवचनीपणा नेहमीच शंका व संशयापासून दूर राहिला आहे. केवळ स्वजनच नव्हे तर दुसरेदेखील त्यांना सत्यवचनी मानीत असत. ही गोष्ट सर्व जगाला ज्ञात आहे. की त्यांच्या विरोधात त्या अरब लोकांनी ते सर्वकाही सांगून व करून टाकले जे त्यांना शक्य होते. परंतु त्यांनी कधीही ही गोष्ट अमान्य केली नाही की ते एक खरे व विश्वस्त व्यक्ती आहेत. प्रेषितत्व प्राप्त होण्यापूर्वी मक्केतील सर्वसामान्य व खास-प्रतिष्ठित लोकांनी त्यांना 'सत्यनिष्ठ' व 'विश्वासू' अशी उपनावे देऊन टाकली होती. प्रेषितत्वाच्या घोषणेनंतर जरी त्यांनी विशेषत: या दाव्याबद्दल त्यांचा खरेपणा मान्य केला नाही आणि त्यांनी वारंवार सांगूनदेखील पवित्र कुरआनला दिव्यवाणी म्हणून मान्य केले नाही. परंतु जेथपावतो या विशिष्ठ बाबीशिवाय अन्य गोष्टींचा प्रश्न आहे, ते त्यांच्या सत्य निष्ठा व प्रामाणिकतेबद्दल अद्याप त्यांचे प्रशंसक होते. अबूसुफयानसारख्या कट्टर शत्रूला जेव्हा कैसरने आपल्या दरबारात विचारले, 'प्रेषितत्वाचा दावा करण्यापूर्वी तुम्ही त्या व्यक्तीवर खोटे बोलण्याचा कधी आरोप केला होता काय?' तेव्हा त्यांनी आपले अत्यंत कट्टर शत्रुत्व असूनदेखील 'होय' म्हणून उच्चार केला नाही. त्याने पुन्हा विचारले, 'हा मनुष्य वचन भंग करतो का?' तेव्हा त्यांना सांगणे भाग पडले की 'नाही' अजूनपर्यंत तर त्याने कधी असे केले नाही. तथापि हल्ली आमच्या आणि त्याच्या दरम्यान एका तहाचा करार (हुदैबियाचा तह) अंमलात आहे, हे सांगणे कठीण आहे की या बाबतीत त्याचा कसा व्यवहार राहील? (बुखारी) अशाच प्रकारे इस्लामच्या शत्रूंचा पुढारी अबू जहल याने एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशी बोलतांना सांगितले की 'आम्ही आपल्याला खोटारडे' म्हणत नाही परंतु ज्या गोष्टी आपण प्रस्तुत करीत आहात आम्ही त्यांना खोटेच समजतो - (हाकिम) बद्रच्या युध्दाप्रसंगी

अखनस बिन शुरैक नावांच्या त्याच्या एका सोबत्याने एकांतात त्याला विचारले, 'खरे खरे सांगा, तुम्ही मुहम्मद (स.) यांना खरा समजता की खोटा?' त्याने उत्तर दिले, 'ईश्वर शपथ! मुहम्मद (स.) एक खरा मनुष्य आहे. तो आयुष्यभर कधी खोटे बोलला नाही.' (इब्ने जरीर) या वास्तविकता समोर ठेवा आणि मग निर्णय करा की पवित्र कुरआन दैवी ग्रंथ असल्याची जी ग्वाही प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दिली आहे ती सत्य असल्याचे मान्य करणे आवश्यक आहे की नाही? आणि ज्याने कोणत्याही माणसाला कोणत्याही बाबतीत कधी खोटे सांगितले नाही तो आपल्या अल्लाहच्या नावाने असा बिन धास्त खोटे बोलेल का? त्या अल्लाहच्या नावाने की जो सर्वकाही जाणतो आणि ऐकतो, ज्याच्या शक्तीच्या बाहेर कोणतीही गोष्ट असू शकत नाही आणि जो दोन्ही जगताचा सर्वसत्ताधारी आहे. मग असत्यही असे की जे एकदा दोनदा नव्हे तर सतत तेवीस वर्षापर्यंत बोलले गेले. आपल्या कोणत्याही शत्रूवर कधीही आरोप न करणारा आपल्या पालनकर्त्यावर नेहमी आरोप करीत राहिला! मानवी व्यवहारात एकदासुध्दा खोटे न बोलणारा अल्लाहच्या बाबतीत एकदादेखील खरे बोलू शकला नाही? मानसशास्त्राचा अभ्यास, अनुभवाची ग्वाही, बुध्दीची परीक्षणे, कोणतीही गोष्ट या अजब दाव्याला अनुमोदन देऊ शकते? नाही आणि निश्चितच नाही!! म्हणून सत्य तर असे आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांची ग्वाही, पवित्र कुरआन दैवी ग्रंथ असल्याबद्दल एक असा पुरावा आहे ज्याच्यानंतर समंजस माणसासाठी एखाद्या अन्य पुराव्याची अजिबात गरज उरत नाही.

पवित्र कुरआन दैवीग्रंथ असल्याबद्दल मोठ्या संख्येने आपल्यासमोर प्रमाण आले. या प्रमाणांचे परीक्षण केल्यास असे आढळेल की कोणताही ग्रंथ ईशग्रंथ असण्याबद्दल स्वाभाविक कारणे आधार असू शकतात अथवा त्या आधारांच्या कारणांना आवश्यक ठरविले जाऊ शकते. या पुराव्यात त्या सर्वच्या सर्व गोष्टी प्रत्यक्षपणे आहेत. या नियमित दाव्याच्या अस्तित्वाची प्रारंभिक आवश्यकता म्हणजे पुरावेसुध्दा आहेत, आंतरिक गुणांचे प्रमाणदेखील आहेत. परिणाम व फळांच्या ग्वाहीसुध्दा आहेत. याशिवाय स्वीकृत प्रमाणसुध्दा आहेत आणि नकारात्मक प्रमाणसुध्दा. हे प्रमाण पाहिल्यावर न्याय्य व सत्यप्रियतेचा निर्णय जो काही शक्य आहे त्याच्यासाठी कसल्याही जाहिरात व वक्तव्याची गरज नाही. निश्चितपणे हा निर्णय याशिवाय अन्य काही असू शकत नाही की पवित्र कुरआनदेखील त्याच कृपापूर्ण मार्गदर्शनाचे एक जाज्वल्य स्वरूप आहे. तो मानवांच्या सृजनकर्त्या व पालन कर्त्याकडून प्रसृत केले गेला आहे आणि तो अल्लाहची वाणी असल्याबद्दल तिळमात्र शंका घेतली जाऊ शकत नाही.

# पवित्र कुरआन आणि दुसऱ्या दैवीग्रंथांचा संबंध

अल्लाहाचे मार्गदर्शन बुध्दी व स्वभावानुरुप मानवाची सर्वांत महत्त्वाची गरज आहे. ते अवतरित होणे व प्राप्त होणे अटळ होते. त्याचप्रमाणे इतिहासाने निरंतर साक्ष दिलेली आहे की ते अल्लाहचे मार्गदर्शन आलेसुध्दा. परंतु आता या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नासंबंधी असे अनेक मौलिक प्रश्न उभे राहतात. त्यांची उत्तरे मिळणे फार आवश्यक आहे. हा क्रम कसा सुरू राहिला आहे? तो नेहमी एक समान राहतो अथवा त्याचे स्वरूप बदलत राहिले आहे? जर एक समान राहिले आहे तर ते मूलत: काय होते? आणि जर त्याचे स्वरूप बदलत राहिले आहे तर आजपर्यंत कोणकोणते मार्गदर्शन आलेले आहेत? उघड आहे की या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे अन्य कोणत्याही माध्यमाने मिळू शकत नाहीत. जर ही मिळू शकतील तर केवळ महान अल्लाहकडून मिळू शकतील. त्याचे व्यावहारिक रूप असे आहे की त्याने अवतरित ग्रंथ पाहावेत. म्हणून आम्ही पवित्र कुरआनचा अभ्यास करतो, की जो दिव्य ग्रंथ असल्याबद्दल आम्ही आता प्रत्येक प्रकारच्या विश्वासपूर्ण साक्षी ऐकल्या आहेत. तर तो आम्हाला या सर्व गोष्टींचा पूर्ण तपशील देतो. त्याचा खुलासा असा आहे.

जगात अल्लाहचे मार्गदर्शन त्याच वेळी अवतरले की जेव्हा मानवाने येथे प्रथम पाऊल टाकले होते. हे मार्गदर्शन मूलत: असे होते की या संपूर्ण सृष्टीच्या स्वामीने तुम्हा मानवांना या जगात आपला प्रतिनिधी व सहाय्यक म्हणून निर्माण केले आहे. त्याकरिता निश्चित सीमेपर्यंत इच्छा व अधिकाराचे स्वातंत्र्यसुध्दा प्रदान केले गेले आहे. म्हणून तुम्ही आपल्या कृतीसाठी व या जगात व्यवहार करण्यास स्वतंत्र आहात. तुम्ही हवी तशी वागणूक अवलंबू शकता. परंतु तुम्हाला हे लक्षात ठेवले पाहिजे की तुमची तीच वागणूकबरोबर ठरेल जी आपल्या निर्मात्याचे व आपल्या स्वामीचे स्थान मान्य करून त्याच्या अधिकारांना योग्य असल्याचे मान्य करण्यावर अवलंबून आहे. 'त्याच्या स्थानाला खऱ्या अर्थी मान्य करणे असे आहे की स्वत:ला पूर्णत: स्वतंत्र व स्वायत्त समजू नका आणि अल्लाहशिवाय इतर कोणाचा दासदेखील समजू नका. एकीकडे तर स्वत:ला केवळ दास समजा आणि दुसरीकडे अल्लाहलाच आपला शासक व उपास्य समजा आणि त्याच्याशिवाय इतर कोणालाही आपल्या आज्ञापालन, आपल्या उपासनेचा अधिकारी व आशा स्थान समजू नका. त्याचे अधिकार मानणे म्हणजे तुम्ही स्वत:ला त्याच्या इच्छेला समर्पित करा. तो तुम्हाला जीवन जगण्यासाठी ज्या आज्ञा देईल त्याप्रमाणे आपले जीवन जगा. हे जग मूलत: एक परीक्षा-स्थळ आहे जेथे तुम्हाला अधिकार-स्वातंत्र्य देऊन निर्माणच या हेतूने केले आहे की हे पाहिले जावे की तुम्ही आपल्या अधिकाराचा वापर

स्वत:च त्याची उपासना व दासत्वाचे कर्तृत्व बजावण्यासाठी करता किंवा नाही? म्हणून तुम्हाला एकेदिवशी आपले हे जीवन संपवून एका दुसऱ्याजगात दाखल व्हावे लागेल. जेथे तो तुमच्या ऐहिक जीवनातील वागणूक व सर्व कृत्ये पाहून निर्णय करील की तुमच्यापैकी कोण या परीक्षेत यशस्वी झाला आहे आणि कोण अयशस्वी सिध्द झाला आहे? ज्या व्यक्तीने येथील जीवनात बरोबर वागणूक अवलंबिली असेल त्याला येथेही सुख-शांती प्राप्त होईल. तेथे ही चिरकालीन आराम व आनंदाचे ते घर प्राप्त होईल की ज्याचे नाव स्वर्ग आहे आणि जो अशी वागणूक अवलंबिण्यात अयशस्वी होईल त्याचे हे जीवनसुध्दा अस्वस्थता व त्रासात जाईल आणि तेथे पोचल्यावरसुध्दा त्याला चिरकालीन दु:ख व यातनेच्या त्या भयंकर खड्ड्यात फेकून दिले जाईल की ज्याचे नाव नरक आहे. या मार्गदर्शनासह मानवाने आपल्या जीवनाचा प्रारंभ केला. परंतु जेव्हा एक दीर्घकाळ लोटला तेव्हा या मार्गदर्शनाकडून बेपर्वा करणाऱ्याचेतनांनी उचल खाल्ली. मग एक वेळ अशी आली की जेव्हा लोकांना त्याचा पूर्णपणे विसर पडला आणि योग्य वागणूक सोडून त्यांनी चुकीच्या मार्गाचा अवलंब केला. नैसर्गिकरीत्या अल्लाहच्या कृपेने त्यांच्याकडे लक्ष दिले आणि मार्गदर्शनाचा हा विझलेला दिवा पुन्हा प्रज्वलित केला. जेणेकरून येणाऱ्या जातीना अंधारात चुकीच्या मार्गावर भटकत राहणे भाग पडू नये. पुढे जाऊन आदम (अ.) यांची संतती पृथ्वीच्या लांबच्या कानाकोपऱ्यापर्यंत पसरली. म्हणून महान अल्लाहने आवश्यकतेनुसार प्रत्येक प्रदेशाच्या लोकासाठी वेगवेगळे मार्गदर्शन-ग्रंथ पाठविले, परंतु प्रत्येक मार्गदर्शन-ग्रंथाशी अंतत: तसाच व्यवहार केला गेला जसा की पूर्वी केला गेला होता. त्याच्याशी गफलत बाळगली गेली. विस्मरण केले गेले, मनाशी उद्देश बाळगून आपल्या इच्छेनुसार ते परिवर्तीत करून घेतले गेले. म्हणूनच या गोष्टीची गरज भासली आणि निरंतर भासत राहिली की महान अल्लाहने आपल्या वंचित दासांना आपल्या मार्गदर्शनाने भाग्यवान बनवावे. हा क्रम चालत राहिला, येथपावेतो की पवित्र कुरआन नामक मार्गदर्शन-ग्रंथ उतरला, जो अल्लाहच्या कृपेच्या क्रमाची शेवटची कडी आहे. मूलत: महान अल्लाहने पाठविलेले सर्व मार्गदर्शन-ग्रंथ अगदी एकसारखे होते त्यात जर काही फरक व विरोध होता तर तो केवळ तपशील व आंशिक आज्ञांचा होता. उद्देश व तत्त्वज्ञानमध्ये कदापि काहीही विरोध नव्हता. उद्देश व तत्त्वांच्या दृष्टीने तर एकच संदेश व एकच फर्मान होता जो खऱ्या उपास्याकडून नेहमी आपल्या दासाकडे येत राहिला आहे.

अल्लाहकडून मार्गदर्शनाच्या बाबतीत ही स्पष्टीकरणे समोर आल्यानंतर एक मोठी महत्त्वाची वास्तविकता प्रकाशात येते आणि ती अशी की जगात महान अल्लाहकडून जितके मार्गदर्शन ग्रंथ आलेले आहेत त्यांच्यापैकी कोणीही कोणाचा प्रतिव्दन्द्वी नव्हता, आणि ज्याअर्थी पवित्र कुरआनदेखील त्यांच्यापैकीच एक आहे म्हणून त्याचे स्वरूप व पद

(दर्जा) काही वेगळा असू शकत नाही. निश्चितपणे तोसुध्दा दुसऱ्या दिव्य ग्रंथाचा मित्र व सहयोगी आहे. त्यांचा शत्रू व प्रतिव्दंद्वी नाही कारण यालादेखील अवतरण्याचा उद्देश अगदी तोच आहे जो दुसऱ्या ग्रंथाचा होता आणि त्याच्या शिकवणीचा पाया व तत्त्वेदेखील तीच आहेत जी दुसऱ्या मार्गदर्शन-ग्रंथांची राहिली आहेत. म्हणून त्यांच्याशी यांचा संबंध मतभेद व प्रतिव्दंद्वितेचा नव्हे तर ऐक्य व समन्वयाचा आहे, जसे की त्याने या सत्याचे पूर्ण स्पष्टीकरणासह वर्णन केले आहे. उदाहरणार्थ, तो आपल्या लोकांना समजाऊन सांगतो,

*'अल्लाहने तुमच्यासाठी तोच धर्म निश्चित केलेला आहे ज्याची त्याने नूह (अलै.) यांना दीक्षा दिली होती आणि जो (हे प्रेषित मुहम्मद (स.)) आम्ही तुमच्यावर दिव्य संदेश म्हणून पाठविला होता. आणि ज्याचा आम्ही इब्राहीम (अलै.) व मूसा (अलै.) यांना उपदेश केला होता की या धर्मास प्रस्थापित करा आणि त्यात मतभेद व फाटाफूट करू नका.'* (सूरतुश्शुरा - १३)

याशिवाय इतकेच नव्हे की पवित्र कुरआनने केवळ आपण संबोधित केलेल्या आम लोकांनाच या महान वास्तविकतेची आठवण करून दिलेली आहे. तर स्वत: पवित्र कुरआन आणणाऱ्या प्रेषित मुहम्मद (स.) यांनादेखील असा बोध दिलेला होता. म्हणून पूर्वीच्या अनेक पैगंबरांचा उल्लेख करून सांगितले होते,

*'हे ते लोक आहेत ज्यांना अल्लाहने मार्गदर्शन प्रदान केले होते म्हणून (हे मुहम्मद (स.)) तुम्हीसुध्दा त्यांच्याच मार्गदर्शनाचे अनुसरण करा.'*

(सुरतूल अनआम - ९)

म्हणजे हे एक उघड सत्य आहे की पवित्र कुरआनने आपल्या मूळ मार्गदर्शनाला पूर्वीच्या मार्गदर्शन-ग्रंथांचीच एक नवीन आवृत्ती ठरविले आहे. आणि फर्माविले आहे की माझ्यात व त्यांच्यात कोणताही दुजाभाव व पृथकपणा कदापि नाही. आता ही गोष्ट वेगळी आहे की आज जे ग्रंथ दैवी आहेत म्हणून दावा केला जातो त्यात आढळणारे मौलिक मार्गदर्शन अथवा शिकवणीसुध्दा पवित्र कुरआनच्या शिकवणीपेक्षा बऱ्याच प्रमाणात भिन्न आहेत. या स्थितीचा अर्थ कदापि असा नव्हे की हे ग्रंथ वास्तविकत: दिव्यसुध्दा आहेत आणि त्याचबरोबर हीच त्यांची मूळ शिकवणसुध्दा होती. परंतु असे आहे की एक तर हे ग्रंथ दैवी नाहीत अथवा त्यांची मूळ शिकवण त्यांच्या अनुयायींच्या गफलत, कदर न करणे आणि न्यूनाधिक करण्यास बळी पडलेली आहे. नाही तर हे कदापि शक्य नाही की महान अल्लाहकडून कधी असे मार्गदर्शन-ग्रंथ उतरले असावे की ज्याच्या तात्विक शिकवणी चा व पवित्र कुरआनचा मेळ बसत नसेल.

# पवित्र कुरआनची खास वैशिष्ट्ये

परंतु ही वास्तविकता असूनदेखील की पवित्र कुरआन दुसऱ्या दैवी ग्रंथांचा प्रतिव्दंद्वी नाही तर सहयोगी आहे आणि त्याच्या मौलिक शिकवणी त्याच आहेत ज्या त्यांच्या होत्या. तो त्यांच्या तुलनेत काही खास वैशिष्ट्ये बाळगून आहे आणि म्हणून त्याला एक असे स्थान प्राप्त आहे जे त्याच्याचसाठी विशिष्ट आहे. या वैशिष्ट्यांचा दावा अथवा उल्लेख व घोषणा स्वत: त्याने आणि त्याला आणणाऱ्या पैगंबराने केली आहे आणि ती अशी आहे.

१) पवित्र कुरआनचे अवतरण एखाद्या विशिष्ट जात अथवा प्रदेशासाठी नाही तर संपूर्ण जगासाठी झालेले आहे. संपूर्ण मानवजातीला त्याने संबोधिले आहे म्हणून तो म्हणतो,

*'मोठ्या बरकतीवाला आहे तो (अल्लाह) की ज्याने सत्य व असत्याला पूर्णत: स्पष्ट करणारा (हा पवित्र कुरआन) आपल्या दासावर उतरविला आहे जेणेकरून त्याने संपूर्ण जगाला सावध करावे.'* (सुरतूलफुर्कान - १)

अशाच प्रकारे कुरआनने वारंवार म्हटले आहे,

*'महान अल्लाहने मला आणणारे (प्रेषित मुहम्मद (स.)) यांना संपूर्ण मानवजातीचा पैगंबर बनवून पाठविले आहे.'* (सूरतुस्सबा - २८ व सूरतुल अअराफ - १५८)

त्याच्या या कथनांचासुध्दा हाच अर्थ आहे कुरआन सर्व मानवासाठी अवतरिला गेला आहे.

याच्यापूर्वीच्या कोणत्याही ग्रंथाला हे पद प्राप्त झाले नव्हते, जसे की प्रेषित (स.) यांनी स्पष्ट केले आहे की 'माझ्या पूर्वीचा प्रत्येक प्रेषित विशेषत: केवळ आपल्याच जातीसाठी प्रेषित बनवून पाठविला गेला होता.' (बुखारी) दुसऱ्या शब्दांत असे की पवित्र कुरआनच्या पूर्वीचा प्रत्येक दैवी ग्रंथ केवळ एखाद्या विशिष्ट जातीसाठीच अवतरिला गेला होता.

२) पवित्र कुरआन सर्व क्षेत्रांसाठी एक परिपूर्ण मार्गदर्शन-ग्रंथ आहे. तो एक असा धर्म आहे, एक असा कायदा आहे एक अशी चिंतन व कृतीची व्यवस्था आहे ज्यात मनुष्याच्या श्रध्देच्या, कृतीच्या, बाह्य व आंतरिक, व्यक्तिगत व सामूहिक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय इतकेच नव्हे तर जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रासंबंधी मार्गदर्शन आहे. हे वैशिष्ट्य अन्य कोणत्याही ग्रंथाला प्राप्त नव्हते. म्हणून महान अल्लाहने आपल्या मागील ग्रंथ व मार्गदर्शनापैकी कोणालाही सर्व पैलूने परिपूर्ण ठरविले नव्हते. हे श्रेय केवळ पवित्र

कुरआनला आहे जो अवतरित झाल्यावर त्याने अशी घोषणा केली,

*'आज मी तुमच्यासाठी तुमच्या धर्माला परिपूर्ण केले आणि तुमच्यावर आपली देणगी पूर्ण केली.'* (सूरतुल माइदा)

पवित्र कुरआनमधील या वचनाचा उद्देश अगदी स्पष्ट आहे आणि तो असा की मानवजातीच्या प्रारंभापासून ईशमार्गदर्शनाच्या अवतरणाचा क्रम चालत आला होता. त्या मार्गदर्शनाच्या मौलिक शिकवणी सदैव एकसमान राहिल्या असून तपशीलात गरजेनुसार बदलत व सांस्कृतिक विकासाबरोबर व्यापकता धारण करीत राहिल्या होत्या. त्या आता प्रत्येक पैलूने चरमबिंदूला पोचल्या आहेत.

**३)** कुरआनच्या शिकवणी मानवजातीसाठी जागतिक स्वरूपाच्या आहेत. त्यांच्यावर एखाद्या विशिष्ठ काळाच्या विशिष्ट गरजा अथवा एखाद्या विशेष जातीच्या प्रमुख जनसमूहांच्या निकडींची छाप नाही. त्या एखादी जात अथवा एखाद्या वंशाला आपल्यासमोर ठेवत नाहीत. तर केवळ मनुष्य आणि मानवी प्रवृत्तीला समोर ठेवतात. म्हणून त्या प्रत्येक काळ, प्रत्येक जात, प्रत्येक वंश आणि प्रत्येक प्रदेशाच्या लोकांसाठी समान रूपाने योग्य व गरजेनुसार आहेत. याउलट अन्य प्रत्येक ग्रंथाची दशा अशी आहे की त्यावर एखाद्या विशेष जातीच्या विशिष्ठ दशेची प्रतिछाया प्रत्येक डोळ्याला लांबूनच दिसते, म्हणून दुसऱ्या जातीसाठी त्या योग्य असण्याचा प्रश्नच उभ्दवत नाही. पवित्र कुरआनचा हाच वैशिष्ठ्यपूर्ण गुण आहे ज्याच्या आधारे त्याने आपण आणलेल्या धर्माला 'स्वाभाविक धर्म म्हटले आहे.'

*'दृढ बना त्या प्राकृतिक स्वभावावर ज्यावर सर्वश्रेष्ठ अल्लाहने मानवजातीला निर्माण केले आहे.'* (सुरह रूम - ३०)

आणि जगासमोर स्पष्ट शब्दांत ही घोषणा केलेली आहे,

*'निस्संदेह हा कुरआन तो मार्ग दाखवितो जो सर्वांत अधिक सरळ आहे.'*

(सूरहबनी इस्राईल - ९)

**४)** हा महान अल्लाहचा अंतिम ग्रंथ आहे. यानंतर मार्गदर्शनाच्या अवतरणाचा क्रम बंद झालेला आहे. आता कोणताही अन्य ग्रंथ अथवा कोणताही ग्रंथधारी (म्हणजे प्रेषित) येणार नाही. पवित्र कुरआन आणणाऱ्या प्रेषित मुहम्मद (स.) यांनी या बाबतीत हे स्पष्ट केलेले आहे,

*'यात काही शंका नाही की प्रेषितत्व व पैगंबरीचा क्रम समाप्त झालेला आहे. आता माझ्यानंतर कोणताही प्रेषित येणार नाही की एखादा पैगंबरही येणार नाही.'* (तिर्मिजी)

आणि पवित्र कुरआन आणणाऱ्यासंबंधी महान अल्लाहचा हा निर्णय सांगतो,

*'नाहीतर तो (मुहम्मद स.) अल्लाहचा प्रेषित व सर्वांत अंतिम पैगंबर आहे.'*

(सुरतुलअहज़ाब)

या बाबतीत हे सांगणे अगदी अनावश्यक आहे की पवित्र कुरआन व पवित्र कुरआनधारी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशिवाय अन्य कोणत्याही ग्रंथ आणि पैगंबराची अशी स्थिती नव्हती.

५) या ईशग्रंथाने पूर्वीच्या सर्व ईशग्रंथाना रद्द केले आहे. आणि आता महान अल्लाहकडून मंजूर झालेला कोणताही दुसरा ग्रंथ उरला नाही. आता जीवनात योग्य वागण्याची आणि चिंतन व कृतीची कल्याणकारी रीत केवळ याच पवित्र कुरआनपासून मिळू शकते. ही गोष्ट उघड आहे की याचा अर्थ हा कदापि नाही की अन्य ग्रंथ ईशग्रंथ असण्याचा इन्कार केला गेला आहे. याचा अर्थ असा आहे की ज्या खऱ्या उपास्य व खऱ्या शासकाने या ग्रंथांना अवतरले होते त्याचाच आता हा निर्णय आहे की त्या ग्रंथांना यापुढे आचारसंहिता व जीवनविधान बनविले जाऊ नये. केवळ माझ्या अंतिम ग्रंथ कुरआनला हे स्थान दिले जावे. या ईशनिर्णयानुसार अरब व अरब सोडून इतर लोक, काळे व गोरे, आशियाई व युरोपीय सर्व लोकासाठी हे आवश्यक आहे की त्यांनी कुरआनचेच अनुसरण करावे. त्याला कारण असे की आता यापुढे केवळ याचेच अनुसरण महान अल्लाहची उपासना ठरू शकेल. महान अल्लाहचा हा निर्णय ज्या शब्दांत वर्णित आहे ते असे आहेत.

*'निस्संदेह (आता) अल्लाह जवळ (प्रिय व मान्य) धर्म इस्लाम आहे.'*

(सूरह-आले इम्रान)

*'जो कोणी इस्लामला सोडून अन्य एखाद्या धर्माला पसंत करील तर (अल्लाहच्या हुजुरात) त्याच्याकडून त्या धर्माचा कदापि स्वीकार केला जाणार नाही.'*

(सूरह आले इम्रान)

येथे या स्पष्टीकरणाची अजिबात गरज नाही की या आयतीत सकारात्मक व नकारात्मक दोन्ही पैलूने ज्या 'इस्लाम' धर्माविषयी ही स्पष्ट घोषणा केली गेली आहे, तो कुरआनच्या धर्माचेच सर्वपरिचित नाव आहे. इस्लामशिवाय आता कोणताही धर्म अल्लाहजवळ प्रिय व मान्य नाही म्हणजे वास्तविकत: आता पवित्र कुरआनशिवाय कोणताही दुसरा ग्रंथ आज्ञापालनासाठी अल्लाहला मान्य होण्यासाठी उरला नाही. या गोष्टीचे अधिक स्पष्टीकरण व समर्थन या गोष्टीनेसुध्दा होते की यहूदी (ज्यू) व ख्रिश्चनापैकी ज्या लोकांनी पवित्र कुरआनवर ईमान (विश्वास) आणले नाही त्यांना त्याने स्पष्ट शब्दांत अल्लाहचा

अंवज्ञाकारी, विद्रोही आणि कोपास पात्र ठरविले.

*(बय्यिना - १, सुरतुन्निसा - १५०, १५१)*

**७)** सध्या केवळ हाच एक असा ग्रंथ आहे जो पूर्णपणे सुरक्षित राहिलेला आहे ज्यात काही कमी झाले नाही व अधिक ही झाले नाही, आणि कोणतेही परिवर्तन झाले नाही. ज्या भाषेत, ज्या शब्दांत, ज्या वाक्यांत व ज्या क्रमाने तो महान अल्लाहकडून अवतरला होता तो जसाचा तसा त्याच स्वरूपात संरक्षण अस्तित्वात आहे आणि असे महान अल्लाहच्या विशेष व्यवस्थेमुळे झाले आहे. याची घोषणा त्याने आपल्या याच ग्रंथात केलेली आहे.

*'निश्चितपणे हा पवित्र कुरआन आम्ही अवतरला आहे आणि निश्चितपणे आम्ही स्वत: त्याला सुरक्षित ठेवणार आहोत.'* (सूरह हजर)

ही गोष्ट उघड आहे की महान अल्लाहची ही व्यवस्था, ही घोषणा व निर्णयाला काळ बदलू शकत नव्हता म्हणून इतिहासाप्रमाणेसुध्दा हे एक सर्वमान्य सत्य आहे की कुरआनमध्ये एखादा क्षुल्लकसुध्दा परिवर्तन होऊ शकला नाही. (ही चर्चा पूर्ण प्रमाण व पूर्ण तपशीलासह पुढे देण्यात येत आहे.)

याच्या तुलनेत दुसऱ्या ग्रंथांची स्थिती अशी आहे की त्यांच्या बाबतीत अल्लाहकडून ते सुरक्षित ठेवण्याची काही घोषणा व व्यवस्था झालेली नव्हती आणि ते आज ऐतिहासिक शोधाच्या कसोटीवर सुरक्षित असल्याचे सिध्द केले जाऊ शकत नाही. कोणत्याही ग्रंथाचे अनुसरण करणारे अनुयायीसुध्दा या बाबतीत असा दावा करू शकत नाहीत की हा ग्रंथ त्याच भाषेत, त्याच शब्दांत आणि त्याच वाक्यांत जसाचा तसा सुरक्षित राहिलेला आहे. त्यात कोणतेही एक उपवाक्य, एक वाक्य अथवा एक शब्ददेखील कमी-जास्त झालेला नाही. या बाबतीत पवित्र कुरआनच्या ग्वाहीचा संबंध आहे तोसुध्दा त्या प्रत्येक ग्रंथासंबंधी की ज्याचा उल्लेख त्यात आलेला आहे, असाच आहे. तौरात व बायबल दोघांच्या बाबतीत त्याने फर्मविले आहे की त्यांना मानणाऱ्या यहूदी (ज्यू) व खिश्चनांनी त्यांच्या काही भागांना तर बदलून टाकले आहे.

*'आणि काही गोष्टींचे विस्मरण केलेले आहे.'* (सूरतुल माइदाह)

पवित्र कुरआनच्या याच खास वैशिष्ठ्याचा एक पैलू असासुध्दा आहे की तो ज्या भाषेत अवतरलेला आहे ती एक जिवंत भाषा आहे. आज आशिया व आफ्रिका खंडातील अनेक देशांचे रहिवाशी कोट्यवधी लोक ही भाषा बोलतात आणि ती जाणणाऱ्या व समजणाऱ्यांची संख्या तर फारच अधिक आहे. दुसऱ्या शब्दांत ती एकशास्त्रीय, सामान्य जनांची व आंतरराष्ट्रीय भाषा आहे. याउलट त्या साऱ्या भाषा ज्यात दुसरे ग्रंथ अवतरलेले

होते त्या सामान्यजनांच्या जीवनापासून पूर्णत: दूर झालेल्या आहेत आणि त्यांच्यापैकी एकसुध्दा भाषा अशी नाही की जिला जिवंत भाषा म्हटले जावे. एखाद्या ग्रंथाची मूळ भाषा एक जिवंत भाषेच्या रूपात टिकून राहणे त्या ग्रंथाच्या सुरक्षित राहण्यासाठी जितके आवश्यक आहे त्यासाठी कोणत्याही स्पष्टीकरण अथवा प्रमाणाची गरज नाही.

**८)** महान अल्लाहचे मौलिक मार्गदर्शन काय होते व त्याचा मूळ धर्म अनंत काळापासून कोणता होता? या गोष्टीचा निर्णय करण्याचा संपूर्ण अधिकार केवळ पवित्र कुरआनला प्राप्त आहे. कारण दुसरा कोणताही अन्य ग्रंथ असा अस्तित्वात नाही की जो आपल्या खऱ्या स्वरूपात पूर्णत: सुरक्षित उरलेला आहे. म्हणून विशुध्द व निर्भेळ मार्गदर्शन कोठे अन्यत्र मिळणेसुध्दा शक्य नाही. अशा प्रकारे वास्तविकता केवळ इतकीच नव्हे की पवित्र कुरआनच्या शिकवणी आपल्या खऱ्या स्वरूपात जशाच्या तशा सुरक्षित अस्तित्वात आहेत. तर आता दुसऱ्या ग्रंथांच्या खऱ्या शिकवणीचा पत्तादेखील खुद्द त्यांच्या पृष्ठांत नाही तर तो पवित्र कुरआनच्या पृष्ठातच मिळू शकेल. दुसऱ्या ग्रंथांत परिवर्तन झाल्यामुळे बुध्दीची ही स्पष्ट निकड आहेच, शिवाय यावर महान अल्लाहचे स्पष्ट प्रमाण पत्रसुध्दा आहे. त्याने फर्माविले आहे,

*'हे मुहम्मद! आम्ही तुमच्याकडे हा ग्रंथ सत्यानिशी उतरविला आहे जेव्हा की तो आपल्या पूर्वीच्या ग्रंथांच्या (भविष्यवाणी)प्रमाणे आहे व त्यांचासुध्दा निरीक्षक आहे.'*

(सुरतूल माइदाह - ४८)

'मुहैमिन' चा अर्थ निरीक्षक व संरक्षक आहे. पवित्र कुरआन पूर्वीच्या ग्रंथांचा निरीक्षक व संरक्षक आहे. त्यांच्या मूळ संदेशावर मिश्रण व परिवर्तनाचे जे पडदे घातले गेले आहेत त्यांना तो दूर करतो आणि अशा प्रकारे त्यांच्या मूळ शिकवणी निश्चित करतो. अल्लाहच्या या कथनांचा स्पष्ट अर्थ असा आहे की जर कोणी जाणू इच्छित असेल की अमुक ग्रंथाची मूळ शिकवण काय होती तर त्यासाठी एकच मार्ग आहे तो म्हणजे पवित्र कुरआनचे अध्ययन करणे. कारण त्यांच्या खऱ्या मौलिक शिकवणीसुध्दा केवळ पवित्र कुरआनमध्येच आढळतील. इतकेच नव्हे तर या वास्तविकतेच्या निकडी यापेक्षाही जास्त आहेत आणि त्या अशा की आता या ग्रंथांचे योग्य व खरे अनुसरण पवित्र कुरआनचेच अनुसरण करून केले जाऊ शकते.

**९)** पवित्र कुरआन ईशग्रंथ असण्याचा व्यावहारिक पुरावा वर्तमान तथ्ये व त्या नवनवीन पुराव्यावर आधारित आहे. भूतकालीन काही घटना व नक्कल आणि गोष्टीची गरज नाही आणि त्याचे कारण असे आहे की पवित्र कुरआन ईशग्रंथ असण्याचा पुरावासुध्दा तो स्वत:च आहे. त्याला कारण असे आहे की तो आपल्या आंतरिक गुण व आपल्या प्रत्यक्ष

परिणाम, अशा प्रत्येक पैलूने तो एक चमत्कार आहे. प्रत्येक डोळस माणसाला दिसणारा चमत्कार. असे शक्य नाही की एखाद्या सत्यप्रिय माणसाने त्याच्या या गुणांचे व व्यावहारिक लाभांचे मन:चक्षु उघडून निरीक्षण करावे आणि त्याच्या कानात हे शब्द घुमत राहिले नाहीत की 'ईश्वर शपथ!' ही मानवी वाणी असू शकत नाही. या वस्तुस्थितीचा अर्थ असा झाला की पवित्र कुरआन कोठे का असेना, जेथे प्रस्तुत केला जाईल त्या वेळी व ज्या ठिकाणी त्याचे पठन केले जाईल. तेथे त्याच्या सत्यतेचे प्रमाणदेखील असेल. कोणत्याही वेळी अप्रत्यक्ष व दृष्टीआडच्या प्रमाणांची अजिबात गरज भासणार नाही. दुसऱ्या शब्दांत असे की या ग्रंथाचे अस्तित्व आणि त्याचा संदेशच जिवंत, सुरक्षित व चिरकालीन आहे. ती ईशवाणी असल्याचा पुरावासुध्दा जिवंत, सुरक्षित व चिरकालीन आहे. परंतु दुसऱ्या ग्रंथांची स्थिती याच्यापेक्षा अगदीच भिन्न आहे. त्यांच्या सत्यतेचा पुरावा खुद्द त्यांच्यात नाही की डोळ्यांसमोर प्राप्त होईल. तर भूतकालीन इतिहासात आहे, जो पाहण्यासाठीं पाठीमागे लांबवर वळावे लागते. तौरात अल्लाहचा ग्रंथ तेव्हा सिध्द होतो की जेव्हा तो प्रस्तुत करणाऱ्या व्यक्तीला 'असा' (सोटा) आणि 'यदे बैजा' (मूसा (अ.) यांचा चकाकणारा हात) सारखे अनुभूतिपूरक व सामयिक चमत्कारांच्या आधारे अल्लाहचे प्रेषित मानले गेले असेल. बायबलची सत्यता तोपर्यंत चर्चेचीच बाब राहील जोपर्यंत मृतांना जिवंत, महारोग्यांना निरोगी व अंधांना डोळस बनविण्याच्या दोन हजार वर्षापूर्वीच्या प्राचीन घटना ईसा (अ.) (येशू ख्रिस्त) यांना अल्लाहचा प्रेषित सिध्द करीत नाहीत. हे स्पष्ट आहे की या ग्रंथांच्या सत्यतेबद्दलचे पुरावे त्या लोकासाठी तर प्रत्यक्ष पुरावे होते की ज्यांनी हे चमत्कार स्वत: पाहिले होते. परंतु नंतरच्या लोकासाठी त्याची स्थिती अशी राहिली नाही. तर ती परोक्ष प्रमाणांची झाली आहे. एखादा मनुष्य तर त्या गोष्टीचा क्रम विश्वसनीय असल्याबद्दल परीक्षण करील ज्याच्या माध्यमाने या चमत्कारांची वार्ता त्याच्यापर्यंत पोचली आहे. मग या शोधाच्या फलस्वरूप जर त्याला समाधान झाले की हा क्रम व वार्तेचे हे साधन विश्वसनीय आहे तर तो ग्रंथ अल्लाहकडून दिला गेला असल्याचे तो मान्य करील. परंतु पवित्र कुरआनच्या सत्यतेचा पुरावा या गोष्टीवर कदापि अवलंबून नाही की तो प्रस्तुत करणाऱ्याने काही अनुभूतिपूरक व अस्थायी चमत्कार दाखवून ईशग्रंथ असल्याचे सिध्द केले होते. तर आपला पुरावा व आपले प्रमाण तो स्वत:च आहे कारण तो स्वत:च एक चमत्कार आहे. अनुभूतिपूरक व अस्थायी चमत्कार नव्हे, जो नंतरच्या लोकासाठी केवळ एक बातमी बनून राहिला. तर निव्वळ बौध्दिक चमत्कार जो प्रत्येक काळात व प्रत्येक माणसासमोर एक जिवंत वास्तविकता म्हणून उपस्थित आहे. आणि मानवजातीतील प्रत्येक व्यक्तीला प्रत्यक्षपणे चिंतनाचे आवाहन करीत आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी याच स्थितीचे स्पष्टीकरण केले होते,

*'प्रत्येक पैगंबराला इतके व असे चमत्कार दिले गेले ज्यांना पाहून लोकांनी त्यावर ईमान (विश्वास) आणू शकले असावेत आणि मला जो (सर्वांत महत्त्वाचा) चमत्कार प्रदान केला गेला आहे तो तर तीच ईशवाणी (म्हणजे पवित्र कुरआन) आहे ज्याची माझ्यावर वही (ईश्वर संदेश) केली गेली आहे.'* (बुखारी - किताब फजाइलुल कुरआन)

आपल्या या कथनात पैगंबर (स.) पवित्र कुरआनलाच आपला संपूर्ण चमत्कार ठरवीत आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की त्यांना अनेक अनुभूतिपूरक चमत्कारसुध्दा प्रदान केले गेले होते. म्हणून त्यांच्या कथनाचा हेतु असा झाला की त्यांचा खरा व सर्वांत मोठा चमत्कार केवळ पवित्र कुरआन आहे आणि त्याच्या तुलनेत दुसऱ्या चमत्कारांचे काही विशेष महत्त्व नाही. खुद्द पवित्र कुरआननेसुध्दा या वास्तविकते कडे संकेत केलेला आहे. म्हणून कुरैश लोकाकडून अनुभूतिपूरक चमत्कारांची जी वारंवार मागणी होत होती, त्याचा उल्लेख करून एके ठिकाणी फर्माविले गेले आहे,

*'काय (हे लोक चमत्कारांची मागणी करीत आहेत) आणि त्यांच्यासाठी चमत्कार म्हणून ही गोष्ट पुरेशी नाही की (हे पैगंबर (स.)) आम्ही तुमच्यावर हा ग्रंथ उतरविला आहे जो त्यांना पठन करून ऐकविला जात आहे?'* (सुरतुल अन्कबूत - ५१)

ही आहेत पवित्र कुरआनची ती खास वैशिष्ठ्ये आणि त्याचे श्रेष्ठत्व, जो त्याला दुसऱ्या ग्रंथांच्या तुलनेत प्राप्त आहेत. विचार केल्यास स्पष्ट दिसेल की हे वेगवेगळे व आपसात काही संपर्क व संबंध न ठेवणारे गुण नाहीत तर त्या सर्वा दरम्यान एक दृढ स्वाभाविक संपर्क कार्यरत आहे. आणि हे सर्व मुळात एकच महान सत्याच्या विभिन्न निकडी आहेत. जो ग्रंथ संपूर्ण मानवजातीसाठी आला असेल आणि अल्लाहचा अंतिम मार्गदर्शन-पत्र असेल, हे पूर्णपणे आवश्यक होते की तो प्रत्येक पैलूने परिपूर्णसुध्दा असावा, तो निव्वळ तात्विक आणि पारस्परिक मानवी स्वभावाचा स्वामीसुध्दा असावा. यानंतर मागील सर्व ग्रंथ रद्दबातल ठरविले जावेत. परलोकातील मुक्तीसाठी त्याचे अनुसरण आवश्यकसुध्दा ठरविले जावे, जोपर्यंत मनुष्य पृथ्वीवर अस्तित्वात आहे तो पर्यंत तो पूर्णपणे सुरक्षितसुध्दा ठेवला जावा आणि सर्वांत अंतिम गोष्ट अशी आहे की तो दिव्य ग्रंथ असण्याचा मूळ पुरावासुध्दा प्रत्यक्ष व कायम स्वरूपी असावा जेणेकरून जेव्हा जेव्हा या अत्यंत महत्त्वपूर्ण दाव्याचे कोणी गंभीरतापूर्वक परीक्षण करू इच्छित असेल तर त्याला आपल्या समाधान व संतोषाचे पूर्ण ज्ञान समोरच मिळावे.

# पवित्र कुरआनच्या अभ्यासाची जबाबदारी

निस्संदेह वरील चर्चा पवित्र कुरआनच्या अवतरणाला जगातील सर्वांत महत्त्वाची घटना सिध्द करते. पवित्र कुरआनच्या आवाहनाला मानवतेची सर्वांत महत्त्वाची समस्या बनविते ती चर्चा प्रत्येक मानवाकडून मागणी करते की पवित्र कुरआनच्या बाबतीत अजिबात बेपर्वाई अवलंबिता कामा नये. त्याचा अभ्यास आपली सर्वांत महत्त्वाची आणि सर्वप्रथम जबाबदारी असल्याचे जाणून असावे. जे लोक मुस्लिम आहेत आणि पवित्र कुरआनचा हा दर्जा असल्याचे ज्यांनी मान्य केले आहे त्यांच्यापुरती या जबाबदारीची पूर्तता तर अशी आहे की त्यांनी त्याच्या आज्ञा व आदेशांना समजून घ्यावे, डोळ्यांसमोर ठेवावे आणि त्यांची अंत:करणपूर्वक अंमलबजावणी करावी. जे मुस्लिम नाहीत आणि जे कुरआनला मानणाऱ्यांच्या वर्तुळाबाहेर आहेत त्यांच्यासाठी या जबाबदारीचा अर्थ मूलत: असा आहे की त्यांनी पूर्ण प्रामाणिकपणे त्याच्या दर्जाबद्दल चौकशी करावी.

एखाद्याच्या मुस्लिमेतर असण्याचा अर्थ असा नव्हे की त्याने कुरआनशी काही संबधच ठेऊ नये. असा अर्थ तेव्हा होऊ शकला असता जर कुरआनने आपला दर्जा केवळ एक सामान्य दिव्य ग्रंथाचा ठरविला असता. कारण अशा स्थितीत दुसऱ्या दिव्य ग्रंथाच्या अनुयायासाठी कदापि हे आवश्यक नसते की त्यांनी त्याच्या बाबतीत स्थितीच्या चौकशीची जबाबदारी घ्यावी. परंतु जेव्हा तो आपला दर्जा असा सांगतो की तो असला दिव्य ग्रंथ आहे जो संपूर्ण जगासाठी अवतरण केला गेला आहे. त्याच्यानंतर महान अल्लाहने दुसरे सर्व ग्रंथ रद्द केले आहेत आणि आता जगात अल्लाहचे आज्ञापालन व उपासना आणि परलोकात कल्याण व मुक्ती पूर्णपणे त्याच्या अनुसरणावरच अवलंबून आहे.

येथे विषय गंभीर बनतो आणि कोणत्याही गैरमुस्लिमासाठी असे करण्याचे काहीच कारण उरत नाही की त्यांनी या पवित्र कुरआनावर फक्त ओझरती दृष्टी टाकावी. त्यांनी बेपर्वाईने पुढे सरसावे आणि त्याच्या दाव्याला काही महत्त्व देऊ नये. अशा प्रकारे स्वत:च्या उत्तम लाभावर उघड जुलुम करतील आणि अत्यंत मूर्खपणाचे प्रमाण देतील. त्याला कारण असे की जीवनाच्या ज्या प्रवासावर तो निघाला आहे त्याच्या बाबतीत त्याला खबरदार केले जात आहे. हा प्रवास त्याला यशाच्या उद्दिष्टापर्यंत तेव्हाच पोचवू शकतो जेव्हा तो पवित्र कुरआनचे मार्गदर्शन मान्य करील. परंतु अरेरे तो हा आवाज ऐकण्याकडे व त्यातील वस्तुस्थिती जाणून घेण्याकडे लक्षदेखील देत नाही!

हे खरी आहे की कुरआनची ही घोषणा त्याच्या दृष्टीने केवळ एक दावा आहे

आणि आवश्यक नाही की प्रत्येक दावा वस्तुस्थितीनुसारच असेल. परंतु हेदेखील आवश्यक नाही की प्रत्येक दावा वस्तुस्थितीच्या उलटच असेल. म्हणून एखाद्या गंभीर दाव्यासंबंधी जोपर्यंत एखाद्याची जबाबदारीपूर्ण चौकशी त्याला या खात्रीपर्यंत पोचवीत नाही की तो चुकीचा आहे तोपर्यंत तो त्याला खरा म्हणू शकत नाही तर खोटादेखील म्हणू शकत नाही. पवित्र कुरआनचा हा दावा कमीतकमी एक गंभीर व विचारणीय दावा असणे तर त्याचप्रमाणे स्पष्ट आहे ज्याप्रमाणे दोन प्रहरचा सूर्य स्पष्ट असतो. त्याला कारण असे की जर एखाद्यासमोर अशा प्रकारचे वैज्ञानिक व बौध्दिक प्रमाण आलेले नाहीत जसे की कुरआनच्या खरेपणाबद्दल मागील पृष्ठात सांगितले गेले आहेत, तर काय त्याच्या डोळ्यांना हे व्यावहारिक प्रमाणसुध्दा दिसत नाहीत की कोट्यवधी लोक पवित्र कुरआनचा हा दावा मान्य करीत आलेले आहेत? जेव्हा जेव्हा तो मान्य करण्याचा हक्क अदा केला गेला आहे तेव्हा माणसाच्या, समाजाच्या, राज्याच्या इतकेच नव्हे तर प्रत्येक प्रकारच्या जीवनात सदाचार व ईशभीरूतेला बहर आलेला आहे.

या तर वरील घटना आहेत ज्या जाणून घेण्यासाठी कोणत्याही प्रयत्नांची गरज नाही. म्हणून हे अट्टाहास व मूर्खपणाचे प्रदर्शन होईल जर एखाद्या माणसाने कुरआनच्या ईशग्रंथ असल्याच्या दाव्याला गंभीर व विचारणीयसुध्दा समजले नाही. हा दावा निश्चितपणे एक गंभीर व विचारणीय दावा आहे. कोणताही दावा गंभीर व विचारणीय असण्याचा मान्य अर्थ असा की प्रारंभी व शोधपूर्व तो खरा असण्याची शक्यतादेखील तशीच आहे जशी की तो खोटा असण्याची आहे. म्हणून न्यायाची मूळ निकड अशी आहे की पवित्र कुरआनच्या या दाव्याला प्रत्येक मुस्लिमेतर व्यक्तीने तोच दर्जा द्यावा. मग त्याच्या औचित्याचे परीक्षण करावे व वास्तविकता पूर्णपणे जाणून घेण्याचा प्रयत्न करावा. त्याला कारण असे की जर हा दावा कोणत्याही स्थितीत खरा निघाला, तर पवित्र कुरआन त्याची सर्वांत मोठी संपत्ती बनेल. असली संपत्ती जी प्राप्त न केल्यास त्याचे शाश्वत जीवन शाश्वत दु:खाच्या खाईत पडेल. स्पष्ट आहे की कोणताही बुध्दिमान मनुष्य कोणत्याही अशा गोष्टीकडे कदापि दुर्लक्ष करू शकत नाही. जिची सर्वांत मौल्यवान संपत्ती व शाश्वत सुख असण्याची पन्नास टक्के शक्यता स्थितीच्या चौकशी पूर्वीसुध्दा असेल आणि चौकशीनंतर शंभर टक्के विश्वासानेसुध्दा निश्चितपणे बदलू शकत असेल.

# पवित्र कुरआनचे अवतरण व संकलन

## अवतरण्याची तारीख

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर पवित्र कुरआन उतरण्याचा प्रारंभ रमजान महिन्यात झाला. तो स्वत: स्पष्ट करीत आहे,

*'रमजान तो महिना आहे ज्यात पवित्र कुरआन अवतरण्यास (प्रारंभ) झाला.'*

(सूरतुल बकरह - १८५)

इसवी सनाप्रमाणे तो माहे ऑगस्ट ६१० चा काळ होता. सर्वांत पहिली वह्य (ईशसंदेश) जेव्हा उतरली तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) मक्का शहरा बाहेरील डोंगरातील 'हिरा' नावाच्या गुहेत चिंतनात निमग्न होते. ईशसंदेशाच्या (वह्य) क्रमाची ही सुरवातीची शृंखला 'सूरह अलक'च्या खालील आयतींवर आधारित होती.

*'(हे मुहम्मद (स.)) पठन कर आपल्या पालनकर्त्याच्या नावाने की ज्याने तुला निर्माण केले. निर्माण केले मनुष्याला गोठलेल्या रक्ताने, पठन कर, आणि तुझा पालनकर्ता मोठा दया करणारा आहे, ज्याने लेखणी व्दारे ज्ञान शिकविले, मनुष्याला ते काही शिकविले जे तो जाणत नव्हता.'* (कुरआन-९६:१-५)

त्या वेळी इसवी सनाप्रमाणे (सौर वर्ष) सुमारे ३९ वर्षे साडे तीन महिने त्यांचे वय होते आणि चांद्रवर्षाप्रमाणे ४० वर्षे साडे सहा महिने होते. वह्य येण्याचा हा शुभ क्रम २३ वर्षांच्या दीर्घ मुदतीपर्यंत चालू राहिला. अंतिम वह्य 'सुरतुत्तौबह'च्या अंतिम दोन आयतींची (कुरआनातील वचने) होती.

इसवी सन ६३३ मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनापूर्वी काही दिवस अगोदर अवतरली होती. या मुदतीपैकी निम्म्याहून अधिक म्हणजे सुमारे साडेबारा वर्षे तर मक्केत गेले. उरलेली १० वर्षे मदिनेत व्यतीत झाली.

मक्केच्या निवासकाळात जे (अध्याय) अवतरले त्यांची एकूण संख्या ९० आहे जे प्रमाणात संपूर्ण कुरआनचा दोन तृतीयांश भाग आहेत. मदिनेत उतरलेल्या सूरहची संख्या २४ आहे. जे सुमारे एक तृतीयांश कुरआन आहेत. अशा प्रकारे एकूण सूरहची संख्या ११४ आहे. त्या ११४ सूरहच्या एकूण आयती, शब्द व अक्षरांची जर मोजणी केली तर त्यांची संख्या क्रमश: आयती ६२३६, शब्द ७७९३३ आणि तीन लक्ष बत्तीस हजार पंधरा अक्षरे होईल.

## अवतरण्याची स्थिती

पूर्ण कुरआन तेवीस वर्षांच्या दीर्घ मुदतीत अवतरला आहे. तर या विचार व कल्पनेला वाव शिल्लक ठेवीत नाही की तो संपूर्ण एकाच वेळी अल्लाहकडून प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हवाली केला गेला. तसेच या विचारालाही वाव ठेवीत नाही की त्याचा दर्जादेखील सामान्य रचना व पुस्तकासारखा आहे ज्यात केवळ वैज्ञानिक व कलात्मक पध्दतीने एका निश्चित विषयासंबंधी चर्चा आलेली आहे. म्हणून खऱ्या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण तो स्वत: अशा प्रकारे करतो,

*'आणि हे लोक म्हणतात की त्यांच्यावर संपूर्ण कुरआन एकाच वेळी का उतरविला गेला नाही? तर आम्ही तो अशाच प्रकारे (थोडा थोडा) उतरवीत आहोत. जेणेकरून त्याव्दारे हृदयाला मज़बूत करीत राहावे आणि आम्ही तो संपूर्ण व्यवस्थेसह थांबून-थांबून ऐकविला आहे.'* (सूरतुल फुर्कान - ३२)

संपूर्ण पवित्र कुरआन एकाच वेळी नव्हे तर थोडा-थोडा करून अवतरला आहे. कधी काही थोड्याच आयती उतरल्या तर कधी पूर्ण एक सूरह (अध्याय) अवतरला. दोन वह्य दरम्यान कधी लहानसा मध्यंतर तर कधी कित्येक आठवडे व कित्येक महिन्यांपर्यंत मौन पाळले गेले. त्याचे कारण असे होते की पवित्र कुरआन केवळ सैध्दान्तिकच नव्हे तर व्यावहारिक मार्गदर्शनसुध्दा आहे. त्याचे अवतरणसुध्दा एका आव्हानासह झाले आहे. असल्या आव्हानासह की जे व्यावहारिक, विकासशील आव्हान आहे. ते एका बिंदुपासून सुरू झाले, पुढे गेले, पुढे जातच राहिले आणि मग विभिन्न स्थिती व टप्प्यातून जात यशाच्या चरम बिंदुपर्यंत पोचले. अशा आव्हानाची नैसर्गिक निकड अशी होती की पवित्र कुरआन टप्प्या-टप्प्याने अवतरावे आणि वह्य (ईशसंदेश) आवाहनाची स्थिती व त्याच्या गरजांना समोर ठेऊनच अवतरित व्हावी.

हे चांगल्या प्रकारे समजण्यासाठी हे योग्य ठरेल की या आवाहनाच्या परिस्थितीचा संक्षिप्त आढावा घेतला जावा व त्याच्या व्यावहारिक स्वरूपालादेखील डोळ्यांसमोर ठेवले जावे.

पवित्र कुरआन आणणाऱ्या प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या प्रेषितत्वाची घोषणा केली. तसेच एक अल्लाह ज्याचा भागीदार कोणीही नाही त्याच्या उपासनेचे आवाहन प्रस्तुत केले. त्वरित मक्केच्या अनेकेश्वरवादी व मूर्तिपूजक समाजात एकच खळबळ उडाली आणि वातावरण इन्कार व मतभेदाच्याच नव्हे तर कोप व क्रोधाच्या ज्वालाने उजळून निघाले. केवळ काहीच लोक होते जे आवाहनाच्या या प्रारंभिक घोषणेच्या वेळी शांत मनाने यावर विचार करू शकले. त्याच्या परिणामस्वरूप कुरआनवर

ईमान आणण्याची सद्बुध्दिधी प्राप्त करू शकले. मात्र सामान्य प्रतिक्रिया मतभेद व शत्रुत्वाचीच होती, परंतु हे स्पष्ट आहे की अशी प्रतिक्रिया अनपेक्षित ही नव्हती. त्यामुळे कुरआन प्रस्तुत करणाऱ्या प्रेषित मुहम्मद (स.) यांनी प्रभावित होऊन मौन धारण करण्याचाही प्रश्न उभ्दवत नव्हता. म्हणून इतका विरोध व प्रतिकूल परिस्थिती असूनदेखील ते आपल्या कर्तव्य-पालनात दृढपणे निमग्न राहिले. जे लोक ऐकण्यास व समजून घेण्यास तयार नव्हते त्यांनादेखील आपले म्हणणे ऐकविण्याचा व समजावून देण्याचा प्रयत्न करीत राहिले. त्याच्या परिणामस्वरूप लोक एक-एक, दोन-दोन करून निरंतर इस्लाममध्ये दाखल होत राहिले. परंतु ज्या गतीने इस्लामचा विस्तार होत होता त्याच वेगाने विरोध आणि क्रोध व घृणेची तीव्रतासुध्दा वाढत चालली होती. लवकरच त्याने अत्याचार व रानटीपणाचे रूप धारण केले. आणि मुस्लिम असणे म्हणजे संकटांना आमंत्रण देण्यासारखे बनले. आवाहनाच्या विरोधकापाशी संपत्ती, शक्ती, प्रभाव, सत्ता आणि बहुसंख्येसारखे सर्वकाही होते. त्यांच्या तुलनेत ईमानधारक काहीही नव्हते. बस्स, असे समजा की शक्तिमान व शक्तीहीनाचा सामना होता. अशा परिस्थितीत प्रेषित मुहम्मद (स.) व त्यांच्या सोबत्यावर जो काही प्रसंग गुदरू शकत होता तो अवर्णनीय होता. उघडपणे अल्लाह एक आहे म्हणण्याची व नमाज अदा करण्याचीसुध्दा परवानगी नव्हती. आवाहनाचे कार्य अशा परिस्थितीशी संघर्ष करीत पुढे वाटचाल करीत होते. या कार्याने दहा-बारा वर्षाच्या अवधीत एका निर्णायक टप्प्यात प्रवेश केला. कुरैशच्या सर्व टोळयांनी एकमताने ठरविले की आता त्याला अधिक सवलत दिली जाऊ नये. प्रेषित मुहम्मद (स.) यांना ठार करून या उपद्रवाला समूळ कापून टाकावे. जेव्हा गोष्ट या थराला गेली तेव्हा महान अल्लाहने आपल्या पैगंबरांना व त्यांच्या ईमानधारक सोबत्यांना मक्का सोडून मदीन्यास जाण्याचा आदेश दिला. मक्कानंतर संपूर्ण देशात केवळ मदीना असे शहर होते की जेथे त्यावेळी आवाहन पोचले होते. आणि तेथील लोकांच्या एका लक्षणीय संख्येने त्यावर ईमान आणले होते. म्हणून प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांचे सोबती आपले घरदार सोडून मदीना येथे गेले आणि यानंतर मदीनाच आवाहनाचे केंद्र बनले. येथील परिस्थिती अशी होती की ईमानधारक मक्काप्रमाणे येथे अत्याचार व क्रोधाने पीडित राहिले नाहीत, तर त्यांना आवश्यक मर्यादेपर्यंत एक स्वतंत्र वातावरण प्राप्त झाले. ज्यांत त्यांना आपल्या जीवनाच्या गरजा पुऱ्या करण्याचा पुरेपूर अधिकार होता. दुसऱ्या शब्दांत हे एकप्रकारे त्यांचे स्वत:चे स्वतंत्र राज्य अस्तित्वात आले. याशिवाय खुद्द ज्या लोकांना आवाहन करावयाचे त्यांचा वर्तुळ विस्तृत झाला. मक्केत हे आवाहन अनेकेश्वरवादीपर्यंत मर्यादित होते, परंतु मदीन्यात अनेकेश्वरवादी बरोबरच ग्रंथधारकसुध्दा (ख्रिश्चन, ज्यू) या सीमेत दाखल झाले होते. कारण या ठिकाणी हे लोकसुध्दा मदीना शहरी मोठ्या संख्येत

राहत असत. म्हणून कुरआन जागतिक आवाहन असल्यामुळे आवश्यक होते की ते त्या लोकांपर्यंतदेखील पोचविले जावे. प्रारंभिक काळात आवाहनाच्या प्रयत्नांचे परिणाम अपेक्षेप्रमाणे येथेसुध्दा नकार व स्वीकार, विरोध व मान्यता अशा दोन्ही स्वरूपात दिसून आले. काही लोकांनी ईमान आणले, बहुतेकांनी विरोध दर्शविला, विशेषत: ज्यू लोकांच्या संख्येपैकी ९९ टक्के लोक शेवटपर्यंत विरोधकच राहिले. परंतु येथे काफिर (इन्कार करणारे) व मुस्लिमांच्या शक्तीचे प्रमाण तसे नव्हते जसे की मक्केत होते. म्हणून हा विरोधसुध्दा अत्याचार व इज़ा पोचविण्यासाठी तसा रंग धारण करू शकला नाही. जसा त्यांना मक्केत तोंड द्यावे लागले. येथे इस्लामला सामाजिक व राजनीतिक क्षेत्रात श्रेष्ठत्व प्राप्त होते. म्हणून या विरोधकांनीदेखील उघड संघर्षाऐवजी गुप्त युक्त्या-प्रयुक्त्या व कट-कारस्थानाचे धोरण अवलंबिले. या धोरणामुळे मुस्लिम समाजात इस्लामचे अनेक ते खोटे दावेदार घुसले ज्यांना मुनाफिक (मुस्लिम असल्याचा ढोंग करणारे) म्हणतात. अशा प्रकारे जेथे मक्केत सत्याच्या आवाहनाच्या विरोधात एक आघाडी होती तेथे मदीनेत दोन आघाड्या उभ्या ठाकल्या. एक तर त्याचे उघड शत्रू म्हणजे इन्कार करणारे व अनेकेश्वरवादीची आघाडी- दुसरी आघाडीवर त्याच्या छुप्या शत्रू म्हणजे मुनाफिकांची. हे आपल्यातीलच शत्रू आवाहनाच्या कार्यास एक नवीन संकट व एक मोठी समस्या बनले होते. त्याला कारण असे की त्यांनी इस्लामच्या इमारतीला सुरूंग लावण्यासाठी खुद्द इस्लामलाच आश्रय स्थान बनविले होते. इकडे मक्का सोडून मदीनाला गेल्यानंतर मक्कावासियांनी 'टळली एकदाची पीडा' म्हणून समाधानाचा श्वास घेतला नाही. त्यांनी इच्छा, युक्त्या व प्रयत्न करूनदेखील इस्लामच्या आवाहनाचे कार्य इतके फोफावत असल्याचे पाहून ते अधिकच अस्वस्थ झाले होते. आणि सशस्त्र संघर्ष करून त्याला नामशेष करून टाकण्याचा विचार करू लागले होते. मदीना शहरातील ज्यू व मुनाफिकांनी त्यांच्याशी संपर्क साधला आणि त्यांना शहवर शह देऊ लागले. मदीन्याला मुस्लिमांना येऊन अद्याप दोन वर्षेसुध्दा झाली नव्हती की त्यांनी प्रचंड तयारी करून त्यांच्या विरूध्द युध्दाची कारवाई सुरू केली. हे स्पष्ट आहे की अशा अवस्थेत प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांच्या सोबत्यांना येथेदेखील शांती लाभू शकत नव्हती. वर्षानुवर्षे स्थिती अशी राहिली की मक्केचे अनेकेश्वरवादी वरचेवर त्यांच्यावर हल्ले चढवीत आहेत, मुनाफिक आंतून धोका बनलेले आहेत, यहुदी (ज्यू) उपद्रव माजवीत आहेत आणि राजनीतिक कट रचीत आहेत. अशा प्रकारे जरी आवाहनकार्याने मूळ धरलेले आहे आणि एक शक्ती म्हणून पुढे वाटचाल करीत आहे, परंतु विरोधात घट होण्याऐवजी वाढच होत आहे. अखेरीस संघर्ष आवाहनाच्या बाजूने आपला स्पष्ट कौल देत आहे. विरोधी शक्ती प्रभावित होऊ लागतात. पक्के शत्रू मक्कावासी लोकांनासुध्दा युध्द व युध्द सदृश परिस्थिती ठेवण्याऐवजी तहाचा

करार करणे भाग पडते. परंतु हृदयातील आग तशीच भडकत राहिली आहे म्हणून संधी मिळताच करार भंग करतात. त्यानंतर प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या हजारो सोबत्या सह मक्के कडे रवाना होतात. आता मात्र शत्रूचे सामना करण्याचे धाडस होत नाही आणि एक ही बाण न चालता प्रेषित (स.) विजयी होऊन मक्का शहरात दाखल होतात. कुरआनच्या आवाहनाच्या मूळ केंद्र मक्का शहरातील अनेकेश्वरवादाच्या एक एक चिन्हाला नष्ट करतात. या उघड व संपूर्ण विजयानंतर संपूर्ण अरबस्थानात इस्लाम एखाद्या पुराप्रमाणे पसरतो. लोकांच्या झुंडीच्या झुंडी इस्लाममध्ये दाखल होऊ लागतात आणि आतां संपूर्ण देशात इस्लामच खरी शक्ती बनून पुढे येतो. मुस्लिम समाज आपल्या प्रगतीचे सर्व स्वाभाविक टप्पे ओलांडून सर्व त-हेने एक परिपूर्ण समाज बनलेला आहे. आणि या गोष्टीसाठी पूर्ण स्वतंत्र व स्वायत बनतो की समाजाने आपले जीवन हवे तसे जगावे, त्याने हवे त्या घटनेला व कायद्यांना अमलात आणावे. कोणताही बाह्य अडथळा त्यांच्या मार्गात राहत नाही. अशा प्रकारे हे आवाहन अरबस्थानात चरम बिंदूला पोचते.

असा आहे आवाहनाच्या विकासाचा संक्षिप्त इतिहास. जो कुरआन अशा प्रकारच्या आवाहनासह व त्याचा व्यावहारिक मार्गदर्शक बनून अवतरला आहे. त्याचे एकाच वेळी अवतरणे औचित्याच्या दृष्टीने अशक्य होते. त्याला अवतरण्याचे स्वरूप तर स्वाभाविकरीत्या याशिवाय अन्य काही असूच शकत नव्हते की याला अवतरण्याचा प्रारंभ त्या वेळेपासून व्हावा की जेव्हापासून हे आवाहन-कार्य सुरू झाले होते. हा क्रम तेव्हा समाप्त व्हावा जेव्हा हे आवाहन कार्य चरम बिंदूला पोचले. या दरम्यान त्याचे विभिन्न भाग अशा प्रकारे अवतरले जात राहावेत की जशी आवाहन-कार्याची निकड होती. याचा अर्थ असा की प्रारंभी केवळ आवाहनाच्या मौलिक गोष्टी प्रस्तुत केल्या जाव्यात. त्या सत्य असल्याबद्दल प्रमाण दिले जावेत आणि त्याच्यावर ईमान आणणे अथवा न आणण्याचे परिणाम स्पष्ट केले जावेत. त्याशिवाय वह्य उतरविण्याचा वेगदेखील कमी असावा जेणेकरून त्यावर विचार करण्याची लोकांना संधी मिळत रहावी. त्यानंतर ईमान आणण्याच्या मागणीत तीव्रता यावी. पुरावे सादर करण्याची औपचारिकता पूर्ण केली जावी आणि हेलावून सोडणाऱ्या, परिणाम पूर्ण आणि पुराव्याने सुसज्जित वह्य ची एक दीर्घ शृंखला सुरू राहावी. दुसरीकडे ईमानधारकांना अजूनपर्यंत केवळ धर्माच्या तत्त्वांच्या शिकवणीपर्यंतच उपदेशाची मर्यादा रहावी. त्यांना आपल्या ईमानच्या गुणांना जास्तीत जास्त मजबूत करणे, सत्यावर दृढ राहणे आणि अल्लाहच्या मार्गात जुलुम सहन करण्याबद्दल उपदेश केला जावा आणि सुपरिणामांच्या भविष्यवाणीव्दारे निरंतर सांत्वन केले जावे. मक्का सोडून मदीन्याला जाण्याची वेळ जवळ आल्यावर त्यांना घरदार, संपत्ती व साहित्य,

नातेवाईक व मित्र मंडळींना सोडून जाणे आणि त्या सर्व ऐहिक बंधनांचा बळी देण्याची त्यांची तयारी करून घेणे आणि त्यासाठी आपल्या पालनकर्त्यावर पूर्ण भरवसा ठेवण्याचे आदेश दिले जावेत. मदीना पोचल्यानंतर एकीकडे तर ईमानधारकासाठी ईमानशी संबंधित विस्तृत धार्मिक आज्ञांचे अवतरण सुरू व्हावे, त्यांना जीवनाच्या विविध क्षेत्रासाठी धर्म-कायद्याचे नियम दिले जावे, त्यांच्यात सशस्त्र हल्ल्याला तोंड देण्यासाठी तन मन धन ओवाळून टाकण्याची भावना निर्माण केली जावी. दुसरीकडे मुनाफिकांची निंदा व भर्त्सना केली जावी. त्यांना सदाचाराची वागणूक अवलंबिण्यासाठी धमकावले जावे, त्यांच्या उपद्रवाबद्दल खऱ्या मुस्लिमांना जागृत केले जावे. तिसरीकडे अनेकेश्वरवादी, ज्यू, ख्रिश्चन म्हणजे प्रत्येक संप्रदायाच्या मुस्लिमेतरांदरम्यान सत्य-धर्माचा प्रचार व प्रसार करण्याचा क्रम चालूच रहावा. केवळ मदीनाच नव्हे तर मदीन्याच्या सभोवतालचा प्रदेश आणि अरबस्थानातील मुस्लिमेतरांना, इतकेच नव्हे तर स्थिती अधिक सुरळीत आणि आवाहन कार्य अधिक व्यापक झाल्यावर अरबस्थानाच्या बाहेरील जातीनासुध्दा इस्लामचे आवाहन पोचविण्याचा प्रारंभ केला जावा. मग अंतिम टप्प्यात की जेव्हा आवाहन-कार्याचा, नास्तिकतेच्या शक्तीचा बीमोड केल्यानंतर, वरचष्मा होईल तेव्हा ईमानधारकासाठी तपशीलवार आज्ञा वेगाने अवतरल्या जाव्यात आणि आवाहन-कार्य पूर्णतेला पोचेपर्यंत या आज्ञादेखील पूर्ण करून पवित्र कुरआन परिपूर्ण केला जावा.

जो मनुष्य पवित्र कुरआनचे गहन दृष्टीने अध्ययन करील त्याला स्पष्टपणे वाटेल की कुरआनचे अवतरण अगदी अशाच प्रकारे झाले आहे. म्हणून हदीस (पैगंबरांचे वचन) मध्ये जो असा उल्लेख आहे,

*'महान अल्लाहने आपल्या प्रेषिताच्या मृत्यूची वेळ जवळ आल्यावर निरंतर वह्य पाठविल्या, येथपावेतो की ज्या काळात त्याने त्यांना (पैगंबरांना) मृत्यू दिला त्या काळात वह्यचे अवतरण सर्वांत अधिक होत राहिले.'* (बुखारी)

तर हेदेखील मुळात पवित्र कुरआनच्या त्या स्थितीचे व त्याच्या तत्त्वज्ञानाचे एक स्पष्टीकरण आहे. पैगंबरांचा मृत्यूकाळ जवळ येण्याचा अर्थ होता आवाहन-कार्याचे पूर्णत्वाला पोचणे आणि इस्लामच्या सत्तेचे दृढ होणे. हे स्पष्ट आहे की शरीअतचे (धर्म-कायद्याचे) अधिकांश विस्तृत आदेश उतरण्याची स्वाभाविक संधी व योग्य वेळ तीच होती जेव्हा इस्लामची सत्ता मजबूत झाली होता. इस्लाम धर्मीय लोक स्वतंत्रपणे त्याची अंमलबजावणी करण्याच्या स्थितीत आले होते. म्हणून याच्या पूर्वी स्वाभाविकपणे हे आदेश स्थगित राहिले जे संधी व वेळेच्या प्रतीक्षेत होते. मग जेव्हा ही वेळ आली तेव्हा ते वेगाने उतरू लागले आणि अल्लाहच्या पैगंबरावर वह्यची रीघ लागली.

## पवित्र कुरआनचे संकलन

पवित्र कुरआन ज्या क्रमाने अवतरित झाला त्याच क्रमाने त्याचे संकलन केले गेले नाही. त्याचे काही सूरह तर असे अवश्य आहेत जे एकाच वेळी पूर्ण उतरले होते म्हणून त्यांच्या आयती (कुरआनमधील वचने) संकलन क्रमदेखील स्वाभाविकपणे आपल्या अवतरण क्रमाप्रमाणेच आहे. परंतु बहुतेक सूरहची बाब याच्या उलट आहे. एकाच वेळी अवतरण्याऐवजी त्यांचे विभिन्न अंश विभिन्न वेळी अवतरले होते. सूरहचा एक अंश जर आज अवतरला तर दुसरा अनेक महिन्यानंतर आणि तिसरा अनेक वर्षानंतर. प्रारंभिक आयती जर मक्की (मक्केत अवतरलेली) आहेत तर अंतिम मदनी (मदीनेत उतरलेली) आहेत. सूरहचे त्या आयती ज्या आज त्याच्या शेवटच्या भागात दिसत आहेत अवतरणाच्या दृष्टीने त्या आयतींपेक्षा अगोदरचे आहेत ज्या प्रारंभी आहेत. एकाच वेळी अनेक सूरह अवतरत आहेत. आता ज्या आयती अवतरल्या त्यांना एखाद्या सूरहमध्ये ठेवले जात आहे आणि काही वेळेनंतर दुसऱ्या आयती अवतरल्या त्यांना अन्य एखाद्या सूरहचा अंश बनविला जात आहे. अशा प्रकारे एकाच वेळी अनेक सूरह आपल्या पूर्णत्वाच्या टप्प्यातून जात आहेत. एक सूरह ज्याचे अवतरणनंतर सुरू झाले तो आपल्या समाप्तीला पोचला. परंतु एक दुसरा सूरह ज्याचे अवतरण अनेक महिन्यापूर्वी झाले होते, तो पूर्ण होण्यासाठी त्याला अद्याप अनेक महिने व अनेक वर्षापर्यंत वाट पाहावयाची आहे. उस्मान (रजि.) यांचे कथन आहे,

*'प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर एकाच वेळी अनेक सूरह अवतरत असत जेव्हा एखादी आयत अवतरत असे त्याच वेळी आपल्या एखाद्या लिहिणाऱ्याला बोलावून ते म्हणत असत की या आयतींचा अमुक सूरहमध्ये समावेश करा.'* (तिर्मिजी)

प्रत्येक सूरहच्या आतील क्रम व संकलनाप्रमाणेच त्या सर्वांच्या पारस्परिक क्रमाचीसुध्दा अशीच स्थिती आहे. पवित्र कुरआन जेव्हा संकलित केला गेला तेव्हा असे घडले नाही की जो सूरह अगोदर अवतरला होता त्याला अगोदर आणि जो नंतर अवतरला होता त्याला त्याच्यानंतर ठेवला गेला असेल. आणि अशा प्रकारे संपूर्ण कुरआनचे सर्व सूरह त्यांच्या अवतरण क्रमाप्रमाणे संकलित केले गेले असतील. असे ज्या हेतु व चातुर्याने केले गेले असेल त्याचे स्पष्टीकरण तर पुढे येतच आहे. आपण विचार केला तर लक्षात येईल की सूरहना त्यांच्या अवतरण क्रमाप्रमाणे संकलित करण्याची पध्दतसुध्दा काढणे शक्य नाही. त्याला कारण असे की हे ज्याप्रकारे अवतरत होते (ज्याच्याविषयी आताच आपल्याला सांगितले गेले आहे) त्या दृष्टीने तर कधी-कधी हा निर्णय घेणेच शक्य नाही की अवतरणाच्या दृष्टीने कोणता सूरह अगोदरचा आहे आणि

कोणता नंतरचा. आपल्या काही अंशाच्या दृष्टीने एकच सूरह दुसऱ्या एका सूरहपेक्षा अगोदरचा आहे तर काही दुसऱ्या अंशाच्या दृष्टीने त्याच्यानंतरचादेखील आहे. त्याचप्रमाणे असेही केले गेले नाही की मक्केत उतरलेल्या सूरहना एकत्र व एकाच क्रमाने ठेवले गेले असावे आणि मदीनेत उतरलेल्या सूरहना एकत्र क्रम दिला गेला असावा. याचा अर्थ असा की सूरहच्या संकलनक्रमामध्ये ज्याप्रमाणे अवतरणक्रमाचा विचार ठेवला गेला नाही त्याचप्रमाणे त्यांचे मक्केत अवतरण झाले किंवा मदीनेत अवतरण झाले याच्याकडेही लक्ष दिले गेले नाही. या सर्व गोष्टीकडे दुर्लक्ष करून त्यांना एखाद्या दुसऱ्याच पध्दतीने क्रम दिले गेले व संकलित केले गेले. अवतरण क्रमप्रमाणेच कुरआनला संपादित न करण्यामागे कोणता हेतु व बुध्दिमत्ता होती? या वास्तविकतेची उकल अगदी सहजपणें होईल जर आपण अवतरणाच्या स्थितीच्या त्या चर्चेला आपल्या मनात ताजे कराल जी आताच आपण पाहिली आहे. कुरआन या अर्थाने ग्रंथ नाही की यात एक विषय निश्चित करून त्याच्या सर्व भागावर केवळ वैज्ञानिक, कलात्मक व सैध्दांतिक पध्दतीने क्रमवार चर्चा केली आहे. इतकेच नव्हे तर त्याचा दर्जा वास्तविकत: एका मार्गदर्शकाच्या सामयिक व्यावहारिक आदेश आणि एखाद्या आवाहकाच्या प्रवचना समान आहे. (जसे की पुढे तपशीलाने कळेल) त्याचे अवतरण त्या क्रमाने झाले होते ज्या क्रमाने झाले ज्या क्रमाने आवाहन-कार्याचा प्रारंभ व विकास झाला होता. हे स्पष्ट आहे की जेव्हा आवाहन-कार्य आपल्या चरमबिंदूला पोचले आणि त्याचबरोबर पवित्र कुरआनचे अवतरणेसुध्दा पूर्ण झाले तर आता वह्यच्या मालिकेला संकलित करण्यासाठी तो क्रम कोणत्याही प्रकारे योग्य ठरू शकत नव्हता जो आवाहन-कार्याच्या रोजच्या गरजांच्या दृष्टीने अवलंबिला गेला होता. अल्लाहच्या त्या आदेश व संदेशांना आता एका कायम स्वरूपी ग्रंथाच्या रूपात परिवर्तीत करण्यासाठी एक दुसराच क्रम आवश्यक होता की ज्यात आवाहनाच्या पूर्णतेनंतरच्या परिस्थितीला डोळ्यांसमोर ठेवले गेले असेल. असे करणे त्या लोकांच्या दृष्टीनेदेखील आवश्यक होते ज्यानी या धर्मावर ईमान आणले होते आणि त्या लोकांच्या दृष्टीनेसुध्दा गरजेचे होते ज्यांनी अद्याप ईमान आणले नव्हते. अथवा जे भविष्यकाळात जन्म घेणार होते आणि या पवित्र कुरआनची संबोधित मंडळी बनणार होते.

प्रारंभी ज्यांनी ईमान आणले होते त्यांची स्थिती इस्लामशी एका अपरिचिताप्रमाणे होती. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स.) यांना त्यांच्यासह सुरवातीपासून काम करणे आवश्यक होते. म्हणून त्यांच्या बाबतीत आदेश व आज्ञासंबंधी केवळ असे पाहिले जात होते की त्यांची आंतरिक व बाह्य स्थिती काय आहे? आणि त्यांना कोणत्या वेळी कशा प्रकारच्या आदेशांची गरज आहे? परंतु आवाहन-कार्य पूर्ण झाल्यानंतर त्यांचा दर्जा एकदम बदललेला होता. आता त्यांनी पवित्र कुरआनवर मन व बुध्दीने सर्वप्रकारे तयार होऊन

ईमान आणले होते. ईमान आणून ते 'उम्मते मुस्लिम' (मुस्लिम समुदाय) बनलें होते. तो मुस्लिम समुदाय जो पैगंबरानंतर सत्याचे आवाहन करणारा होता आणि हे कार्य पुढे चालू ठेवण्यास जबाबदार ठरविला गेला होता. सत्याचे आवाहन कार्य प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अरबस्थानाच्या हद्दीत सर्व सैध्दांतिक आणि व्यावहारिक दृष्टीने परिपूर्ण करून त्याच्या हवाली केले होते. परिस्थितीच्या या मौलिक परिवर्तनाची स्पष्ट निकड होती की आता कुरआन त्यांच्यासाठी आपल्या अवतरण क्रमाऐवजी एका नवीन क्रमाने संपादित केले जावे. अशा क्रमाने की ज्यात धार्मिक तथ्ये समजावून देणे, धर्म-कायद्याच्या (शरीअत) आज्ञा सांगणे व धर्माच्या आत्म्याला स्पष्ट करण्यासाठी उत्तम भाषा शैली व श्रेष्ठ वर्णन-चातुर्याला दृष्टीसमोर ठेवलेले असेल. जेणेकरून त्यांनी अल्लाहच्या वाणीला विभिन्न विभक्त तुकडे व संबंधरहित अंशाच्या रूपात पाहणे व त्याच्या शिकवणींना विस्कटलेल्या आदेशांचा संग्रह म्हणून पाहण्याऐवजी क्रमबध्द व व्यवस्थित स्वरूपात पाहावे.

उरले ते लोक ज्यांनी अद्याप कांही कारणास्तव ईमान आणले नव्हते अथवा ज्यांच्यापर्यंत हे आवाहन पोचले नव्हते, अथवा त्यांनी अद्याप जन्म घेतला नव्हता आणि नंतर भविष्यात जे या आवाहनाचे संबोधित व आमंत्रक बनणार होते. तर त्यांच्या दृष्टीनेसुध्दा नव्या क्रमाची तितकीच तीव्र गरज होती जितकी की अगोदर उल्लेख केलेल्या लोकांच्या दृष्टीने होती. इतकेच नव्हे तर त्याच्यापेक्षा ही अधिक तीव्र होती. त्याला कारण असे की ही एक मान्य वस्तुस्थिती आहे की कोणत्याही वाणीचा मुद्दा तोपर्यंत पूर्णपणे स्पष्ट होऊ शकत नाही जोपर्यंत तो मुद्दा भाषाशैली व भावाभिव्यक्तीच्या दागिन्याने सजविलेला नसेल. आणि त्याच्या विभिन्न भागांना योग्य क्रम आणि योग्य व्यवस्थेसह प्रस्तुत केला गेला नसेल. यात काही शंका नाही की जोपर्यंत एखाद्या वाणीचा मुद्दा पूर्णपणे स्पष्ट नसेल तोपर्यंत तिला प्रशंसा प्राप्त करण्याचा कोणताही अधिकार पोचत नाही. आता जर पवित्र कुरआन कयामत (अंतिम दिन)पर्यंत महान अल्लाहने मंजूर केलेला एकमेव मार्गदर्शन ग्रंथ (हिदायत नामा) आहे. प्रत्येक व्यक्ती व जातीसाठी त्याला ईशग्रंथ मान्य करणे अनिवार्य आहे. (जसे की मागील पृष्ठात तपशीलाने स्पष्ट झाले आहे) तर विचार करा. सत्य मानण्यास तयार व समंजस लोकासाठीसुध्दा या कुरआनचे वास्तविक अर्थ व गुण पूर्णपणे प्राप्त करणे किती दुष्कर होते, जर त्याला अवतरण-क्रमाप्रमाणेच संपादित केले गेले असते? आणि लोकांना सत्याचा पुरावा कसा दिला गेला असता जर अल्लाहचा हा ग्रंथ त्यांच्यासमोर तर्कपूर्ण क्रमाने व भाव-सौंदर्याच्या युक्तीने परिपूर्ण एका सुसंबध्द, संतुलित व व्यवस्थित वाणीच्या रूपाने आला नसता?

या कारणास्तव सत्य तर असे आहे की जर पवित्र कुरआनला अवतरण क्रमानुसारिच संकलित केले गेले असते तर तो मुहम्मद (स.) यांच्या वह्य व अल्लाहच्या आदेशांची एक रोजनिशी तर अवश्य बनला असता. आज अवतरण - इतिहासाच्या शोकिनासाठी तो मोठी मनोरंजक वस्तुसुध्दा बनला असता. परंतु मग असेही होते की मार्गदर्शनाच्या शोकिनासाठी तो पूर्णपणे मार्गदर्शन राहिला नसता आणि त्याची कित्येक प्राणपोषक सत्ये हरवून गेली असती.

## संकलनाचा इतिहास

आता आपण असे समजून घेऊ की पवित्र कुरआनचे संकलन केव्हा झाले? आणि कोणाच्या शुभ हस्ते झाले? यासाठी आम्हाला ज्या साधनांच्याकडे वळावे लागेल ती दोन आहेत.

एक तर खुद्द कुरआनचे स्वत:चे कथन आणि दुसरे इतिहासाची साक्ष.

**१) कुरआनचे कथन** - या बाबतीत पवित्र कुरआनमध्ये जे काही सांगितले गेले आहे त्याचे शब्द असे आहेत.

*'हे मुहम्मद (स.) विश्वास ठेवा की या गोष्टीची जबाबदारी आमची आहे की या कुरआनला एकत्र करावे आणि तो वाचून दाखवावा की त्याप्रमाणे तुम्हीसुध्दा वाचावे.'*

(सूरह कियामह)

'जेव्हा आम्ही वाचून दाखवू' याचा अर्थ असा आहे की आमचे फरिश्ते जिब्रईल (अ.) तुम्हाला वह्य वाचून ऐकवितील. हे शब्द आपल्या मुद्यात अगदी स्पष्ट आहेत आणि त्यांच्यावरून कुरआनच्या संकलनाच्या प्रश्नाचा प्रत्येक पैलू पूर्णपणे स्पष्ट होतो. उदाहरणार्थ,

(१) कुरआन संकलनकार्यात स्वत: प्रेषित मुहम्मद (स.) यांची आपली इच्छाकृती, अधिकार आणि प्रयत्नांचा कसलाही हात नाही, तर हे कार्य पूर्णपणे अल्लाहने केलेले आहे. या बाबतीत प्रेषित मुहम्मद (स.) यांचे कार्य व कर्तव्य केवळ इतकेच होते की त्यांनी जिब्रईल (अ.) यांच्या तोंडून कुरआन ऐकावे आणि जसे ऐकले तसे त्याचे पठण स्वत: करावे.

(२) या जमा केलेल्या कुरआनच्या अर्थात क्रम व संकलनाच्या गोष्टीचादेखील अनिवार्यपणे समावेश आहे. म्हणजे या आयतीवरून केवळ हेच कळत नाही की संपूर्ण कुरआन अल्लाहने जमा केलेला आहे तर हेदेखील सिध्द होते की याचे संकलनदेखील अल्लाहकडूनच

आहे कारण हे स्पष्ट आहे की जिब्रईल (अ.) यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांना कुरआनच्या आयती व सूरह कोणत्या न कोणत्या क्रमानेच ऐकविले होते. म्हणून (फत्तबिअ कुरआन:) चा अर्थ केवळ असाच नव्हे की जिब्राईल (अ.) जे काही पठन करून तुम्हाला ऐकवितील तेच तुम्हीदेखील पठन करा. इतकेच नव्हे तर असाही अर्थ झाला की आयती व सूरहचा जो क्रम ते ठेवतील तोच क्रम तुम्हीदेखील ठेवा. म्हणून या आयतीत 'कुरआनच्या ज्या संकलनाचा उल्लेख आहे' आणि ज्याला अल्लाहने आपली जबाबदारी म्हटले आहे. ते कुरआनचे शब्द, आयती व सूरहचे संकलन अजिबात नाही, तर ते असे संकलन आहे ज्यात क्रम व संकलनाचा अर्थसुध्दा अनिवार्यपणे समाविष्ट आहे.

हे संकलन व क्रम लावण्याची प्रक्रिया प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या उपस्थितीतच पूर्ण झाली. असे घडले नाही की कुरआन प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर तर विखुरलेल्या आयती आणि क्रमविहीन सूरहच्या स्वरूपात उतरला गेला आणि मग जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) इहलोक सोडून गेले तेव्हा हे ईशवचन पूर्ण झाले. कारण अशा स्थितीत पैगंबर (स.) यांना असे सांगण्याचा काहीच अर्थ उरला नसता की 'जेव्हा आम्ही ते पठन करून ऐकवू तेव्हा तुम्हीसुध्दा त्याप्रमाणेच पठन करा.'

या सर्व गोष्टीसह आणखी एका गोष्टीलासुध्दा बुध्दी व कथन या दोन्ही दृष्टीने एक मान्य वास्तविकतेचे स्थान आहे. आणि ती अशी आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या प्रेषितत्वाच्या अंतिम क्षणात पवित्र कुरआनला ज्या दर्जा, रूप व क्रमाने उम्मत (पैगंबरांचे अनुयायी)च्या हवाली केले तो अगदी तसाच होता ज्याच्या सह तो पैगंबरांना अल्लाहकडून प्रदान केला गेला होता. सामान्य बुध्दी सांगते की जो ग्रंथ कियामत (अंतिम दिन)पर्यंतच्या मानवी जीवनाचा मार्गदर्शन-ग्रंथ बनणार होता तो प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यापासून त्यांच्या सोबत्यांपर्यंत अगदी त्याच दर्जा, रूप व क्रमासह पोचला. महान अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांना अशी आज्ञा दिली,

*''हे पैगंबर (स.) तुमच्या पालनकर्त्याकडून जे काही तुम्हावर अवतरिले गेले आहे. त्याला (जसाचा तसा) लोकांपर्यंत पोचवा आणि जर तुम्ही असे केले नाही तर त्याचा संदेश पोचविण्याचा हक्क तुम्ही अदा केला नाही.'* (सूरतुल माइदह)

साक्ष देतो की निश्चितपणे असेच घडले. त्याला कारण असे की जेव्हा कुरआनचे केवळ शब्द व आयतीच अल्लाहकडून आलेल्या आहेत असे नव्हे तर त्यांचा क्रम व संकलनसुध्दा त्याच्याचकडून आहे. जसे की मागील आयतीवरून कळाले, तर हा क्रम व संकलनसुध्दा अनिवार्यपणे ।। 'माऽ उन्ज़िला इलैका मिर्रब्बिका' ।। मध्ये सामील असल्याचे ठरते. त्यानंतर या प्रसाराच्या आज्ञेची पूर्ण अंमलबजावणी केवळ याने होऊ

शकत नव्हती की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी कुरआनला याच शब्दांसह लोकापर्यंत पोचवावे ज्यांच्यासह तो उतरला होता. तर त्याच्यासाठी हेदेखील आवश्यक होते की त्यांनी तो त्याच व्यवस्था व क्रमासह लोकापर्यंत पोचवावा ज्या व्यवस्था व क्रमासह त्यांना तो आपल्या पालनकर्त्याकडून पठन करून ऐकविला गेला होता.

**२)** ऐतिहासिक कथनावरून या गोष्टीचे जे स्पष्टीकरण मिळते त्यावरून वस्तुस्थिती अधिक-अधिक स्पष्ट होते. तिर्मिजी शरीफ़चे हे कथन आणि उस्मान (रजि.) यांचे कथन नुसार जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर काही अवतरण होत असे तेव्हा ते त्याच वेळी आपल्या लिहिणाऱ्यांना बोलावीत. आदेश देत असत की या आयतीना अमुक सूरहमध्ये आणि अमुक ठिकाणी ठेवा. यानंतर यासंबंधी अधिक तपशीलसुध्दा ऐका.

*''कारण जिब्रईल (अ.) प्रेषित मुहम्मद (स.) यांना पूर्ण रमजान महिनाभर प्रत्येक रात्री येऊन भेटत असत. या भेटीत प्रेषित मुहम्मद (स.) त्यांना कुरआन ऐकवीत असत.'*

(बुखारी शरीफ)

*''जिब्रईल (अ.) प्रेषित मुहम्मद (स.) यांना प्रत्येक वर्षी रमजान महिन्यात एकदा कुरआन पठन करून ऐकवीत असत. आणि ज्या वर्षी त्यांचे निधन झाले त्या वर्षी दोनदा पठन करून ऐकविले होते.'* (बुखारी शरीफ़)

या कथनावरून व वर्णनावरून सिध्द होते की कुरआनच्या अवतरणासंबंधी जिब्रईल यांचे कार्य कुरआनची वह्य पोचविण्यावर समाप्त होत नाही. तर त्यांची नेमणूक अल्लाहकडून यासाठीसुध्दा झाली होती की प्रत्येक वर्षी रमजानमध्ये अवतरित कुरआन पैगंबरांना पुन्हा एकत्रित ऐकवीत जावे. आणि तसेच त्यांच्याकडून ऐकूनही घ्यावे. जेव्हा पैगंबरांच्या जीवनाचा अंतिम रमजान येईल तेव्हा आता संपूर्ण कुरआन (कारण तो त्या वेळेपर्यंत पूर्ण झालेला होता) एकदाच्याऐवजी दोनदा पठन करून ऐकवावा आणि त्यांच्याकडून पठन् करवून ऐकून घ्यावा. जिब्रईल (अ.) यांनी तसेच केले. विचार करा की शेवटच्या रमजानमध्ये अल्लाहचे फरिश्ते आणि त्याच्या पैगंबरांनी जो पवित्र कुरआन दोन-दोन वेळा एक दुसऱ्याला पठन करून ऐकविला त्यात काही क्रम, आयतींचा क्रम अथवा सूरहचा क्रम नसेल ना? तो निश्चितपणे एका ठराविक क्रमानेच पठन केला आणि ऐकविला गेला होता. निस्संदेह हा तोच क्रम होता जो महान अल्लाहजवळ अगोदरपासूनच ठरलेला व त्याच्या कथन 'हुवा कुरआनुम मजीदुन फ़ी लौहिम महफ़ूज़'प्रमाणे सुरक्षित पाटीवर होता. याशिवाय अगदी स्वाभाविक आहे की याच क्रमाने पैगंबरांनी 'उम्मत' (अनुयायी) लासुध्दा ऐकविला आणि याच क्रमाने उम्मतसुध्दा आजपर्यंत त्याचे निरंतर पठन करीत आली आहे. हे एक ऐतिहासिक तथ्य आहे की आज उम्मत ज्या क्रमाने

कुरआनचे पठन करीत आहे त्याचा पुरावा तर अखंडपणे प्रेषित मुहम्मद (स.)पर्यंत पोचतो. पैगंबरांनी हा क्रम आपल्या सोबत्यांना शिकविला. त्यांनी तो आपल्यानंतरच्या लोकापर्यंत पोचविला. त्यांनी हा ठेवा आपल्यानंतरच्या लोकांच्या हवाली केला, आणि अशा प्रकारे हा क्रम निरंतर चालत राहिला आहे.

पवित्र कुरआनचा हा संकलन-क्रम पूर्णपणे दैवानुग्रह आहे. या बाबतीत जे काही घडले ते अल्लाहकडूनच घडले. यात प्रेषित मुहम्मद (स.) यांची दखल नाही.

तथापि या संकलन व क्रमाच्या काही व्यवस्था अशासुध्दा आहेत ज्या प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनानंतर खिलाफत काळात केल्या गेल्या. पवित्र कुरआनच्या क्रम व संकलनाचा, त्याच्या लिखाण व लिहविण्याचा आणि तो त्याच लोकांना तोंडपाठ करविण्याचा प्रश्न आहे तो तर निःसंशय पैगंबरांच्या काळातच पूर्ण झालेला होता. आणि हाफ़ीज़ (कुरआन तोंडपाठ करणारे) लोकांच्या छातीत अगदी जसाचा तसा क्रमवार संकलित झाला होता. परंतु ते लिखाण व हस्तलिखित पृष्ठे की ज्यात हा कुरआन लिहविला गेला होता, ते विभिन्न भागांच्या रूपात व वेगवेगळे होते. जेव्हा पैगंबर (स.) यांच्या निधनानंतर पहिल्याच वर्षी बनू हुनैफा नामक टोळीशी यमामा मुक्कामी मुस्लिमांचे युध्द झाले आणि त्यात असंख्य कुरआनचे पाठांतर केलेले हाफीज़ हुतात्मा झाले तेव्हा उमर (रजि.) यांच्या मनात लगेच विचार आला की (जरी महान अल्लाहने कुरआनच्या रक्षणाचा वायदा केलेला आहे परंतु आमची ईमानधारक म्हणून जबाबदारी आहे की या ईशवचनाच्या पूर्ततेत आम्हीदेखील भागीदार बनावे. म्हणून आम्ही कुरआनच्या संपूर्ण सुरक्षेची व्यवस्था पूर्ण सावधगिरीने केली पाहिजे. असा विचार येताच ते अबू बक्र (रजि.) यांच्या सेवेत उपस्थित झाले. ते तेव्हा खलीफ़ा व पैगंबरांचे उत्तराधिकारी होते. त्यांच्यासमोर संपूर्ण स्थिती प्रस्तुत करून उमर (रजि.) यांनी त्यांच्यासमोर असा प्रस्ताव ठेवला की विभिन्न वस्तूवर लिहिलेल्या कुरआनला एकत्रित केले जावे. प्रथम त्यांनी अशी अडचण दाखविली की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी कुरआनला एकत्रित केले नाही तर उम्मतकडून केवळ तोंड पाठ करवून व लिहून घेऊनच समाधान मानले. तेव्हा मी असे कसे करू शकतो? स्पष्ट आहे की हे पैगंबरांच्याबद्दल असलेल्या प्रेमाच्या वाढलेल्या हद्दीपर्यंत प्रेषितांच्या अनुयायित्वाचे प्रदर्शन होते. या सूचनेत ईशइच्छा अथवा पैगंबरांच्या इच्छेचा विरोध अथवा तिचे उल्लंघन कदापि नव्हते. जेव्हा उमर (रजि.) यांनी हिताकडे वारंवार त्यांचे लक्ष वेधले तेव्हा लवकरच त्यांनादेखील याची गरज भासली आणि त्यांनी त्यासंबंधी कृतीचे पाऊल उचलले. जैद बिन साबित (रजि.), जे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या कायम संगतीमुळे वह्य लिहिणाऱ्या लोकांत सर्वांत पुढे होते. यांना पाचारण केले

आणि त्यांना कुरआन क्रमवार लिहिण्याची व एका प्रतीत तयार करण्याची आज्ञा दिली. काही अन्य अत्यंत प्रसिध्द सहाबींच्या (पैगंबरांचे सोबती) समवेत ज़ैद (रजि.) यांनी या कार्याचा आरंभ केला. उमर (रजि.) यांनी मसजिदे नबवीसमोर उभे राहून जाहीर घोषणा केली की ज्या व्यक्तीने जितके सूरह लिहून ठेवले असतील त्याने ते आमच्याजवळ आणावेत. प्रत्येक जण आपण लिहिलेले सूरह घेऊन हजर आला. ज़ैद (रजि.) आणि त्यांचे सहकारी संपूर्ण कुरआनचे हाफ़िज होते. त्याशिवाय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी लिहवून घेतलेले लिखाण त्यांच्या जवळ होते तरी अत्यंत सावधगिरी म्हणून त्यांना अन्य दुसऱ्या साक्षी मिळवणेदेखील आवश्यक वाटले. त्यांना जे काही लिहिलेले आढळत असे त्यावर कमीतकमी दोन विश्वसनीय साक्षीदार घेत असत की हे जे काही लिहिले गेले आहे तै प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या समोर लिहिले गेले आहे किंवा नाही? आणि अमुक व्यक्तीने जे काही ऐकले ते त्याने प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडून तसेच ऐकले होते किंवा नाही? जेव्हा साक्षीदाराचे निधन होत असे तेव्हा ते आपल्या स्मृति व आपल्या लिखाणाशी तुलना करित आणि नंतरच ते लिहित. जेव्हा संपूर्ण कुरआन लिहिला गेला तेव्हा पैगंबराचे उत्तराधिकारी आणि अमीरुल मोमिनीन (इस्लामी राज्याचे शासनाध्यक्ष) म्हणून अबू बक्र (रजि.) यांच्या संरक्षणात ठेवला गेला. त्यांच्या निधनानंतर दुसरे खलीफा उमर (रजि.) यांच्या संरक्षणात कुरआन ठेवला गेला. त्यांच्या निधनानंतर त्यांचा उत्तराधिकारी कोणीही ठरला नव्हता म्हणून त्यांच्या सुकन्या, ज्या उम्मुलमोमिनीन व प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या धर्म पत्नी होत्या, हफ्सा यांनी आपल्याजवळ अमानत (ठेव) म्हणून ठेवले. ही जणू पवित्र कुरआनची 'सरकारी प्रत' होती. म्हणून तिचा दर्जा त्या दुसऱ्या असंख्य प्रतींच्या तुलनेत अधिक मान्य होता, ज्या दुसऱ्या लोकाजवळ होत्या आणि ज्या त्यांनी स्वत: तयार केल्या होत्या.

अशा तऱ्हेने एका विशिष्ठ काळापर्यंत संपूर्ण कुरआन एका प्रतीत एकत्रित स्थितीत खिलाफत-केंद्रात सुरक्षित राहिला. आम लोकांचा विश्वास आपल्या स्मृतीवर, तसेच आपल्या स्वत:च्या लिहिलेल्या अंशावर राहिला. तिसरे खलीफा उस्मान (रजि.) यांचा काळ (हिजरी सन २३) आला, या काळात इस्लाम अरबस्थानच्या सीमा ओलांडून पूर्वेस इराण व पश्चिमेस इजिप्तपर्यंत पसरला होता. मोठ्या संख्येने, लक्षावधीच्या पुढे जाऊन कोट्यवधींपर्यंत, लोक इस्लाममध्ये दाखल होत होते. अरबस्थान सोडून इतर देशातील लोकांनी इस्लामचा स्वीकार केला होता व करीत होते. या लोकांना अरबी भाषा अजिबात येत नव्हती म्हणून कुरआन पठनात चुका करू लागले. येथपावेतो की सीरिया व इराकचे लोकदेखील याला अपवाद नव्हते. आर्मिनिया व आजरबाइजानच्या युध्द-

प्रसंगी या दोन्हीं कडील लोक एकत्र आले तेव्हा हुजैफ़ा (रजि.) यांना हे पाहून फार वाईट वाटले की कुरआन पठन करण्याच्या पध्दतीत व स्वरात या लोकामध्ये मोठी भिन्नता आहे. युध्दावरून परतल्यावर त्यांनी उस्मान (रजि.) यांना या वस्तुस्थितीची जाणीव दिली. या गोष्टीकडे त्यांचे लक्ष वेधले की या बिघाड व उपद्रवाचे दार बंद केले जावे जे भविष्यात या फरकामुळे उत्पन्न होण्याची चिन्हे दिसत होती. नाहीतर दुर्देवाने असे घडू नये की ज्याप्रमाणे पूर्वीच्या लोकांनी दिव्य ग्रंथांना विकृत करून टाकले त्याप्रमाणे मुस्लिमसुध्दा मतभेदाला बळी पडावेत. उस्मान (रजि.) यांनी काळाच्या या अत्यंत महत्त्वाच्या धार्मिक सेवेची निकड लक्षात घेतली आणि असे ठरविले की मूळ कुरआनची नक्कल बिनचूक कुरैशी पाठानुसार घेऊन सर्व इस्लामी प्रांतात पाठविली जावी, जेणेकरून लोक त्यानुसारच कुरआनचे पठन करतील आणि मतभेदात गुरफटणार नाहीत. या कारणास्तव त्यांनी हफ्सा (रजि.) यांच्याकडून ती पेटी मागविली ज्यात अबू बक्र (रजि.) यांनी लिहून घेतलेली प्रत ठेवली होती. ज़ैद बिन साबित (रजि.) यांना अन्य तीन महान सहाबी अब्दुल्लाहबिन जुबैर (रजि.), सईद इब्नुल आस (रजि.) आणि अब्दुर्रहमान बिन हारिस (रजि.) यांच्याबरोबर योग्य आदेश देऊन या महान कार्यासाठी नियुक्त केले. जेव्हा पुष्कळ नकला तयार झाल्या तेव्हा त्यांनी एक-एक नक्कल इजिप्त, कूफ़ा, बसरा, मक्का, सीरिया, यमन व बहरीनच्या गव्हर्नराकडे पाठवून दिल्या आणि कळविले की ही प्रत बिनचूक पाठानुसार लिहिली गेली आहे. लोकांना आदेश दिला जावा की या प्रतिप्रमाणेच कुरआनचे पठन केले जावे. एक प्रत स्वत: आपल्याजवळ मदीनेत ठेऊन घेतली होती जिचे नाव 'इमाम' असे होते. जेव्हा त्यांना ठार केले गेले तेव्हा ते याच प्रतवरून कुरआनचे पठन करीत होते. उस्मान (रजि.) यांनी नक्कल करवून घेतलेल्या प्रती अद्याप मक्का, मदीना, दमास्कस व फारस (मोरोक्को) मध्ये अस्तित्वात आहेत.

कुरआनच्या संकलनासंबंधी या दोन गोष्टी आहेत ज्या पैगंबर (स.) यांच्या निधनानंतर घडल्या. परंतु हे स्पष्ट आहे की कुरआनचे संकलन व क्रम अल्लाहकडून असण्यावर या गोष्टींचा कदापि कोणताही प्रभाव पडत नाही. तर खरे पाहता या गोष्टींचा संबंध कुरआन जमा करणे व त्याच्या संकलनाशी अजिबात नाही. त्यांचा काही संबंध आहे तर तो कुरआनच्या संरक्षणाच्या प्रश्नाशी आहे. आणि वास्तविकत: या गोष्टीसुध्दा अल्लाहच्या त्याच वचनाच्या पूर्ततेचा एक भाग होत्या जे कुरआनच्या संरक्षणाच्या बाबतीत दिले गेले होते आणि त्याच अपरोक्ष व्यवस्थेच्या कड्या होत्या ज्या कुरआनला कियामत (अंतिम दिन)पर्यंत सुरक्षित ठेवण्यासाठी वचन रूपाने अध्याहृत होत्या. ही अबू बक्र (रजि.) व उस्मान (रजि.) यांची अभिनंदनीय कार्ये होत. त्या भाग्यशाली सज्जनावर त्यांच्या पालनकर्त्याचे उपकार आहेत की त्यांना हे सौभाग्य प्राप्त झाले.

# सुरक्षित ग्रंथ

पवित्र कुरआनचे एक वैशिष्ठ्य व मुख्य गुण असासुध्दा आहे की तो जसाचा तसा सुरक्षित आहे. याचा उल्लेख मागील पृष्ठात आमच्यासमोर आलेला आहे. परंतु ही गोष्ट स्पष्ट आहे की ही काही कमी महत्त्वाची गोष्ट नाही, तर फार मोठा व दूरगामी परिणाम उत्पन्न करणारा प्रश्न आहे. महत्त्वाची निकड अशी आहे की यावर जरा तपशीलाने दृष्टी टाकली जावी.

## सुरक्षित असण्याचा अर्थ

या बाबतीत सर्वप्रथम लक्षणीय गोष्ट तर अशी आहे की सुरक्षित असण्याचा अर्थ समजून घेतला जावा. म्हणजे हे माहीत करून घेतले जावे की एखादा ईशग्रंथ सुरक्षितपणे टिकून राहण्याचा अर्थ काय आहे? शब्दकोष, सामान्य बुध्दी व वह्यचा उद्देश - या त्या गोष्टी आहेत ज्यांच्याकडून या प्रश्नाचे उत्तर प्राप्त केले पाहिजे. त्यांच्याकडून या प्रश्नाचे जे उत्तर मिळते ते असे आहे.

एखादा ईशग्रंथ सुरक्षितपणे टिकून राहण्याचा अर्थ असा आहे,

**अ)** याचे शब्द अगदी तेच आहेत जे महान अल्लाहकडून अवतरिले गेले होते.

**ब)** या शब्दांत पारस्परिक संबंध व क्रम, तसेच त्यांच्यापासून बनलेल्या वाक्यांचा व उपवाक्यांचा क्रमसुध्दा अगदी तोच आहे जो हा ग्रंथ आणणाऱ्या पैगंबराने महान अल्लाहतर्फे प्रस्तुत केला होता.

**क)** यातील कोणता ही ईशशब्द नष्ट झालेला नाही. असेही नाही की तो अगदीच गायब झाला आहे. असेही नाही की त्याला काढून टाकून त्याच्या जागी एखाद्या अन्य शब्दाची योजना केली असावी किंवा त्याचे एखाद्या अन्य भाषेत भाषांतर केले गेले असेल.

**ड)** यात एखादा शब्द वाढविला गेला नाही, येथपावेतो की तो आणणाऱ्या पैगंबराचा स्वत:चादेखील एखादा शब्द त्यात समाविष्ट झाला नाही.

यापैकी जर एखादी गोष्टसुध्दा नष्ट झाली असेल तर मग त्या ग्रंथाला खऱ्या अर्थाने कदापि सुरक्षित म्हटले जाऊ शकणार नाही. कारण अशा स्थितीत हा विश्वास व समाधान अनिवार्यपणे नाहीसा होतो की या ग्रंथापासून तो अवतरण्याचा हेतु पूर्णपणे समजला जाऊ शकतो. एखाद्या वाक्याच्या शब्दांत कमी-जास्त तर सोडाच. त्यांचा क्रमदेखील बदलला गेला तर, सर्व शब्द तेच राहतील जे मुळात होते, परंतु अर्थ कोठल्या कोठे पोचेल.

# कुरआनच्या सुरक्षेचा अटळ प्रश्न

ज्याप्रमाणे प्रेषितत्वाच्या (पैगंबरीच्या) एखाद्या दावेदाराच्या बाबतीत सर्वांत पहिला प्रश्न असा उत्पन्न होतो की तो आपल्या पैगंबरीच्या दाव्यात खरा आहे किंवा नाही? त्याच्या खरेपणाबद्दल कोणते पुरावे तो देतो? त्याचप्रमाणे एखाद्या खऱ्या पैगंबराच्या नावाने प्रस्तुत केला जाणारा ग्रंथ खरोखर तोच आहे का जो त्याच्यावर अवतरला होता? आणि जर तोच ग्रंथ असेल तर तो पूर्णपणे सुरक्षित आहे किंवा नाही? कारण असे असणे शक्य आहे की एक मनुष्य खऱ्या अर्थाने अल्लाहचा पैगंबर तर आहे परंतु जो ग्रंथ त्याने अल्लाहकडून प्रस्तुत केला होता. तो हरवला असेल आणि आज त्या नावाने एखादे दुसरेच लिखाण प्रस्तुत केले जात असेल. अथवा नावा पुरता तर तोच ग्रंथ असावा जो त्या पैगंबराने आपल्या अनुयायींना दिला होता, परंतु नंतर त्यात कमी-जास्त केले गेले असेल. किंवा त्याच्या शब्द व विषयाच्या क्रमात उलट-फेर झाला असेल अथवा मूळ ग्रंथ तर एखाद्या वेगळ्याच भाषेत अवतरलेला असेल आणि आता एखाद्या अन्य भाषेत त्याचे केवळ भाषांतर अस्तित्वात असेल. स्पष्ट आहे की जर अशा प्रकारची कोणतीही गोष्ट जर घडली असेल तर अशा परिस्थितीत त्या ग्रंथाला सुरक्षित म्हटले जाऊ शकणार नाही. आणि जो ग्रंथ सुरक्षित राहिला नसेल त्याच्याकडून तो उद्देश कदापि पूर्ण होऊ शकत नाही ज्याच्यासाठी एखादा दैवी ग्रंथ अवतरित होतो. त्यानंतर त्याचा तो दर्जाही शिल्लक राहत नाही जो त्या फेरफार अथवा परिवर्तनापूर्वी होता. आणि आता त्याचा 'पालनयोग्य' असण्याचा हक्कसुध्दा त्या सीमेपर्यंत अनिवार्यपणे निर्बळ राहील ज्या सीमेपर्यंत त्यात फेरफार व परिवर्तनाला वाव मिळाला असेल.

म्हणून कोणत्याही दैवी ग्रंथाच्या बाबतीत मानवी बुध्दीने असा प्रश्न व अशी चौकशी केलीच पाहिजे की तो आपल्या मूळ स्थितीत उरला आहे किंवा नाही? विशेषत: पवित्र कुरआनच्या बाबतीत तर हा प्रश्न उठणे आणि या गोष्टीची चौकशी करणे अगदी अटळ आहे. कारण दुसऱ्या दैवी ग्रंथांच्या तुलनेत तो एक वेगळा व विशिष्ट दर्जाचासुध्दा दावेदार आहे. म्हणजे तो सामान्य ग्रंथाप्रमाणेच एक ग्रंथ नाही तर तो असला ग्रंथ आहे की ज्याने सर्व जुन्या ग्रंथांना रद्द केले आहे. ज्याच्यानंतर आता अन्य कोणताही ग्रंथ अवतरणार नाही. जो संपूर्ण जगासाठी अनुसरण करण्यासाठी आहे. जो आता कियामत (अंतिम दिन)पर्यंत महान अल्लाहने मंजूर केलेला एकमेव प्रिय मार्गदर्शन-ग्रंथ आहे. त्याच्या या दाव्यांचा विचार करता त्याच्या सुरक्षेचा प्रश्न केवळ एक सैध्दांतिक व वैज्ञानिक प्रश्न उरत नाही तर मानवी जीवनाचा तो अत्यंत महत्त्वाचा व्यावहारिक प्रश्न ठरतो. त्याचे ऐहिक कल्याण व त्याची परलोकातील मुक्ती त्याच्याशी निगडीत होते आणि त्याच्या या प्रतिष्ठित दर्जाची निकड आहे की जोपर्यंत या पृथ्वी तलावर मनुष्य अस्तित्वात

आहे तोपर्यंत तोदेखील पूर्णपणे सुरक्षित रहावा. नाहीतर मानवाला कोठून मार्गदर्शन मिळेल? म्हणून जर कुरआन आपल्या दाव्यात खरा आहे तर आवश्यक आहे की त्याची दशा तीर्च कदापि होऊ नये जी प्राचीन ग्रंथांची झालेली आहे. तर तो अनिवार्यपणे जसाचा तसा सुरक्षित रहावा. असे म्हटले पाहिजे की त्याचे संरक्षण त्याच्या खरेपणाचा एक आवश्यक पुरावादेखील आहे. या सर्व गोष्टींच्या उपस्थितीत हा प्रश्न न उठण्याचे काही कारण नाही की काय कुरआन पूर्णपणे सुरक्षित आहे? आणि काय हल्ली जो ग्रंथ कुरआनच्या नावाने जगासमोर आहे तो आपली भाषा, आपले शब्द, आपली वाक्ये, आपला क्रम व आपला पाठ, सर्वप्रकारे जसाचा तसा तोच दैवी ग्रंथ आहे जो प्रेषित मुहम्मद (स.) यांनी प्रस्तुत केला होता?

## कुरआनच्या सुरक्षेची व्यावहारिक व्यवस्था

या प्रश्नाचे उत्तर माहीत करून घेण्यापूर्वी हे जाणून घेणे योग्य व आवश्यक होईल की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी कुरआन सुरक्षित व टिकवून ठेवण्याची काय व्यवस्था केली होती? इतिहास व हदीसवरून या व्यवस्थेचा जो तपशील मिळतो तो थोडक्यात असा आहे.

१) पैगंबरांच्या दरबारात नियमितपणे वह्य लिहिणारे नेमलेले होते जे सर्वांत लायक व प्रसिध्द सहाबीपैकी निवडले गेले होते. मक्की युगात (मक्का शहरातील निवासाच्या काळात) अबू बक्र (रजि.), उस्मान गनी (रजि.) आणि अली (रजि.) आणि मदिन्याला आल्यानंतर त्या लोकांव्यतिरिक्त जुबैर इब्नुल अव्वाम (रजि.), उबई इब्ने काब (रजि.), हन्जला इब्नुर्रबीअ (रजि.), जैद इब्ने साबित (रजि.), उबई इब्ने फातिमा (रजि.), अब्दुल्लाह इब्ने अर्क़म (रजि.), शुरहबील इब्ने हस्ना (रजि.), अब्दुल्लाह इब्ने रवाहा, अमीर मुआविया (रजि.), खालिद इब्ने सईद (रजि.) आणि अब्बान इब्ने सईद (रजि.) वगैरे चोवीस आणि काही कथनानुसार बेचाळीस सहाबी या सेवेसाठी नियुक्त केले गेले होते. ज्यांना कुरआनने 'सन्माननीय व पुण्यशील लिहिणारे' म्हटले आहे.

जेव्हा एखादी वह्य येत असे तेव्हा ते ताबडतोब एखाद्या लिहिणाऱ्याला सांगत असत की या आयतीना अमुक सूरहमध्ये अमुक आयतनंतर लिहून घ्या. जसे की तिर्मिजीचे हे कथन वर लिहिले गेले आहे की 'जेव्हा पैगंबरावर एखादी वहय उतरत असे तेव्हा पैगंबर (स.) आपल्या एखाद्या वह्य लिहिणाऱ्याला बोलावून सांगत असत की ही अमुक सूरहमध्ये नोंदवा.' जेव्हा लिहिणारा उतरलेली वह्य लिहून घेत असे तेव्हा ते त्याच्याकडून हे लिहलेले वाचून घेऊन ऐकत असत. जर ती लिहिण्यात एखादी चूक आढळली तर ते त्यात दुरूस्ती करवीत जसे,

*'जेव्हा माझे लिहून पूर्ण होत असे तेव्हां प्रेषित फर्मावित वाचा. मी ते वाचून ऐकवित असे जर त्यात काही उणीव असली तर ते ती दुरुस्त करवीत असत.'*

(मजमउज्जवाइद - भाग १ - पृष्ठ ६०)

त्यानंतर ती प्रसारित करण्याची आज्ञा दिली जात असे. वह्य लिहिणारा लिहिल्यानंतर बाहेर येत असे आणि आम मुस्लिमांना हा उतरलेला नवीन भाग वाचून ऐकवीत असे, आणि ज्यांना लिहिता येत असे ते स्वत:देखील लिहून घेत असत. बाकीचे लोक केवळ तोंडपाठ करण्यास पुरेसे समजत असत. अशा प्रकारे एकीकडे तर कुरआनचे लेखन सरकारी देखरेखीत होत असे, दुसरीकडे बरेचसे सहाबी (रजि.) स्वत:देखील लिहून घेत असत. मुअज इब्ने जबल, उबई इब्ने काब, जैद इब्ने साबित (रजि.) आणि अबू जैद (रजि.) वगैरेनी तर संपूर्ण कुरआन क्रमान्वित व संकलित स्वरूपात लिहून घेतला होता.

*(बुखारी शरीफ - फजाइलुल कुरआन)*

लिहिण्यासाठी तलम कातडे, कमविलेले पातळ चामडे, खजुराच्या फांद्यांचा खालील भाग पांढऱ्या दगडाच्या पातळ पाट्या व उंटाच्या खांद्याची रूंद हाडे वगैरे वस्तु वापरली जात असत.

**२)** या शंकेने की एखादे वेळी प्रेषित मुहम्मद (स.) यांची वचने, जी कोणत्याही स्थितीत धर्माशी संबंधितच असत, अल्लाहच्या वाणीत मिसळली जाऊ नयेत म्हणून त्यांनी आपल्या सहाबींना (पैगंबरांचे सोबती) आज्ञा दिली होती,

*'कुरआनशिवाय आणखी जे काही तुम्ही माझ्या तोंडून ऐकत असता, ते लिहित जाऊ नका.'* सुनन दारमी - पृष्ठ ४६

**३)** एकीकडे तर तो प्रत्येक शब्द जो महान अल्लाहकडून उतरत असे तो लवकरात लवकर लिहून घेतला जाई. दुसरीकडे प्रेषित मुहम्मद (स.) तो स्वत:तर तोंडपाठ करीत असत त्याचबरोबर आपल्या सोबत्या (म्हणजे सहाबी)कडूनदेखील पाठ करवून घेत असत. आणि मग त्यांच्याकडून वरचेवर पठन करवून ऐकत राहत असत आणि स्वत:देखील पठन करून त्यांना ऐकवीत असत जेणेकरून एखादा शब्द चुकीचा पाठ केला जाऊ नये. जे सहाबी वेळेवर हजर नसत त्यांनानंतर शिकविले जात असे आणि पाठ करवून घेतले जात असे. याशिवाय सामूहिक रीतीनेसुध्दा कुरआन पठन करण्याची व ऐकण्याची विशेष व्यवस्था होती. मक्केत अरक़म मख्जूमी (रजि.) यांच्या घराला पैगंबरांनी तिलावत ख़ाना (पठन गृह) ठरविले होते. तेथेच मुस्लिमा समवेत ते जात असत आणि कुरआनचे पठन केले जात असे. (हे ऐतिहासिक व भाग्यशाली घर अद्याप मक्केत आहे.) जेव्हा मदीनेला आगमन झाले तेव्हा येथे कुरआन पठन करणारे व शिकविणाऱ्या लोकांचा

एक खास समूह बनला जो इस्लामी इतिहासात 'असहाबे सुफ्फा' म्हणून प्रसिध्द आहे. हे ते गरीब लोक होते जे मक्केत आपले सर्वस्व सोडून आले होते आणि येथे त्यांचे स्वत:चे कोणतेही निवास स्थान नव्हते. मसजिदे नबवीच्या 'सुफ्फा' (चबुतरा) वर राहत असत त्यांची संख्या लक्षणीय होती. सामान्यपणे जवळपास ८० लोक होते. या लोकांनी आपले संपूर्ण जीवन धर्माच्या सेवेसाठी अर्पण केले होते. एकीकडे तर त्यांचे काम असे होते की जेव्हा मदीना शहरा बाहेरील एखादी टोळी इस्लामचा स्वीकार करीत असे तेव्हा हे लोक त्यांना कुरआन शिकविण्यास जात असत. दुसरीकडे या सेवेवर नेमलेले होते की जेव्हा एखादी वह्य येत असे तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) ती त्यांच्याकडून पाठ करवून घेत असत. चांगल्या प्रकारे पाठ केल्यानंतर ते मदिन्याच्या गल्ली-बोळातून पसरत व दुसऱ्यांना ऐकवून लोकांना कंठस्थ करवीत असत. या सर्व व्यवस्थेचा परिणाम स्वाभाविकपणे असा झाला की स्वत: प्रेषित मुहम्मद (स.) संपूर्ण कुरआनचे हाफीज़ होत गेले. हे ते लोक होते की ज्यांना दुसऱ्या सहाबींच्या तुलनेत पैगंबरांचे सान्निध्य अधिक लाभले होते. बाकीच्या सहाबींचा संबंध आहे त्यांच्यातील प्रत्येकजण कुरआनचा थोडा बहुत भाग अवश्य पाठ करीत असे आणि स्मरणात ठेवीत असे. कोणताही मनुष्य असा नव्हता की ज्याने काहीही पाठ केले नसेल, कारण असे शक्यच नव्हते. इस्लाम व ईमानबरोबर ही गोष्ट कोणत्याही प्रकारे जोडली जाऊ शकत नाही की एखाद्या मनुष्याला कुरआन अगदीच पाठ नसावे.

या बाबतीत ही गोष्ट विशेषत: लक्षात ठेवण्याची आहे की स्मरण-शक्तीच्या बाबतीत अरबस्थानातील लोकांशी कोणीही स्पर्धा करू शकत नव्हता. त्यांच्या प्रचंड स्मरणशक्तीच्या गोष्टी इतक्या आश्चर्यकारक आहेत की आज जेव्हा आम्ही त्या वाचतो तेव्हा त्या कथा वाटतात. लांब-लचक कसीदे (एखाद्याची प्रशंचा असलेले काव्य) काही वेळा ऐकल्यावर त्यांचे तोंडपाठ होत असे. आपल्या घोड्यांची व उटांची वंशावळी स्मरणात ठेवणे त्यांच्यासाठी सामान्य गोष्ट होती. खरे तर ही गोष्टसुध्दा महान अल्लाहच्या परोक्ष व्यवस्थेची एक कडी होती की त्याने कुरआनच्या सुरक्षेसाठी अशा जातीची निवड केली ज्याच्या स्मरणशक्तीचे उदाहरण जगात कोठेही नव्हते.

## कुरआन सुरक्षित असल्याचे पुरावे

ही प्राथमिक माहिती प्राप्त केल्यानंतर आता हे पाहू की वर्तमान कुरआन अगदी तसाच तोच कुरआन आहे का की जो प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरला होता आणि ज्याला त्यांनी उम्मतच्या (अनुयायी मुस्लिम) हवाली केले होते?

या उद्देशासाठी जर आपण या प्रश्नाशी संबंध असणाऱ्या बाबी व वास्तविकतावर

दृष्टी टाकली तर आढळेल की त्या दोन प्रकारच्या आहेत. एक तर त्या ज्या बुध्दि-संगत प्रमाण म्हणून आहेत आणि ज्या मुस्लिम व मुस्लिमेतरासाठी कुरआनच्या सुरक्षेचे पुरावे बनू शकतात. दुसऱ्या त्या ज्या खुद्द कुरआनच्या कथनावरून घेतल्या गेल्या आहेत, म्हणून त्या केवळ मुस्लिमासाठीच 'हुज्जत' (युक्तिवाद) ठरू शकतात.

## अ) बुध्दिसंगत प्रमाण

प्रथम बुध्दिसंगत प्रमाण घेऊ या आणि हे पाहू की विशुध्द ज्ञानात्मक, ऐतिहासिक व तार्किक शोधांच्या प्रकाशात कुरआन सुरक्षित सिध्द होतो किंवा नाही?

स्पष्ट आहे की कोणतेही मार्गदर्शन, कोणताही कायदा अथवा कोणताही ग्रंथ सुरक्षित ठेवण्याच्या दोन पध्दती असतात. १) हिफ़्ज् (तोंडपाठ करणे) आणि २) किताबत (लिहून घेणे) म्हणून पवित्र कुरआनच्या सुरक्षेची स्थिती जाणून घेणे म्हणजे हे पाहणे की तो समाधानकारकरीत्या पाठ केला गेला आहे किंवा नाही? आणि जर असे नसेल तर काय तो पूर्ण काळजीपूर्वक लिहिला गेला आहे? शिवाय हा तोंडपाठ करण्याचा अथवा लिहित राहण्याचा क्रम अद्याप पूर्णत: व्यवस्थितपणे चालू आहे का?

**१)** पवित्र कुरआनच्या बाबतीत जेथपावेतो सुरक्षेच्या पहिल्या पध्दतीचा संबंध आहे, त्याच्या बाबतीत खरी परिस्थिती समजून घेण्यासाठी इतिहासाच्या या वास्तविकतेवर दृष्टी टाकू या.

**अ)** जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांचे निधन झाले तेव्हा त्यांचे अनुयायी व त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांची एक मोठी संख्या उपस्थित होती जी हजारोंच्या पुढे जाऊन लाखापर्यंत पोचली होती.

**ब)** पवित्र कुरआन वाचणे शिकविणे व पाठ ठेवण्याच्या बाबतीत त्यांनी त्यांच्या त्या अनुयायींना निरंतर प्रेरणा व उपदेश दिले होते, ज्यांच्या उल्लेखाने हदीसचे ग्रंथ भरलेले आहेत. उदाहरणार्थ, 'कुरआनचे पठन करा, कारण कियामतच्या (अंतिम दिन) दिवशी तो पठन करणाऱ्यासाठी शिफारस करणारा म्हणून येईल.' (मुस्लिम शरीफ - फजाइलुलकुरआन) 'तुमच्यापैकी सर्वांत चांगला तो आहे जो कुरआन शिकतो व शिकवितो.' (बुखारी शरीफ - फजाइलुल कुरआन) 'कुरआनची आठवण ताजी करीत रहा.' (बुखारी) अशाच प्रकारे खुद्द कुरआन मध्येसुध्दा अशा प्रकारची प्रेरणा व उपदेश विपुल प्रमाणात आहेत.

दुसरीकडे त्या लोकांसमोर कुरआनने दिलेल्या त्या शिक्षेच्या धमक्या आणि विनाशांच्या त्या घटना होत्या. त्यांत सांगितले होते की कशा प्रकारे यहूदी (ज्यू) व नसारा

(ख्रिश्चन) आपल्या ग्रंथात फेरबदल केल्यामुळे आणि त्याचे काही भाग विसरून गेल्यामुळे शिक्षेस पात्र ठरले होते. जणू त्या जनसमूहाची गफलत व बेपर्वाईच्या स्थिती व परिणामाचे वर्णन करून खुद्द त्यांनादेखील खबरदार केले गेले होते की जर तुम्ही कुरआनचा एखादा भाग विसरून गेला अथवा त्याच्या शब्दांत व वाक्यात कोणत्याही प्रकारचा बदल येऊ दिला तर महान अल्लाहच्या न्यायाचा नियम तुम्हालादेखील तीच वागणूक देईल, जी त्या ज्यू व ख्रिश्चनाना दिली आहे. आणि अजून पुष्कळ काही कियामतच्या दिवशी देणार आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनीसुध्दा त्यांना अशा प्रकारच्या भयभीत करणाऱ्या धमक्या देऊन ठेवल्या आहेत. जो कोणी कुरआन वाचतो आणि मग विसरून जातो तो कियामतच्या दिवशी महारोगी बनून उठेल. *(अबू दाऊद)*

**क)** प्रेषितत्वाच्या काळात ऐहिक व धार्मिक दोन्ही प्रकारची प्रतिष्ठा, श्रेष्ठता व सफलतेचे खरे मापदंड कुरआनचे ज्ञान होते. ज्याला पवित्र कुरआनचे जितके अधिक ज्ञान असे त्याचा दर्जा तितकाच उच्च ठरत असे. प्रबंधविषयक गरजांप्रसंगी लहानात लहान बाबीपासून मोठ्यात मोठ्या बाबीतसुध्दा मार्गदर्शनासाठी सर्वप्रथम हे पाहिले जाई की कोणाला कुरआनचे अधिक ज्ञान आहे? कारण कुरआनच राज्य व समाजाचा मौलिक कायदा होता. म्हणून स्वाभाविकपणे कोणत्याही पदासाठी निवड करताना हे पाहणे आवश्यक होते की या कायद्यातील कोण अधिक तज्ञ आहे. अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी एका मोहिमेसाठी सैन्याची एक मोठी तुकडी तयार केली आणि तिचा कमांडर म्हणून एका अशा इसमास नियुक्त केले जो वयाने सर्वांत लहान होता. या निवडीचे कारण असे होते की चौकशी अंती तो सर्वांत अधिक कुरआन पाठ करणारा सिध्द झाला होता. *(तिर्मिजी)*

जेथपावेतो फक्त धार्मिक श्रेष्ठत्वाचा संबंध आहे त्याचा अंदाज लावण्यासाठी केवळ एका घटनेचा उल्लेख पुरेसा ठरेल. उहुदच्या हुतात्म्यांना जेव्हा त्यांची संख्या अधिक असल्यामुळे एका एका कबरीत दोन-दोनच्या संख्येत दफन (पुरणे) केले जाऊ लागले तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी चौकशी करण्यास सुरवात केली.

'यांच्यापैकी कोणाला कुरआनचे ज्ञान अधिक होते? आणि जेव्हा सांगितले जाई तेव्हा अशा इसमाला कबरीत काब्याकडे पुढे ठेवले जाई.'

*(बुखारी शरीफ - किताबुल जनाइज)*

***ड)** प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सहाबींची धर्मविषयक आवड व प्रेम वेडेपणाच्या सीमेला पोचले होते. त्यांच्या मनात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याबद्दल असाधारण आसक्ती व आपल्या ग्रंथाबद्दल आवड होती. पवित्र कुरआनचे पठन त्यांचा प्रियतम छंद व त्यांच्या*

*आत्म्याचे अत्यंत आवडीचे अन्न होते. त्यांच्यात कोणीही असा नव्हता की जो एखाद्या दिवशीदेखील कुरआन पठनाच्या लाभापासून वंचित राहिला असेल. कित्येक तर असे होते की ज्यांना दररोज संपूर्ण कुरआन पठन केल्यावरच शांती मिळत असे. उदाहरणार्थ, उस्मान (रजि.) अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) आणि तमीम दारी (रजि.) यांच्या जीवन-कथा वाचा. प्रेषितत्व कालाच्या इतिहासात आम्हाला एखादीसुध्दा अशी घटना आढळत नाही की ज्यावरून हे कळावे की पैगंबरांनी एखाद्या सहाबीला कुरआनचे पठन कमी केल्याबद्दल धमकावले असावे. तर असले प्रसंग मोठ्या संख्येने आढळतात की ज्यात त्यांनी लोकांना कुरआन पठनात समतोलपणा राखण्याचा आदेश दिल्याचे दिसते. उदाहरणार्थ, अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या बाबतीत जेव्हा त्यांना कळले की ते प्रत्येक रात्री पूर्ण कुरआनचे पठन करतात तेव्हा त्यांनी मनाई केली आणि आदेश दिला, 'कुरआन एक महिन्यात पूर्ण करीत जा.' ते म्हणाले, 'मी याच्यापेक्षा अधिक पठनाचे सामर्थ्य बाळगतो.' प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले,' तर मग सात रात्रीत पूर्ण करीत जा. याच्यापेक्षा अधिक पठन करू नका.'* (बुखारी शरीफ - भाग फजाइलुल कुरआन)

*अशाच प्रकारे क़ैस बिन सासआ यांनी विचारणा केली, 'कुरआन किती दिवसांत पूर्ण करीत जाऊ?' तेव्हा फर्माविले, 'पंधरा दिवसांत' ते म्हणाले, 'हुजूर मी यापेक्षा कमी मुदतीत सहजपणे पठन करू शकतो.' तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले 'बरे तर सप्ताहात पूर्ण करीत जा.' पुन्हां विनंती केली की 'याच्यापेक्षाही कमी अवधीत मी वाचू शकतो.' तेव्हा आदेश झाला, 'बस्स यापेक्षा कमी वेळेत नाही.'* (कंजुल उम्माल)

**प)** पूर्ण कुरआन तेवीस वर्षांच्या दीर्घ मुदतीत थोडा-थोडा उतरला होता. याचा अर्थ असा आहे की पैगंबरांच्या सहाबींना (सोबत्यांना) कुरआन कंठस्थ करण्यास कित्येक वर्षांचा अवधी मिळाला होता. तसे पाहिले तर पूर्ण कुरआन पाठ करण्यासाठी दोन-अडीच वर्षे पुरेसे आहेत, जसे की हजारो-लाखो अनुभव व घटना ग्वाही देऊ शकतात.

**फ)** 'लाइफ ऑफ मुहम्मद'चे लेखक प्राच्यविद्या विशारद सर विलियम म्यूर यांच्या शब्दांत असे प्रमाणपत्र आहे, 'सहाबींची स्मरणशक्ती अत्यंत उच्चकोटीची होती.' त्याला कारण असे की हे महान लोक त्या अरब जातीचे होते की ज्यांचे या गुणात कोणीही हात धरू शकत नव्हते.

या सर्व गोष्टींना ज्या इतिहासाच्या अत्यंत स्पष्ट आणि ज्यांचा इन्कार करणे शक्य नाही अशा वास्तविकता दृष्टीसमोर ठेवा. मग विचार करा की त्यांचा परिणाम अनुभव व बौध्दिकदृष्ट्या काय असू शकतो? काय याच्याशिवाय अन्य काही की पैगंबरांचे लक्षावधी सोबत्यांमध्ये असा तर कोणीही नव्हता ज्याला कुरआन थोडा बहुतदेखील पाठ नसावा

आणि असे अगणित होते ज्यांना कुरआन एक-एक शब्द करून पूर्ण पाठ असावा? याउलट काही घडणे शक्यही नव्हते कारण अशा प्रबळ मानस शास्त्रीय प्रेरणा व नैसर्गिक कारणे असता ही गोष्ट व्यावहारिक रूपाने संभवच होऊ शकत नव्हती. म्हणून अशी पूर्ण स्थिती पाहून बुध्दी कोणत्याही भयाविना असा निर्णय देऊ शकते की सहाबीमध्ये संपूर्ण कुरआनच्या हाफीज (तोंडपाठ करणारे) लोकांची एक मोठी संख्या निश्चितपणे असेल. इतिहासाची ग्वाही अशी आहे की निःसंशय होती. जेव्हा मदीनाच्या बाहेरची एखादी टोळी इस्लाम धर्म स्वीकारीत असे तेव्हा त्यांना कुरआनचे शिक्षण देण्यासाठी मुहम्मद (स.) कुरआनच्या हाफीज सहाबींना पाठवीत असत आणि कधी-कधी त्यांची संख्या फार वाढलेली असे. अबुल बरा नामक गृहस्थ नज्दहून मदिन्यास आला आणि आपल्या भागातील लोकांना कुरआन शिकविण्यासाठी पैगंबरांच्याकडे शिक्षक पाठविण्याची विनंती केली तेव्हा पैगंबरांनी या कार्यासाठी ज्या हाफीज लोकांची नियुक्ती केली त्यांची संख्या सत्तर (७०) होती - (ज़ादुलमआद) विचार करा की जर एका-एका भागात पाठविल्या जाणाऱ्या हाफीज लोकांची संख्या सत्तर-सत्तर असे तर एकूण हाफीज लोक किती मोठ्या संख्येत असतील. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनानंतर एका वर्षाने यमामा मुक्कामी जे रक्तरंजित युध्द झाले होते त्यात बाराशे अथवा चौदाशे मुस्लिम हुताम्या ठरले होते. त्या हुतात्म्यांत सातशे कुरआनचे हाफीज होते - *(मजमउज्जवाइद)*

सहाबींच्या काळात कुरआनच्या हाफीजांचे हे बाहुल्य नंतरच्या मुस्लिमात न केवळ टिकून राहिले तर मुस्लिमांची संख्या वाढत राहण्याबरोबरच हाफीजांची संख्यादेखील वाढत गेली. मग कोणताही काळ असा आला नाही की जेव्हा उम्मतमध्ये असंख्य हाफीज नसावेत. इस्लामी इतिहासाची ही एक अशी सर्वमान्य वास्तविकता आहे ज्याच्यासंबंधी कोणतीही शंका आणि संकोचाला वाव राहू शकत नाही. आजदेखील की जेव्हा सामान्य मुस्लिमाच्या धार्मिक रुचि -हासाच्या चरम बिंदुला पोचली आहे आणि ती त्या काळाच्या तुलनेत दहावा-विसावा भागदेखील राहिली नाही, तेव्हा आपल्याला कोणतीही असली वस्ती आढळणार नाही की ज्यात एक-दोन कुरआनचे हाफीज नसतील.

**२)** आता सुरक्षेचा मार्ग म्हणजे लेखनाव्दारे सुरक्षेला घ्या आणि या बाबतीत प्रथम खालील वास्तविकता वर दृष्टी टाका.

**अ)** ज्या काळात कुरआन अवतरला आहे तेव्हा तर असे अवश्य होते की अरबस्थानात लिहिण्याचा रिवाज सीमित आणि त्याच्या सुविधा अप्राप्य होत्या. परंतु असे कदापि नव्हते की लिहिणे वाचणे अजिबात नव्हते. अरबस्थानच्या इतिहासाचा अभ्यास केल्यास या गोष्टीचे पक्के पुरावे मिळतील आणि पुष्कळ मिळतील की अरबस्थानात विशेषतः मक्केत लिहिण्या-वाचण्याची प्रथा अस्तित्वात होती. तेथील लोक करार लिहून दस्तऐवज म्हणून

सांभाळीत असत आणि कविता-कसीदे (प्रशंसा गीत) लिहून ठेवीत, उदाहरणार्थ, मक्केतील कुरैशच्या संपूर्ण भाऊकीने प्रेषित मुहम्मद (स.) त्यांचे कुळ बनी हाशम व मुस्लिमांविरुध्द बहिष्काराचा जो तह केला होता त्याला लेखी स्वरूप देऊन काबागृहाच्या आत अडकविला होता. *(इब्ने हिशाम - भाग १)*

'त्याचप्रमाणे अरबी भाषेतील प्रसिध्द कसीदे 'अल मुअल्लकातुस्सबअ' ज्यांचा परिचय प्रत्येक अरबी भाषा जाणणाऱ्याला आहे. त्यांना 'मुअल्लकात' म्हटले जाण्याचे कारण असे आहे की ते लिहून काबाच्या दारावर अडकविले गेले होते.'

*(तारीखुल अदबुल अरबिय्य - ३१)*

'बदरच्या लढाईत कुरैशचे जे सत्तर लोक कैद केले गेले होते त्यांच्यातून कित्येक लोकांच्या मुक्ततेसाठी फिदया (कैद्याला सोडविण्यासाठी दिले जाणारे द्रव्य) या गोष्टीला ठरविले गेले की एक-एक इसमाने दहा-दहा मुलांना चांगले लिहिणे व वाचणे शिकवावे.'

*(तबकाते इब्ने सअद)*

ही व अशा प्रकारच्या अनेक घटना या वस्तुस्थितीचा स्पष्ट पुरावा आहेत की मक्का शहरात लिहिण्या-वाचण्याची फार पध्दत होती. त्या काळातील अरबी साहित्याचे अवलोकन केल्यास असे आढळले की त्यात लेखन व त्याच्याशी संबंधित अनेक बाबींचा खूप उल्लेख मिळेल. खुद्द कुरआनमध्ये लेखणी, शाई, पुस्तक, लेखन, लिहिणारा, इमला (बोलून लिहविणे), इक्तिताब (लिहून घेणे), सुतूर (लिहिलेला), सफरह (लिहिणारे), सहीफा (लिहिलेली पृष्ठे), लौह (पाटी), रक्क (तलम कातड्याचे कागद) आणि किरतास (कागद) वगैरे शब्द असणे या गोष्टीचा उघड पुरावा आहे की कुरआनच्या अवतरणकाळात अरब लोक लिहिण्या-वाचण्याच्या कलेने चांगले परिचित होते.

**ब)** पवित्र कुरआनने लिहिण्याच्या ज्ञानाला महान अल्लाहची एक मोठी देणगी व असामान्य भेट म्हटले आहे. ज्याची कल्पना यावरून येते की त्याने आपल्या सर्वप्रथम वह्यमध्ये, जी केवळ पाच-सहा लहान लहान आयतीपर्यंत सीमित होती अल्लाहच्या ज्या उघड व मोठ्या देणग्यांचे नाव घेतले आहे त्यांच्यापैकी एक 'लेखणीने शिकविण्याची' देणगीसुध्दा आहे.

*'लेखणीने शिकविले, शिकविले मानवाला ते काही जे तो जाणत नव्हता.'*

(सूरह अलक)

**क)** जेथपर्यंत कार्याच्या महत्त्वाच्या बाबीचा संबंध आहे कुरआनने त्यापैकी कांहीच्या बाबतीत या गोष्टीवर मोठा भर दिलेला आहे की त्यांना लिहून घेतले जावे. उदाहरणार्थ,

*'जेव्हा तुम्ही एखाद्या ठराविक मुदतीसाठी आपसात कर्जाचा व्यवहार कराल तो*

*लिहून घेत जा आणि तुमच्या दरम्यानच्या एखाद्या लिहिणाऱ्याने न्यायाने (संबंधित दस्तऐवज) लिहून द्यावे. लिहिणाऱ्याने जसे की अल्लाहने त्याला ज्ञान प्रदान केले आहे, इन्कार करू नये त्याने लिहून द्यावे. बाब मग लहान असो की मोठी, मुदतीच्या स्पष्टीकरणासह ते लिहून घेण्यास ओझे वाटू देऊ नका.'* (सुरतुलबकरह - २८२)

या तिन्ही वास्तविकतांची उपस्थिती कुरआनच्या क्रमवार व संपूर्ण लिखाणाला प्रमाणानुसार ज्याप्रकारे आवश्यक ठरविते त्याचे स्पष्टीकरण अगदीच अनावश्यक ठरेल. जेव्हा सर्व सहाबींना लिहिण्या-वाचण्याची कला अवगत नव्हती, पहिल्या दिवसापासूनच कुरआनने या कलेला अल्लाहची एक मोठी देणगी व ज्ञान प्राप्तीचे साधन म्हटले होते, व्यवहाराच्या बाबींनासुध्दा लेखी-टाकीत आणण्याचे आदेश दिले गेले होते तेव्हा मानवी बुध्दी कसे स्वीकार करील की प्रेषित मुहम्मद (स.) व त्यांच्या धर्म व ईमानसाठी सर्वस्वाचा त्याग करणाऱ्या सोबत्यांनी कुरआनला लिपीबध्द करण्याकडे लक्ष दिले नसेल! खरे तर त्यांच्याजवळ हा कुरआन सर्वांत महत्त्वाची व मौल्यवान वस्तु होती आणि मानवजातीच्या ऐहिक व परलोकीय कल्याणाच्या सर्वच्या सर्व गोष्टी यावरच अवलंबून होत्या. या वास्तविकतेपासून तेसुध्दा बेसावध नव्हते की लिहून घेणेच एखाद्या वाणीला सुरक्षित ठेवण्याचे खरे व सर्वांत अधिक समाधानकारक साधन आहे. बुध्दी आणि विवेकाची ही निकड समोर आल्यानंतर आता इतिहासाच्या घटनांच्या कडे वळू या.

**अ)** जितका-जितका कुरआन अवतरत होता, तितका प्रेषित मुहम्मद (स.) लिहवून घेत असत. यासाठी वह्य लिहिणारे ठरविले गेले होते. जेव्हा एखादी वह्य अवतरत असे तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) लिहिणाऱ्याला बोलावीत आणि म्हणत असत, 'हे लिहून घ्या.' (तिर्मिजी - किताबुत्तफसीर) प्रमुख लेखक ज़ैद इब्ने साबित (रजि.) ज्यादा तपशील देताना म्हणतात, 'जेव्हा पैगंबरांच्या आज्ञेप्रमाणे माझे लिहून पूर्ण होई तेव्हा ते वाचून घेऊन ऐकत असत आणि जर लिहिण्यात त्यांना एखादी उणीव आढळत असे ते ती दुरुस्त करवीत असत.' *(मजमउज्जवाइद - भाग १ - पृष्ठ ६०)*

**ब)** कुरआनमध्ये खुद्द काफिर कुरैश यांचे असे कथन आहे की तो निरंतर लिहिला जात असे.

'आणि हे लोक म्हणतात की हा कुरआन तर पूर्वीच्या ग्रंथांच्या नक्कली आहेत ज्यांना या इसमाने लिहून घेतले आहे आणि सकाळी व संध्याकाळी (काही लोकाकडून) बोलून ते लिहविले जात आहे.' *(सुरतुलफ़ुर्कान)*

**क)** प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सहाबींना असा आदेश दिला होता की 'माझ्या तोंडून (ऐकून) कुरआनव्यतिरिक्त आणखी काही लिहित जाऊ नका.' *(दारमी)*

**ड)** हिजरत (मक्का सोडून मदीनेला जाणे) च्या पुष्कळ दिवसांपूर्वीची घटना आहे की जेव्हा उमर (रजि.) ज्यांनी अद्याप इस्लामचा स्वीकार केला नव्हता. आपल्या बहिणीच्या घरी गेले तेव्हा खब्बाब (रजि.) त्यांना व त्यांचे पती सईद बिन जैद (रजि.) यांना सूरह ताऽहाऽ शिकवीत होते. उमर (रजि.) यांच्या आगमनाची चाहूल लागताच खब्बाब (रजि.) बाजूला झाले. तो सहीफा (लिहिलेला भाग) ज्यावरून खब्बाब (रजि.) त्या दोघांना सूरह ताऽहाऽ शिकवीत होते, उमर (रजि.) यांच्या बहिणीने आपल्या मांडीखाली लपविला. तेव्हा उमर (रजि.) यांनी बहिणीस सांगितले, 'मला तो सहीफा दाखवा जो मी आता तुम्हाला वाचतांना ऐकले आहे.' तेव्हा त्यांनी उत्तर दिले, 'त्याला केवळ शुचिर्भूत असलेल्या स्थितीतच स्पर्श केले जाऊ शकते.' हे ऐकून उमर (रजि.) यांनी आंघोळ केली तेव्हा त्यांनी त्यांच्या हातात तो सहीफा दिला आणि उमर (रजि.) यांनी तो वाचला.

*(सीरत इब्ने हिशाम भाग -१ पृष्ठ ३६७)*

**इ)** पैगंबरांच्या सहाबींचे कथन आहे की आम्ही पैगंबराजवळ बसून कुरआनची नक्कल (प्रत) करीत असू. अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) म्हणतात, 'त्या काळात आम्ही पैगंबरांच्या सभोवती वर्तुळ करून (कुरआन) लिहित होतो.' *(दारमी - पृष्ठ ४९)*

अली (रजि.) यांनी एकदा एका प्रश्नाच्या उत्तरात या गोष्टीचे स्पष्टीकरण केले की 'आमच्या जवळ अल्लाहच्या ग्रंथाचे' आणि जे काही त्या सहीफामध्ये आहे, त्याच्याशिवाय अन्य काहीही लिहिलेले नाही. *(बुखारी शरीफ)*

ज़ैद बिन साबित (रजि.) यांचे कथन आहे की आम्ही पैगंबरांच्या सेवेत बसून (कातडे वगैरेच्या) विभिन्न तुकड्यावरून (पैगंबरांच्या आज्ञेनुसार) कुरआन लिहीत असू. *(बुखारी - फजाइलुल कुरआन)*

या सर्व घटना व वास्तविकता या गोष्टीचे स्पष्ट पुरावे आहेत की कुरआन लिहिण्याची दुहेरी व्यवस्था होती. एक सरकारकडून व दुसरी आम लोकांकडून एकीकडे तर पैगंबरांच्या स्वत:च्या व्यवस्थेत तो पूर्णत: काळजीपूर्वक लिहिला जात होता. दुसरीकडे आम मुस्लिमांना याचे प्रोत्साहन व आदेश होता की त्यांच्यापैकी ज्यांना लिहावयास येते त्यांनी आपण स्वत:देखील तो लिहीत व नक्कल करीत राहावे आणि या आदेशाची पुरेपूर अंमलबजावणी होत होती. जेव्हा मक्केतसुध्दा जेथे मुस्लिम अत्यंत त्रासदायक व निर्धनतेच्या स्थितीत आणि फार थोड्या संख्येत होते, लोक कुरआन लिहीत असत (जसे की उमर (रजि.) यांच्यावर उल्लेखित घटने वरून कळते) तेव्हा मदीनेतील काळासंबंधी काही सांगण्याची गरज उरत नाही) की जेथे मुस्लिम आपली संख्या आपली लक्षणीय जमाअत व आपल्या साधनांच्या दृष्टीने प्रगती करून कोठल्या कोठे पोचले होते. आता आपण

ऐकले की प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सभोवती लोक वर्तुळ करून करून बसत असत आणि आपल्यासाठी प्रती बनवीत असत. अशा तऱ्हेने कित्येक सहाबींनी पैगंबरांच्या जीवनकाळातच पूर्ण कुरआन अंतिम क्रमानुसार लिहून घेतले होते. अबुद्दर्दा (रजि.), मआज़ बिनजबल (रजि.), ज़ैद बिन साबित (रजि.) आणि अबू जैद (रजि.) यांच्या बाबतीत तर अनस (रजि.) यांनी विस्ताराने सांगितले आहे की या सज्जनांनी पैगंबरांच्या काळातच पूर्ण कुरआन जमा केला होता. *(बुखारी शरीफ - फजाइलुल कुरआन)*

असे एकूण किती सहाबी राहिले असतील ज्यांना हे भाग्य लाभले असेल? याची कल्पना केवळ या गोष्टीवरून करा की प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनानंतर एका वर्षानेच यमामाचे जे युध्द झाले होते त्यात पवित्र कुरआन जमा करणारे सत्तर लोक हुतात्मा झाले होते. *(मिर्कात - बुखारीची तळटीप)*

तात्पर्य असे की यात अजिबात शंका नाही की पैगंबरांच्या काळातच पूर्ण कुरआन लिहिला गेला होता आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनाच्या वेळी त्याच्या प्रती मोठ्या संख्येत पसरल्या होत्या. असे कदापि नव्हते की मुस्लिम समाजात कधी लिहिलेल्या कुरआनच्या प्रती नव्हत्या. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या जीवनकाळातील अंतिम हजप्रसंगी प्रवचनात (खुतबा) असा उपदेश केला की 'लोक हो! तो काळ येण्यापूर्वी की जेव्हा ज्ञान (कुरआनचे) उचलले जाईल (म्हणजे नाहीसे केले जाईल) ते ग्रहण करा.' तेव्हा एका खेडुताने विचारणा केली, 'ज्ञान कसे उचलले जाईल की जेव्हा वस्तुस्थिती अशी आहे की 'मसाहिफ' (लिहिलेले कुरआन) आमच्या दरम्यान अस्तित्वात आहेत?'

*(मुस्नद अहमद भाग - ५ पृष्ठ २६६)*

हा या गोष्टीचा स्पष्ट पुरावा आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या जीवनकाळातच सामान्यत: कुरआनच्या प्रती तयार झाल्या होत्या आणि खेडूत अरब लोकापर्यंत पोचल्या होत्या. शेवटी आणखी एका वास्तविकतेवर दृष्टी टाकू या.

पवित्र कुरआनने जागोजागी स्वत:ला 'ग्रंथ' म्हटले आहे. उदाहरणार्थ, 'हा ईशग्रंथ आहे, यात कोणतीही शंका नाही.' अशाच प्रकारे 'सुहुफ' (एकवचन सहीफा) सुध्दा म्हटले गेले आहे, जसे, 'अल्लाहकडून आलेला एक प्रेषित जो पवित्र सहीफाचे पठन करतो.' *(सूरह बय्यिनाह)*

याशिवाय त्याने आपल्यासंबंधी असेही म्हटले आहे,

*'याला केवळ शुचिर्भूत लोकच स्पर्श करतात (किंवा करू शकतात)'*

(सूरह वाकिआह)

*'तो श्रेष्ठ व पुण्यशील लिहिणाऱ्यांच्या हातात आहे.'* (सूरह - अबस)

ही कथने या गोष्टीच्या स्पष्ट घोषणा आहेत की खुद्द कुरआनने आपले स्वरूप एका अशा मार्गदर्शन-पत्राचे असल्याचे म्हटले आहे जो मूलत: लिखित स्वरूपाचा आहे. ज्याचे बाह्य अस्तित्व असण्याबरोबरच तो लिखित असल्याची कल्पनादेखील अनिवार्य आहे. यावरून असे कळाले की प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांचे सहाबी (रजि.) यांनी कुरआन लिहिण्याची जी व्यवस्था केली होती तो केवळ धार्मिक आवडीचा परिणाम नव्हता तर या गोष्टीचादेखील परिणाम होता की कुरआनच्या संपूर्ण दर्जाने त्यांच्याकडे या कार्याबद्दल तगादा लावला होता. तो पूर्णपणे अस्तित्वात असल्याचे सिध्द झाले नसते जर त्याला लेखी स्वरूप दिले गेले नसते.

कुरआनच्या लेखनासंबंधी हे सर्व तपशील आपल्या समोर आहेत. ते पाहिल्यानंतर मान्यच नव्हे तर विश्वास करावा लागेल की प्रेषितत्वाच्या काळात कुरआनची सुरक्षा लेखी स्वरूपातदेखील झाली, व्यापक प्रमाणात झाली आणि पूर्णपणे झाली.

आता उरला नंतरच्या काळांचा प्रश्न, तर कदाचित हा असा प्रश्न असेल जो केवळ अनावश्यक रीतीने उभा केला जाऊ शकतो. धर्मभीरू चारही खलीफांनी या ठेवीची सुरक्षा व प्रकाशनाची जी व्यवस्था केली होती ती 'कुरआनचे संकलन' या चर्चेत आपण पाहिले आहे. उस्मान (रजि.) यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांचे प्रमुख लिहिणारे जैद बिन साबित (रजि.) यांच्या नेतृत्वाखाली कुरआनच्या नक्कली (प्रति) तयार करविल्या व संपूर्ण मुस्लिम प्रदेशात त्या पाठविण्याची व्यवस्था केली होती. तीसुध्दा आपल्या समोर आली आहे. याशिवाय या सत्यालादेखील कसल्याही प्रकटन व कथनाची गरज नाही की नंतरचा काळ इस्लामचा विद्युत वेगाने प्रगती करण्याचा होता. त्याची सत्ता व त्याची साधने दिवसेंदिवस विस्तृत होत चालली होती आणि त्याच्या क्षेत्रात लेखनाचे ज्ञान बाळगणाऱ्यांची संख्या हजारो व लाखांच्या वर पोचत होती आणि सर्वांत अखेरची गोष्ट अशी आहे की संपूर्ण इस्लामी राज्याची, जे धर्मभीरू खलीफांच्या काळातच अरबस्थानच्या पुढे ज़ाऊन इराक, सीरिया (शाम) व इराण वगैरे देशापर्यंत विस्तृत झाले होते, राज्य घटना व कायदा मूलत: हाच कुरआन होता. ही संपूर्ण वस्तुस्थिती आपल्या तोंडून जे काही सांगत आहे ती ऐकल्यास निश्चितपणे बहिरे कानदेखील ऐकण्यापासून वंचित राहणार नाहीत. अल्लामा इब्ने हज़्म यांचा अंदाज असा आहे की दुसरे ख़लीफा उमर (रजि.) यांच्या काळात मुस्लिमाजवळ कुरआनच्या एक लाखपेक्षा कमी प्रती राहिल्या नसतील.

*(किताबुल फस्ल भाग - २, पृष्ठ ७८)*

स्पष्ट गोष्ट आहे की ज्या कुरआनचे महत्त्व असे होते की त्यावरच परलोकातील

कल्याण व राज्याच्या प्रशासनाचे सर्वकाही अवलंबून होते. तेव्हा कोणतीही मुस्लिम वस्ती त्याच्या प्रतिपासून कशी वंचित राहू शकत होती? विशेषत: त्या विशाल राज्याच्या असंख्य शासनाधिकारी व काजींच्या (न्यायाधीशांच्या) जवळ तर कुरआनच्या प्रती नसण्याला काही अर्थच राहत नाही. कारण त्यांच्या कर्तव्यांच्या अंमलबजावणीसाठी हा ग्रंथ त्यांच्याजवळ असणे कोणत्याही परिस्थितीत अत्यावश्यक होते. कल्पना तर असे म्हणते की खुद्द सरकारकडून त्यांना या प्रती उपलब्ध करून दिल्या जात असतील. ऐतिहासिकदृष्ट्या ही एक मान्य वास्तविकता आहे की धर्मभीरू खलीफा आपल्या गव्हर्नर व काजींना जे आदेश पाठवीत असत तेसुध्दा लिखित स्वरूपात असत. मग हे कसे मान्य केले जाऊ शकते की जी वस्तु संपूर्ण समुदायासाठी अस्सल मार्गदर्शन व संपूर्ण राज्यासाठी मौलिक कायदा म्हणून असेल तिच्या बाबतीत त्यांना अशा प्रकारच्या व्यवस्थेची गरज भासली नसेल!

या संपूर्ण चर्चेवरून हे सत्य दोन प्रहरच्या सूर्याप्रमाणे प्रकाशमान व स्पष्ट झालेले आहे की पवित्र कुरआनचे रक्षण दोन्ही प्रकारे केले गेले. अगदी व्यवस्थितपणे, अत्यंत समाधानकारक रीतीने केले गेले. त्याला पुष्कळ विस्तृत प्रमाणावर आपल्या मूळ स्वरूपात अगदी शब्द न शब्द कंठस्थ ठेवले मेले आणि लिहिलेसुध्दा गेले आणि पैगंबरांच्या काळानंतर हे दोन्ही क्रम केवळ टिकूनच राहिले असे नव्हे तर अत्यंत वेगाने प्रगतीसुध्दा करीत राहिले. अशा प्रकारे अल्लाहच्या या ग्रंथाची नक्कल पूर्ण क्रमाने होत-होत अगदी त्याच स्थितीत आमच्यापर्यंत पोचत आली आहे ज्यात तो महान अल्लाहकडून आपल्या पैगंबरांना प्रदान केला गेला होता. ज्या कोणाला सत्य मान्य करावयास येते तो हे मान्य केल्याशिवाय राहू शकत नाही की जगातील दुसरा कोणताही ग्रंथ असा नाही की ज्याला आपल्या सुरक्षेसाठी प्रारंभापासून आजपर्यंत असली समाधानकारक व्यवस्था उपलब्ध झाली असेल. जो असंख्य हृदयातसुध्दा आणि असंख्य लेखन-पत्रांतसुध्दा निरंतर चिन्हांकित होत आलेला असेल. ज्या मुस्लिमेतर संशोधकांनी मोकळ्या मनाने अवलोकन केले त्यांनीसुध्दा हे मान्य केले आहे. जर्मन विद्वान वॉन हेम यांचे कथन आहे, 'आम्ही कुरआनला प्रेषित मुहम्मद (स.) यांची वाणी तसेच मानतो ज्याप्रमाणे मुस्लिम त्याला अल्लाहची वाणी मानतात.' याच वास्तविकतेची स्पष्ट ग्वाही आहे.

## ब) कुरआनातील पुरावे

पवित्र कुरआनची ती कथने ज्यावरून स्पष्ट सिध्द होते की तो सदैव सुरक्षित राहणारा ग्रंथ आहे ती अशी आहेत.

१) प्रेषित मुहम्मद (स.) यांना उद्देशून फर्मविले गेले आहे,

'आम्ही तुम्हाला (हा कुरआन) अशा प्रकारे शिकवू की (तो तुम्हाला पूर्णपणे तोंडपाठ होईल आणि) तुम्ही त्याला विसरणार नाही.' *(सूरह आला)*

अल्लाहच्या या कथनाची पार्श्वभूमी अशी आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्वाच्या महान व मोठ्या जबाबदाऱ्यांची स्वाभाविकपणे फार मोठी जाणीव असे. नेहमी या चिंतेने ते अस्वस्थ राहत की एखादे वेळी असे होऊ नये की या संदेश व मार्गदर्शनाचा कोणताही भाग अल्लाहच्या दासापर्यंत पोचण्यापासून राहून जावा. तो अल्लाहकडून माझ्यावर अशासाठीच उतरत आहे की त्याला जसाचा तसा त्यांच्यापर्यंत मी पोचवावे. या जाणीवेमुळेच ते कुरआनची वह्य उतरताना ती तोंडपाठ करण्याच्या बाबतीत अत्यंत उद्विग्नता व शीघ्रता दाखवीत असत. यावर महान अल्लाहने त्यांचे सांत्वन करीत फर्माविले की उद्विग्न होण्याची व शीघ्रता दाखविण्याची गरज नाही. खात्री ठेवा. ही आमची वह्य आणि आमची शिकवण आहे ज्याप्रमाणे आम्ही ती तुमच्यापर्यंत समाधानकारक पध्दतीने पोचवीत आहोत. त्याचप्रमाणे ती तुमच्याकडून चांगल्या प्रकारे पाठही करून घेऊ आणि तिचा कोणताही शब्द तुमच्या स्मरणातून जाणार नाही.

हीच खात्री एका दुसऱ्या प्रसंगी एका वेगळ्या पध्दतीने दिली गेली आहे. म्हटले गेले,

'हे प्रेषित मुहम्मद (स.) या (कुरआन) ला ग्रहण करताना आपल्या जिभेला (या उद्देशाने अधीरपणे) गती देऊ नका की तो चटकन शिकून घ्यावा. विश्वास ठेवा तो एकत्रित करणे आणि त्याचे पठन करून तुम्हाला (ऐकविणे) ही आमची जबाबदारी आहे.' *(सूरह - कियामह)*

अल्लाहच्या या कथनाने या गोष्टीला आणखी अधिक स्पष्ट व निश्चित बनविले की प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या ज्ञान व स्मरण शक्तीतून कुरआनचा कोणता एक शब्ददेखील बाहेर राहू शकणार नाही. कारण या गोष्टीचे महान अल्लाहकडून केवळ वचनच आहे असे नव्हे तर (जसे की मागील आयत वरून कळत होते) त्याला त्याने आपली जबाबदारीदेखील ठरविले आहे. ज्या कोणाचे अल्लाहवर ईमान आहे तो हेही जाणतो की जर अल्लाहने एखाद्या गोष्टीला आपली जबाबदारी ठरविले तर त्याचा अर्थ काय होतो? त्याचा अर्थ असा होतो की सूर्य पश्चिमेला निघणे तर शक्य आहे परंतु हे कोणत्याही प्रकारे शक्य नाही की अल्लाह आपली जबाबदारी पूर्ण करणार नाही. म्हणून त्याचे हे कथन की 'हा कुरआन एकत्र करणे व त्याचे पठन करून ऐकविणे आमची जबाबदारी आहे' या गोष्टीचा निश्चित पुरावा आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हृदयात कुरआन पूर्णपणे सुरक्षित राहिला आणि अगदी त्याच स्वरूपात राहिला ज्यात तो त्यांना

प्रदान केला गेला होता.

२) कुरआनचे वैशिष्ठ्य त्याला अवतरल्याने असे म्हटले आहे.

'निश्चितपणे हा एक ग्रंथ 'अजीज' आहे. असत्याला याच्या पुढूनही यात मार्ग मिळणार नाही आणि याच्या पाठीमागूनही नाही.' *(सुरह हामीऽम सज्दह)*

'अज़ीज़'चा अर्थ आहे तो की ज्याच्याविरूध्द कोणतीही शक्ती यशस्वी होऊ शकणार नाही. म्हणून कुरआन 'किताबे अजीज' असण्याचा अर्थ असा झाला की त्याच्या अस्तित्वाला कधीही कसलीही हानि पोचणार नाही. त्याच्या प्रतिष्ठेला कोणतीही गोष्ट हानिकारक ठरू शकणार नाही. आणि त्याचे स्वरूप व त्याची प्रतिष्ठा कसल्याही परिवर्तनाच्या पोचच्या बाहेर आहे. पुढे याच 'अजीजियत'चे विश्लेषण करताना स्पष्ट केले गेले आहे की 'असत्याला' त्यात घुसण्याचा मार्ग मिळणार नाही. 'एखाद्या ईशग्रंथात असत्य घुसण्याचा अर्थ असा आहे की त्यात एखादी मानवी वाणी मिसळली जाणे होय अथवा त्याचे शब्द व वाक्यात उलट-फेर होणे अथवा त्याचा एखादा भाग नष्ट होणे होय कारण अशा स्थितीपैकी कसलीही स्थिती कां असेना ती प्रत्यक्षात समोर आल्यानंतर ग्रंथ आपल्या मूळ उतरलेल्या स्थितीत बाकी राहत नाही आणि त्याला पूर्ण व निव्वळ सत्य असण्याची गोष्ट लागू केली जाऊ शकत नाही. म्हणून पवित्र कुरआनमध्ये असत्याला मार्ग मिळू न शकण्याचा अर्थ स्पष्टपणे असा आहे की या ग्रंथात कधीही कमी-जास्त होऊ शकत नाही आणि त्याचे शब्द मागे-पुढे होऊ शकत नाहीत आणि त्याच्या स्थितीत कोणत्याही प्रकारचे अन्य परिवर्तन येऊ शकत नाही.

पवित्र कुरआनसंबंधी हे अल्लाहचे वचन आहे असे वचन ज्यात आज्ञेसारखे वैभव आहे. या वचन अथवा आज्ञेप्रसंगी महान अल्लाहने मुख्यत्वेकरून केवळ आपल्या पैगंबरालाच समोर ठेवले नाही आणि त्यात काळाचेही कोणते बंधन लावले नाही. तर ही गोष्ट नियम म्हणून सांगितली आहे. म्हणून त्याचे हे कथन या गोष्टीची घोषणा आहे की पवित्र कुरआनमध्येदेखील कधी कसलीही मिसळ होऊ शकणार नाही, कधीही त्याचा एखादा भाग नष्ट होऊ शकणार नाही. कधीही त्याच्या शब्दांत मागे पुढे होऊ शकणार नाही. मागील दोन्ही आयतीत हे वचन अथवा कथन केवळ प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यापुरतेच सीमित होते.

३) आणखी एके ठिकाणी फर्मावले गेले आहे,

*'निस्संदेह हा ज़िक्र (अर्थात कुरआन) आम्हीच अवतरिला आहे आणि आम्ही निश्चितपणे त्याला सुरक्षित ठेऊ.'* (सुरह हजर - ९)

अल्लाहच्या या शब्दासाठी कोणत्याही स्पष्टीकरणाची आवश्यकता नाही आणि त्या शब्दावरून वरील प्रश्नाचा प्रत्येक कानाकोपरा आरशाप्रमाणे स्पष्ट आहे. हे शब्द या गोष्टीला एक उघड सत्य असल्याचे सांगतात की हा कुरआन अवतरणारा अल्लाह त्याला सर्व प्रकारच्या परिवर्तन व कमी-जास्त होण्यापासून सुरक्षित ठेवील. हा त्याचा वायदा व निर्णय आहे. यानंतर या गोष्टीची कसलीही शक्यता उरत नाही की केव्हांही कुरआनची ती स्थिती होणे शक्य आहे जी मागील ग्रंथांची होत आली आहे. तात्पर्य असा की ही आयत कुरआन पूर्णपणे सुरक्षित राहण्याच्या बाबतीत अखेरचा शब्द ठरते आणि त्याला कायमस्वरूपी चर्चा व संशोधनाच्या गरजेपासून मुक्त ठरविते.

४) शेवटी हे प्रमाणदेखील पाहा,

पवित्र कुरआनने आपले विशेष स्थान सांगितले आहे. स्वत:ला ज्या खास गुणांचा स्वामी ठरविले आहे, खुद्द त्या गुणांची अनिवार्य व स्पष्ट निकड काय आहे? जो ग्रंथ जगाच्या पालनकर्त्या अल्लाहचा अंतिम मार्गदर्शन-ग्रंथ आहे. ज्याने पूर्वीच्या सर्व ईशग्रंथांना रद्द ठरविले आहे. ज्याचे अनुसरण करण्यावर आता संपूर्ण मानवजातीचे कल्याण व मुक्ती अवलंबून आहे, त्याच्या बाबतीत काय सामान्य बुद्धी ही गोष्ट मान्य करू शकते काय की तोसुध्दा कधी अक्षरांच्या फेरफाराला बळी पडेल? त्यालादेखील कधी विसरले जाऊ शकते? त्यातसुध्दा काही परिवर्तन होऊ शकते? नाही आणि निश्चितच नाही. त्याला कारण असे की या गोष्टीचा त्याचे स्थान व त्याचे पद आणि त्याच्या अवतरण्याच्या उद्देशाशी मेळ बसत नाही, आणि असा विचार करणे मुळात मानवजातीच्या निर्माणकर्त्या अल्लाहवर जुलुम आणि अन्यायाचा आरोप करणे होय. एकीकडे तर तो या ग्रंथाला आपला एकमेव मंजूर केलेला मार्गदर्शन-ग्रंथ ठरवितो आणि त्याच्याच अनुसरणाला आपल्या कृपा व मोक्षप्राप्तीसाठी अट ठरवितो. दुसरीकडे आपल्या दासासाठी तो मूळ स्थितीत सुरक्षितपणे बाकी ठेवण्यासाठी काही विशेष व्यवस्थाही करीत नाही जणू तो आपल्या दासांना या अपराधासाठी शिक्षा देईल. त्यांनी त्याच्या एका विशिष्ठ कायदा व मार्गदर्शन-ग्रंथाचे अनुसरण केले नाही. वास्तविकत: तो विशिष्ठ कायदा व मार्गदर्शन-ग्रंथ आपल्या मूळ स्वरूपात जगात बाकी राहिला नव्हता!

कुरआन सुरक्षित असल्याचे हे प्रमाण जरी त्याच्या एखाद्या स्पष्ट आज्ञेवर आधारित नाही परंतु त्याच्या पुष्कळशा कथनांची, ज्यात त्याने आपल्या विशिष्ठ व श्रेष्ठ गुणांना प्रकट केले आहे, अगदी स्पष्ट निकड आहे. म्हणून त्याच्या आवश्यकतेचा इन्कार केला जाऊ शकत नाही.

# वर्णनशैली

## वर्णनशैलीचे नाविन्य

पवित्र कुरआन केवळ एक उच्चकोटीची श्रेष्ठ वाणी आहे. त्याची उपमा मानवी वाणीच्या भांडारात मिळू शकत नाही असे नाही तर त्याची वर्णनशैलीसुध्दा अनुपम आहे जी कोणत्याही अन्य ग्रंथात आढळू शकत नाही. याचा अर्थ असा आहे की जोपर्यंत एखादा मनुष्यातील कारणे व कल्याणकारी गोष्टींशी परिचित होत नाही, तोपर्यंत कुरआनचे सामान्य अर्थदेखील त्याच्यावर उघड होऊ शकणार नाहीत. तर मग त्याच्या गुणापर्यंत त्याची दृष्टी कशी पोचेल? म्हणून कुरआनचा परिचय होण्यासाठी आवश्यक आहे की त्याच्या वर्णनशैलीच्या या विशेष स्थितीलासुध्दा, कमीतकमी, मौलिकरित्या समजून घेणे आवश्यक आहे.

सामान्य पुस्तके व लेखनांची वर्णनशैली तर अशी असते की त्यात एका ठराविक विषयावरील माहिती, विचार व पुराव्यांना निरंतर व क्रमशः लिहिले जाते. प्रथमतः स्पष्टपणे केंद्रीय विषयाची निश्चिती होते. मग त्याच्या विभिन्न पैलू व समस्यापैकी एकेकावर तपशीलवार चर्चा होते आणि जोपर्यंत एका समस्येवर पूर्ण चर्चा होत नाही तोपर्यंत दुसरीचे नाव घेतले जात नाही. परंतु कुरआनमध्ये अशा प्रकारे विषयाची निश्चिती व स्पष्ट शीर्षक आढळत नाहीत की कोठे भागांची विभागणीसुध्दा दिसत नाही. तसेच विभिन्न प्रश्नावर केल्या जाणाऱ्या चर्चेमध्येदेखील क्रम आढळत नाही. वस्तुतः यात खरे तर सर्वकाही आहे. संपूर्ण कुरआनचा एक व्यापक व प्रत्येक सूरहच्या पूरक भागाचा एक केंद्रीय विषयसुध्दा आहे. प्रत्येक विषयाचे विभिन्न प्रश्न व पैलू आहेत. त्याशिवाय त्यांच्यावर वेगवेगळ्या चर्चा आहेत. या चर्चेत दृढ संबंधसुध्दा आहे. परंतु असे असूनदेखील दिसावयास त्यांची सरमिसळ झाल्याचे दिसते. मौलिक श्रध्दा, नैतिक उपदेश धर्म-कायद्याचे आदेश, आवाहन व उपदेश, उत्तेजन व दिलासा, झिडकारणे व निर्भर्त्सना, धमकावणे व प्रकोप, खूशखबरी व पुण्य, तसेच बुद्धी व रसज्ञता, प्रवृत्ती, ऐतिहासिक पुरावे व सृष्टी-चिन्हांचे प्रमाण वारंवार एकानंतर एक येतात. एकाच विषयाची पुनरावृत्ती वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या पध्दतीने झाली आहे. एकानंतर दुसऱ्या व दुसऱ्यानंतर तिसऱ्या ठिकाणी अगदी अकस्मातपणे सुरू होतो. याशिवाय संबोधनदेखील वरचेवर बदलतो. संबोधित पुरूष पाहता पाहता अव्यक्त पुरूष बनतो आणि अव्यक्त पुरूष संबोधित पुरूष, प्रथम पुरूष एकाएकी अव्यक्त पुरूषाचे रूप धारण करतो आणि अव्यक्त पुरूष प्रथम पुरूषाचा वेश धारण करतो. याशिवाय जी चर्चासुध्दा आहे ती परिचित पध्दतीपेक्षा

बरीचशी वेगळ्या रंगात आहे. श्रध्देचे वर्णन आहे तर ते तत्त्वज्ञान व वाणीच्या शैलीत नाही. नैतिक शिक्षण आहे तर ते नीतीशास्त्राच्या पध्दतीने नाही, खंडन-मंडन आहे तर ते शास्त्रार्थाच्या पध्दतीने नाही. संस्कृती व राजकारण आणि अर्थशास्त्र व समाज शास्त्रावर संवाद आहे, तर तो समाजशास्त्राच्या पध्दतीवर नाही, कायदा व कायद्याच्या तत्त्वांचा उल्लेख आहे तर तो कायदेपंडितांच्या पध्दतीपेक्षा अगदीच भिन्न आणि ऐतिहासिक घटनांचे वर्णन आहे, तर ते इतिहासकारांच्या पध्दतीपेक्षा पूर्णत: वेगळे. याचा अर्थ असा आहे की आमच्या बुध्दीला तर्क-वितर्क व आकलन आणि समजावून देण्याच्या आणि लेखन-वाचन व वक्तृत्त्वाच्या ज्या शैलींचा परिचय आहे, पवित्र कुरआनची वर्णनशैली त्या सर्वांपेक्षा भिन्न आहे. तसे पाहिले तर असे वाटते की ही क्रमवार वाणी नाही तर पसरलेली वाक्ये व विखुरलेल्या तुकड्यांचा ती संयोग आहे, परंतु वास्तविकता याच्या अगदी विपरीत आहे. यात उच्चकोटीचा पारस्परिक संबंध व क्रम आढळतो. हा क्रम प्राप्त करण्यासाठी आवश्यक आहे की डोक्यातून त्या बोलण्या व लिहिण्याच्या साच्यांना काढून टाकले जावे जे सामान्य पुस्तके वाचत-वाचत अथवा भाषण ऐकत-ऐकत आमच्या डोक्यात बसलेले आहेत. मग एका नवीन दृष्टीने पवित्र कुरआनचा अभ्यास केला जावा. ही नवीन दृष्टी बनावट पध्दतीने प्राप्त केली जाऊ शकत नाही तर पवित्र कुरआनच्या नाविन्यपूर्ण शैलीच्या नैसर्गिक कारणांचा व त्याच्या महत्त्वपूर्ण विवेकाचा अभ्यास केल्यास ती आपोआप येते.

## वर्णनशैलीच्या नाविन्याची कारणे

पवित्र कुरआनची वर्णनशैली सामान्य पुस्तकापेक्षा खालील कारणामुळे भिन्न आहे.

**१)** पवित्र कुरआन विषयांचा नव्हे तर भाषणांचा संग्रह आहे म्हणून त्याची शैली दुसऱ्या पुस्तकांच्या शैलीप्रमाणे असण्याचा प्रश्नच उभ्दवत नाही. स्वाभाविकपणे त्याची शैली वक्तृत्वशैली आहे.

**२)** ही भाषणेदेखील एखाद्या उपदेशकाचे उपदेश अथवा एखाद्या प्रोफेसराचे लेक्चर्स नव्हेत तर एका आवाहकाची आवाहन आहेत. अशा आवाहकाचे आवाहने, जो लोकांच्या दरम्यान उभा राहून त्यांना चुकीच्या मार्गापासून परावृत्त करून सरळ मार्गावर आणण्याचा प्रयत्न करीत आहे. म्हणून त्याची शैलीसुध्दा उपदेश अथवा वर्गात धडा शिकविण्यासारखी नाही तर ती पूर्णपणे आवाहन करणारी आहे.

**३)** हे आवाहन, ज्याच्यासंबंधी ही भाषणे दिली गेली होती, ते तेवीस वर्षांच्या दीर्घकाळात विभिन्न परिस्थिती व टप्प्यात आपल्या चरम बिंदूपर्यंत पोचले होते, म्हणून ही भाषणे काही

महिन्यांच्या अल्प मुदतीत लागोपाठ दिली गेली नव्हती व ती एकाच प्रकारच्या परिस्थितीत किंवा एकाच प्रकारच्या लोकासमोर दिली गेली नव्हती, तर वस्तुस्थिती अगदी उलट होती.

या तिन्ही गोष्टींची जी निकड होती त्यावर खूप विचार केला पाहिजे. ही गोष्ट उघड आहे की आवाहनाच्या भाषणांच्या निकडी लेखन, बोध व शिक्षण या सर्वांच्या निकडीपेक्षा भिन्न असतात. जर एखाद्या आवाहकाने आपल्या भाषणात एखाद्या लेखक अथवा प्रोफेसरसारख्या शैलीचा वापर केला तर त्याची वाणी नीरस, प्रभावशून्य व कानाला गोड वाटणार नाही. तसेच जर त्याने केवळ एका उपदेशकाची भूमिका स्वीकारली तर तो आपली क्रांतिकारी उद्दिष्टे कदापि पूर्णत्वास पोचवू शकणार नाही. यात शंका नाही की लेखक अथवा प्राध्यापकाच्या गोष्टीसुध्दा तर्कपूर्ण व शास्त्रीय असतात आणि आवाहकाची वाणीसुध्दा. परंतु लेखक अथवा प्राध्यापकाची चर्चा केवळ तात्त्विक असते आणि वक्त्यांच्या गोष्टी मूलत: स्वाभाविक व शास्त्रीय असतात मुख्यत्वे करून त्या वक्त्याच्या जो आवाहकसुध्दा आहे. अशा वक्त्याचे कार्य केवळ इतकेच नसते की एका लेखकाप्रमाणे आपल्या विचारांना शब्दांत अलंकृत करावे अथवा एका प्राध्यापकाप्रमाणे एखादा वैज्ञानिक सिध्दांत एक समान योग्यतेच्या विद्यार्थ्यांच्या डोक्यात विस्तारपूर्वक बसवावे किंवा एखाद्या उपदेशकाप्रमाणे हृदयात मृदुलता निर्माण करावी आणि पाघळवावे. याउलट त्याचे कार्य निश्चितपणे अधिक उच्च व कठीण असते. एकीकडे तर त्याच्यासमोर अनेक मनोवृत्तीचे व विभिन्न योग्यतेचे लोक असतात. शहरी व ग्रामीण, सुशिक्षित व अशिक्षित, सज्जन व दुर्जन, वह्य (दिव्य बोध) आणि प्रेषितत्व मानणारे व त्यांचा इन्कार करणारे, एकेश्वरवादी व अनेकेश्वरवादी, सर्व प्रकारच्या लोकांना त्या सत्य मार्गाकडे त्याला बोलवावयाचे असते. त्याचबरोबर दुसरीकडे त्याला त्या लोकांच्या मानसिक व व्यावहारिक प्रशिक्षणाच्या जबाबदारीने भरलेले कर्तव्य पूर्ण करणे व त्यांना धार्मिक आज्ञा व आदेशांचे शिक्षण द्यावयाचे असते ज्यांनी त्याच्या आवाहनावर ईमान आणलेले आहे. 'सत्य मार्गाकडे बोलविण्याचा' अर्थ इतकाच नव्हे की आपल्या कथनाला बुद्धी व तर्काच्या तराजूत तोलून लोकासमोर प्रस्तुत केले जावे. इतकेच नव्हे तर असे ही घडते की त्याला मनात बसविण्याचा यथाशक्य प्रयत्न केला जावा आणि ध्येयाने प्रथमत: त्यांच्या मनात दीर्घकाळापासून बसलेले मिथ्या विचार उपटून टाकावेत आणि चुकीच्या, परंतु अत्यंत कोमल भावनांच्या पकडीतून त्यांना मुक्त केले जावे. ही गोष्ट स्पष्ट आहे की या कार्यासाठी विशेष प्रकारच्या मन व बुध्दीचीच नव्हे तर विशेष प्रकारच्या भाषाशैलीचीसुध्दा आवश्यकता असते. आंतरिक दाह व तार्किक शक्तीच नव्हे तर वर्णनशैलीतील जादूसुध्दा आवश्यक आहे. ही

जादू आवाहकाच्या वाणीत तोपर्यंत उत्पन्न होऊ शकत नाही जोपर्यंत त्याची तीक्ष्ण दृष्टी आपल्या श्रोता गणाच्या विचारांचा, त्यांच्या कलाचा, त्यांच्या मानसशास्त्राचा सफल अवलोकन करीत राहत नाही. कधी उपदेशाच्या कधी प्रेमाच्या, कधी भयभीत करण्याच्या व धमकावण्याच्या, कधी आवडीच्या तर कधी क्रोधाच्या, कधी जवळीक दर्शविणाऱ्या तर कधी तिरस्काराच्या शैलीचा तो अवलंब करीत नाही आणि या उद्देशासाठी तो वरचेवर तो संबोधन बदलत राहत नाही. त्याचप्रमाणे आवाहनकार्यात सहकार्य देणाऱ्यांच्या आचार-विचारांना प्रशिक्षित करण्याचा आणि त्यांना धर्माच्या आज्ञा व आदेश देण्याचा अर्थ असा नव्हे की त्यांच्या हातात उपदेश व कायद्यांचा संग्रह दिला जावा. तर असा आहे की पूर्णत: सूज्ञपणे आणि सावधगिरीने त्यांच्या जीवनाला आवाहनाच्या साच्यात बसवीत राहावे आणि हा उद्देश तोपर्यंत कदापि गाठणे शक्य नाही जोपर्यंत आवाहक आज्ञाच्या सैध्दान्तिक पैलूच्या पुढे जाऊन वातावरणाच्या निकडी परिस्थितीची अनुकूलता लोकांच्या मानसिक स्थिती व त्यांच्या मनाच्या तयारीकडेसुध्दा पूर्णपणे लक्ष देत नाही. त्याचप्रमाणे त्यांच्याशी बोलत नाही. आता असे म्हणणे अगदीच अनावश्यक ठरेल की दुसऱ्या एखाद्या व्यक्तीला बोलताना अशा प्रकारच्या गोष्टीत काहीही स्वारस्य असत नाही आणि जर हे सत्य आहे तर हे आवश्यक आहे की आवाहकाची वर्णनशैलीदेखील भिन्न प्रकारची असावी.

पवित्र कुरआन आवाहनाच्या भाषणांचा संग्रह आहे. मूळ वक्ता म्हणून अल्लाह आहे, संपूर्ण मानवजातीला संबोधिले आहे. वह्य (दिव्य बोध) आणणारे जिब्रईल (अ.) हे फरिश्ते (देवदूत) आहेत आणि वह्य प्राप्त करणारे प्रेषित मुहम्मद (स.) माध्यम व प्रतिनिधी म्हणून आहेत. अर्थात पवित्र कुरआन त्या भाषणांचे नाव आहे जी विश्वाच्या महान शासकाने आपल्या जगवासी प्रजाजनांना संबोधित करून दिलेली आहेत. म्हणून त्याच्या शैलीत त्याच सर्व गोष्टी निश्चितपणे आढळतात ज्यांचा उल्लेख केला गेला आहे. स्वाभाविकपणे त्यात प्रसंगानुरूप क्रोधही आहे आणि नर्मीसुध्दा, धमक्याही आहेत आणि सुवार्तासुध्दा. प्रमाणही आहेत व उपदेशसुध्दा, प्रेरणाही आहे व मागे ओढणेही प्रेमाचे बोलही आहेत आणि प्रकोपाची कठोरतासुध्दा मग याच गोष्टींची जेथे जशी गरज भासली त्याप्रमाणे संबोधनदेखील बदलत गेले. जसे आताच जो संबोधन पुरूष होता त्याला अकस्मातपणे अव्यक्त पुरूष बनवून टाकले आहे, जणू वक्त्याने त्याची गफलत उणीव व दुस्साहस पाहून रागाने व घृणेने त्याच्याकडून आपली दृष्टी फिरविली आहे. आणि आता त्याच्याशी समोरासमोर बोलण्यासदेखील तयार नाही. अथवा जसे मूळ प्रथम पुरूष अर्थात अल्लाहने स्वत:ला जागोजागी अव्यक्त पुरूष ठरविले आहे आणि मधील - वह्य

आणणारे देवदूत किंवा वह्य प्राप्त करणारे प्रेषित मुहम्मद (स.) यांना आपल्या जागी प्रथम पुरूष बनविले आहे, कारण कित्येक गोष्टी अशा असतात ज्या परोक्षशैलीत बोलण्याने प्रभावी ठरतात आणि आनंद प्राप्त होतो. असेच कित्येक जागी तर त्याने मूळ व्दितीय पुरूषाला प्रथम पुरूष आणि अल्लाहला व्दितीय पुरूष बनविले आहे. ही जणू त्याच्याकडून या गोष्टीची पुष्टी आहे किंवा त्याच्या स्वभावाचे प्रतिनिधित्व, की त्याने आपल्या पालनकर्त्याकडे असे निवेदन केले पाहिजे.

याशिवाय हीदेखील आवाहनाच्या भाषणांचीच निकड होती की पवित्र कुरआनमध्ये अनेक प्रसंगी एका चर्चेनंतर अकस्मातपणे दुसरी चर्चा सुरू झाली आहे, जिचा प्रत्यक्षपणे पहिल्या चर्चेशी काडीमात्र संबंध दिसत नाही. आता एकेश्वरत्वावर बोलणी होत होती की अकस्मातपणे अंतिम दिन व कर्मांच्या हिशेबाची गोष्ट आली. पवित्र कुरआन आणि प्रेषितत्वाच्या सत्यतेबद्दल प्रमाण दिले जात होते की लगेच सत्याचा इन्कार करणाऱ्यांच्या ऐहिकतेवर टीका होऊ लागली. अरब-अनेकेश्वरवादींच्या हट्टीपणाचा उल्लेख होता की ग्रंथधारकांच्या अत्याचार आणि बेजबाबदार कृत्यांचे वर्णन सुरू झाले. पवित्र कुरआनचा एक ग्रंथ व एक 'रचना' म्हणून विचार करून पाहिले तर काहीही लक्षात येणार नाही की ही कसली शैली आहे? परंतु जर एका आवाहकाच्या जागी उभे राहून पाहिले आणि समोर ती पूर्ण पृष्ठभूमीदेखील आहे जी अल्लाहच्या या वाणीशी संबंधित होती, तर त्यातील प्रत्येक गोष्ट तशीच सत्य व योग्य असल्याचे दिसेल जसा अंगठीतील खडा असतो.

## विषयांची पुनरावृत्ती

पवित्र कुरआनमध्ये चर्चा व विषयांच्या आधिक्यामुळे पुनरावृत्ती आढळते. कित्येक आज्ञा, आदेश, धमक्या, सुवार्ता, सावधगिरीचे संकेत, उपदेश, प्रमाण, साक्षी व ऐतिहासिक घटना अशा आहेत ज्यांचा उल्लेख जागोजाग झाला आहे. पवित्र कुरआनने स्वत:विषयी म्हटले आहे,

'एक असा ग्रंथ ज्याचे विषय आपसात मिळते-जुळते आहेत व वारंवार त्यांची पुनरावृत्ती झाली आहे.' *(सुरतुज्जुमर - २३)*

वरवर पाहिल्यास ही काही आवडणारी गोष्ट नव्हे आणि एखाद्या अजाण व्यक्तीच्या बुध्दीसाठी विषयांची ही पुनरावृत्ती ओझे ठरेल. परंतु पवित्र कुरआन अवतरणपध्दती व अवतरण उद्देश या दोन्ही गोष्टींची निकड अशी होती की या विषयांची वारंवार पुनरावृत्ती आवश्यक होती.

१) अवतरणपध्दतींची निकड अशासाठी होती की पवित्र कुरआन एका व्यावहारिक व विकासपरक आवाहनासह उतरत होता. तसे मागील पृष्ठांत सविस्तर कळले आहे. तेव्हा हे आवश्यक होते की आवाहन ज्या वेळेपर्यंत ज्या टप्प्यात होते, त्या वेळेपर्यंत केवळ तेच आदेश दिले जात असत जे त्या टप्प्याशी मेळ खात असत. दुसऱ्या टप्प्याच्या गोष्टींचा उल्लेख अजिबात केला जात नसे, तर याच टप्प्यांतील गोष्टींची गरजेनुसार पुनरावृत्ती केली जात असे, मग त्याच्यासाठी किती का काळ लागेना.

२) अवतरण उद्देशाची निकड अशासाठी होती की कोणतेही आवाहन त्या वेळेपर्यंतच सफल होऊ शकते जेव्हा त्याला मानणाऱ्यांच्या हृदय व बुध्दीमध्ये त्याचा पाया पूर्णपणे दृढ झालेला असेल. मग त्यांची योग्यप्रकारे निगादेखील ठेवली जात राहावी. नाही तर अनुमान व अनुभव या दोहोंचा निर्णय आहे की आवाहन आपले लक्ष्य गाठू शकत नाही. कुरआनी आवाहनाच्या उद्देशांची पूर्ततासुध्दा मागणी करीत होती की त्याच्या मौलिक शिकवणीना प्रथम दिवसापासून शेवटच्या दिवसापर्यंत कोणत्याही प्रसंगी आणि कोणत्याही स्थितीतदेखील दृष्टी आड होऊ दिले जाऊ नये. आवाहनाच्या प्रत्येक टप्प्यात वारंवार त्यांची उजळणी केली जात राहावी आणि त्यांची आठवण करून दिली जात रहावी. म्हणून आपण पाहाल की पवित्र कुरआनमध्ये दुसऱ्या विषयांची पुनरावृत्ती तर एखाद्या विशिष्ठ टप्प्यापर्यंतच सीमित आहे, परंतु एकेश्र्वरवाद, अंतिम दिन, मोबदल्याचा दिवस, प्रेषितत्व, भक्ती व आज्ञापालन, पुण्यकर्म, ईशभीरूता, सहनशीलता व कृतज्ञता, अल्लाहवर विश्वास व त्याकडील कल, नमाज व जकात आणि संबंध-बंधन वगैरे बाबींच्या उल्लेखापासून कोणताही पृष्ठ रिक्त नाही. या गोष्टी त्यात अशा प्रकारे पसरल्या आहेत ज्याप्रकारे मानव-शरीरात नाड्या पसरल्या आहेत कारण यांच्याच दृढतेशी धर्माची दृढता जुडलेली आहे.

परंतु पुनरावृत्ती या शब्दामुळे असा गैरसमज होऊ नये की एकच गोष्ट शब्द व अर्थ अशा दोन्ही दृष्टीने जशीच्या तशी पुन्हा सांगितली गेली आहे. नव्हे, असे अजिबात नाही. पवित्र कुरआनमध्ये जरी एकच आज्ञा, एकच कथा किंवा एकाच प्रमाणाचे वर्णन दहा-वीस ठिकाणी आलेले आहे तरी पुनरावृत्तीसाठी पुनरावृत्ती मात्र कोठेही नाही. कारण ती प्रत्येक ठिकाणी समजावून देण्याचा व आठवण करून देण्याचा कोणता न कोणता नवीन पैलू निर्माण करते. उदाहरणार्थ, तो एकाच कथेचे संक्षेप व विस्ताराच्या विभिन्न सीमेत वर्णन करतो परंतु घटनाक्रम व वर्णनशैलीत नाविन्यसुध्दा निर्माण करतो. तो शब्दांना परिवर्तित करतो कथांच्या विभिन्न भागांपैकी एखाद्याला कुठे तर दुसऱ्याला कुठे गाळून टाकतो. या गोष्टीमुळे जेथे असा फायदा होतो की एकच गोष्ट, एकाच प्रकारच्या

वाक्यात व एकाच शैलीत, ऐकत-ऐकत मनाला असह्य वाटत नाही. मन व कान कंटाळत नाहीत. तेथे यापेक्षा मोठा लाभ असा होतो की आठवण करून देण्याचे व प्रमाणांचे पैलू परिवर्तीत होतात आणि अल्लाहच्या विवेकाचे काही नवीन पैलू उठून समोर येतात. त्यामुळे ऐकणाऱ्या व समजून घेणाऱ्यावर प्रत्येक वेळी एक नवीन प्रभाव पडतो. अशा प्रकारे कथांची ही पुनरावृत्ती, पुनरावृत्ती आहेसुध्दा व नाहीसुध्दा. यावरूनच आदेशांची पुनरावृत्ती, उपदेशांची पुनरावृत्ती व दुसऱ्या विषयांच्या पुनरावृत्तीची कल्पना केली जाऊ शकते. येथे केवळ असेच नाही की एक-एक विषय शेकडो रंगाने बांधला गेला आहे. तर यांत शेकडो चातुर्य व आवाहनाच्या दृष्टीने लाभ भरलेले आहेत.

मग जो कोणी या दूरदर्शितेच्या महत्त्वावर दृष्टी टाकील आणि जो पवित्र कुरआनमधील विषयांच्या पुनरावृत्तीला समजून घेईल त्याच्याबद्दल असा विश्वास आहे, की त्याच्याकरिता कोणत्याही आक्षेपाचा प्रश्नच उरणार नाही. तो या वर्णनाच्या पुनरावृत्तीची गणना पवित्र कुरआनच्या उच्च गुणात करील, जसे की त्याने स्वत: केले आहे. आणि त्याला त्याच्या आवाहनासाठी आवश्यक ठरवील जसे की त्याने स्वत: म्हटले आहे.

# पवित्र कुरआन आणि त्याचे भाग

## पवित्र कुरआनचे नामकरण

'कुरआन' शब्द अरबी भाषेचा एक धातु आहे. याचा शाब्दिक अर्थ आहे 'अक्षर व शब्दांना सार्थक क्रमाने जोडून जिभेने व्यक्त करणे' म्हणजे 'पठन करणे' होय. मग अरबी भाषेच्या या सामान्य नियमानुसार की धातुचा प्रयोग कर्माच्या अर्थानेसुध्दा केला जातो, या शब्दाचा प्रयोग त्या गोष्टीसाठीसुध्दा होऊ लागला की जिचे पठन केले जाते. अशा प्रकारे प्रत्येक पुस्तक की ज्याचे वाचन केले जाते त्याला शाब्दिक अर्थानुसार 'कुरआन' म्हटले जाऊ शकत होते. परंतु वाक्यप्रचार आणि वास्तविक प्रयोगाचा संबंधांमुळे प्रत्येक पुस्तकासाठी 'कुरआन' या शब्दाचा प्रयोग केला गेला नाही. मुख्यत्वे करून केवळ त्याच पुस्तकाच्या मर्यादेपर्यंत याच्या प्रयोगाला सीमित ठेवले गेले आहे, जो अल्लाहकडून अवतरित आहे. हा शब्द (कुरआन) आता अल्लाहकडून अवतरलेल्या ग्रंथासाठी 'सामान्य नाम' बनला आहे. आणि कुरआनचा अर्थ आहे अल्लाहकडून अवतरिला जाणारा ग्रंथ. खुद्द पवित्र कुरआनमध्ये हा शब्द कित्येक ठिकाणी याच अर्थात प्रयुक्त झाला आहे. उदाहरणार्थ,

'आणि जर एखादा असला 'कुरआन' (म्हणजे अल्लाहने उतरविलेला ग्रंथ) असता की ज्याच्याकडून पर्वतांना चालविले गेले असते.' *(सूरतुर्रद - ३१)*

हा तर झाला शब्द 'कुरआन'चा सामान्य अर्थ यानंतर या शब्दांत अधिक वैशिष्ठ्य आले. त्याने एका विशेष पारिभाषिक शब्दाचे स्थान धारण केले. त्याचा अर्थ केवळ तो अल्लाहकडून उतरलेला ग्रंथ राहिला जो प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरलेला आहे. अशा प्रकारे आता हा शब्द प्रारंभी 'अल' (जो अरबी भाषेत शब्दांना 'विशेष नाम' बनविण्याचे चिन्ह आहे) जोडल्याने अल्लाहच्या याच विशिष्ठ ग्रंथाचे नाव पडले आहे. जरी यामुळे की तो अल्लाहकडून अवतरलेल्या ग्रंथासाठी सामान्य नामसुध्दा आहे. अल्लाहकडून अवतरलेल्या एखाद्या अन्य ग्रंथासाठी त्याचा प्रयोगदेखील झाला आहे. (जसे की खुद्द पवित्र कुरआनमध्येच एके ठिकाणी 'तौरात'ला 'अलकुरआन' म्हटले गेले आहे. (पाहा, सूरह हिज्र - आयत क्रमांक ९१) तरी त्याच्यासाठी स्पष्ट प्रमाण असतील.

पवित्र कुरआनला 'अलकुरआन' म्हटले जाणे आणि महान अल्लाहकडून याला हे नाव देण्यामधील मूळ विवेक तर केवळ तोच जाणतो. परंतु जर ती कारणे व विवेक

खालीलप्रमाणे असतील तर आश्चर्य वाटू नये.

१) पवित्र कुरआन मानवी जीवनासाठी परिपूर्ण संविधान व सर्वकालीन मार्गदर्शन आहे. म्हणून त्याच्या अनुयायींचा त्याच्याशी संबंधसुध्दा परिपूर्ण व सर्वकालीन आहे. या संबंधाची निकड अशी आहे की तो कागदांच्या पृष्ठावर अंकित राहण्यापेक्षा अधिक त्यांच्या हृदय-पटलावर अंकित राहावा. जिव्हा त्याच्या पठनात साधारणपणे मग्न रहाव्यात, म्हणून त्याच्या रक्षणाचे प्रथम व मौलिक साधनसुध्दा खऱ्या संरक्षकाकडून हेच ठरविले गेले. प्रत्येक काळात हजारो हाफीज (पवित्र कुरआन तोंडपाठ असलेली व्यक्ती) यांचे हृदय-स्थळ त्याचे विश्वस्त राहतील, लक्षावधी जिभा त्याच्या पठनाने ध्वनित होत राहतील. म्हणून या ग्रंथाचे नाव 'कुरआन' ठेवले गेले म्हणजे तो ग्रंथ ज्याचे पठन केले जात व पठन होत राहाते.

२) पवित्र कुरआनव्दारे मार्गदर्शन अवतरण्याचा तो क्रम चरम बिंदूला पोचला आहे जो आदम (अ.) यांच्या काळापासून सुरू झाला होता. त्याच्यात आजपर्यंत अवतरलेल्या सर्व मार्गदर्शन-ग्रंथाच्या मौलिक शिकवणी एकत्रित व सुरक्षित केल्या गेल्या आहेत. अल्लाहकडून अवतरलेल्या मागील ग्रंथांपैकी जर एखाद्या ग्रंथाच्या बाबतीत आम्ही माहीत करून घेण्याचे ठरविले की त्याची मूळ शिकवण व आवाहन काय होते? खुद्द त्या नावाच्या ग्रंथाने आम्हाला माहिती करून घेण्यात पूर्ण यश कदापि प्राप्त होऊ शकत नाही, तर ते याच पवित्र कुरआनव्दारे ते प्राप्त होऊ शकते. अशा प्रकारे हा पवित्र कुरआन सांगावयास तर एक ग्रंथ आहे, परंतु वास्तविकत: संपूर्ण वह्य (दिव्य बोध) चा क्रम व अल्लाहकडून अवतरलेल्या सर्व ग्रंथांचा संग्रह आहे. म्हणून त्याचे नाव 'कुरआन' योजिले गेले, ज्याच्या मूळ शाब्दिक अर्थातच 'जमा' व एकत्रित करण्याचा अर्थ आहे.

पवित्र कुरआनची आणखी काही नावे आहेत जी त्याने स्वत:साठी पुष्कळदा प्रयुक्त केली आहेत. उदाहरणार्थ, ग्रंथ फ़ुर्क़ान ज़िक्र, ज़िक्रा, नूर, हुदा वगैरे. परंतु त्यांची स्थिती विशेष नाम व नामासारखी नाही. जशी की कुरआनची होती त्या अर्थी या चर्चेत गुंतणे येथे काही आवश्यक वाटत नाही की या शब्दांचे अर्थ काय आहेत आणि पवित्र कुरआनने ही नावे स्वत:ला का दिली आहेत?

## सूरह

पवित्र कुरआन पूर्णपणे एक सलग विषय व चर्चा म्हणून नाही तर तो एकशे चौदा भागांत विभाजित झाला आहे. त्यांचे स्वरूप एका ग्रंथाच्या अध्यायासारखे आहे. पवित्र कुरआनच्या या भागांना महान अल्लाहने 'सूरह' म्हटले आहे.

प्रत्येक सूरहचा एक दृढ विषय आहे, जो संपूर्ण कुरआनच्या व्यापक व पूर्ण विषयाचा एक अंश आहे. त्याच्याशी संबंधित बाबींपैकी एखादी विशेष बाब सूरहची संपूर्ण चर्चा त्याच्या याच केंद्रीय विषयाच्या सभोवती भ्रमण करते. ही चर्चा अपेक्षाकृत आपल्या उद्देश व विषयाच्या दृष्टीने पूर्णतः परिपूर्ण असते आणि अन्य कोणत्याही सूरहची त्याला गरज भासत नाही. प्रत्येक सूरहच्या केंद्रीय विषयाचा अगोदरच्या व नंतरच्या सूरहच्या केंद्रीय विषयाशी एक तार्किक व स्वाभाविक संबंध असतो. परंतु या सर्व गोष्टी समजून घेण्यासाठी मोठी जिज्ञासा व सखोल मनन व चिंतनाची आवश्यकता आहे. कारण त्यांचे कोणतेही स्पष्टीकरण खुद्द पवित्र कुरआनमध्ये नाही. आणि त्यांना आमच्या चिंतन व विवेकासाठी सोडून दिलेले आहे जशी की पवित्र कुरआनच्या आवाहनाची निकड होती.

'सूरह'चा शब्द 'सूर'पासून निघाला आहे ज्याच्या अर्थ शहरा भोवतालचा तट आहे. बुध्दीची हे जाणून घेण्याची इच्छा होईल की पवित्र कुरआनच्या या अंशांना 'सूरह' असे का म्हटले गेले आहे? परंतु ज्याअर्थी या बाबतीतसुध्दा महान अल्लाह किंवा त्याच्या प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडून कोणतेही स्पष्टीकरण केले गेले नाही त्या अर्थी त्याचे कारणदेखील अनुमानाच्या आधारेच निश्चित केले जाऊ शकते. विचाराअंती त्याची दोनच कारणे लक्षात येतात.

१) कुरआनच्या या अंशापैकी प्रत्येक अंशाची ती दृढ स्थिती आहे ज्याचा उल्लेख आताच झाला आहे. म्हणजे पवित्र कुरआनच्या अंशाचा 'सूरह'च्या नावाने उल्लेख करून या वास्तविकतेकडे संकेत केला गेला आहे. ज्याप्रकारे एखाद्या शहराची दृढ स्थिती त्याच्या भोवतालच्या तटाव्दारे प्रकट होते आणि देशातील अन्य वस्त्यापेक्षा वेगळे व बाकीच्या भूभागापेक्षा वेगळा बनून राहतो. त्याचप्रकारे पवित्र कुरआनचा प्रत्येक भाग म्हणजे त्याच्या प्रत्येक सूरहचा एक स्थायी चर्चेचा मथळा असतो, चर्चेची एक स्थायी व्यवस्था असते. आवश्यक तपशील व प्रासंगिक चर्चा असतात. अशा प्रकारे तो एक स्थायी व दुसऱ्या सूरहपेक्षा वेगळा दर्जा बाळगतो. म्हणून बुद्धी म्हणते की जर प्रत्येक सूरहचा आपला स्वतःचा स्थायी दर्जा नसता तर संपूर्ण कुरआनला एकशे चौदा सूरहमध्ये विभाजित करण्याऐवजी निरंतर एकच विषय ठेवला गेला असता.

२) दुसरे कारण पवित्र कुरआनची ती पूर्ण सुरक्षा आहे जिचा तपशील मागील पृष्ठांत आमच्यासमोर आलेला आहे. म्हणजे ज्याअर्थी महान अल्लाहचा असा निर्णय होता की तो पवित्र कुरआनला सदैव सुरक्षित ठेवील, त्या अर्थी त्याच्या अंशांना व विभागांना 'सूरह' हा शब्द वापरून त्याने मुळात आपल्या त्याच निर्णयाची एका विशिष्ठ पध्दतीने घोषणा केली आहे. जणू ही युक्ती हे दर्शविण्यासाठी अवलंबिली गेली आहे की पवित्र

कुरआन सत्य गोष्टींच्या अशा आध्यात्मिक वस्त्यांचा समूह आहे जो अपरोक्ष सुरक्षेच्या मजबूत तटाने वेढून काळाच्या प्रत्येक हस्तक्षेपापासून कायमस्वरूपी सुरक्षित करून टाकला आहे.

सूरहची नावे 'तौक़ीफी' आहेत. म्हणजे एक तर ती अल्लाहने ठेवली आहेत किंवा त्याच्या प्रेषिताने. कित्येक सूरहची एकापेक्षा अधिक नावेदेखील आहेत ज्यांना उम्मत (मुस्लिम समुदाय)च्या श्रेष्ठींनी सूरहच्या विषयाचे स्वरूप प्रकट करण्यासाठी स्वत: नंतर ठेवली आहेत. परंतु स्पष्ट आहे की या नावांचा दर्जा मूळ नावासारखा नाही. मूळ नाव तर तीच आहेत जी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडून उध्दृत केली गेली आहेत. विशेषत: प्रत्येक सूरहचे ते नाव जे सामान्यत: परिचित आहे आणि पवित्र कुरआनच्या प्रतीत लिहिले जात राहिले आहे निश्चितपणे याच प्रकारचे (तौक़ीफी) आहेत.

सूरहची नावे कोणत्या एकाच पध्दतीचे ठेवले गेले नाहीत, तर विभिन्न सूरहची नावे ठेवण्यासाठी विभिन्न पध्दतींचा अवलंब केला गेला आहे.

१) अनेक सूरहची नावे त्यांच्या सुरवातीच्या शब्दावरूनच ठेवली गेली आहेत. उदाहरणार्थ सूरह ताऽहाऽ, सूरह यासीन व सूरह क़ाफ़ वगैरे.

२) बरेचसे सूरह असे आहेत ज्यांची नावे ठेवण्यासाठी त्यांच्यातील एखाद्या ठळक शब्दाला घेतले आहे, उदाहरणार्थ सूरह बकरह, सूरह जुखरूफ व सूरह नमल वगैरे

३) काहींची नावे ठेवण्यासाठी असले शब्द निवडलेले आहेत जे सूरहच्या एखाद्या महत्त्वाच्या विषयाकडे संकेत करतात, उदाहरणार्थ, सूरह आले इम्रान व सूरह नूर वगैरे. काहीची नावे ठेवण्यापाठीमागे त्यांच्या चर्चेच्या मूळ विषयाला समोर ठेवले गेले आहे. उदाहरणार्थ, सूरह बरात व सूरह इख्लास वगैरे. नावे ठेवण्याच्या या विभिन्न पध्दती स्पष्ट आहे की अरबी रूचीप्रमाणेच अवलंबिली गेली होती.

सूरहच्या विस्तारात आपसात मोठा फरक आहे. एखादा सूरह इतका दीर्घ आहे की तो संपूर्ण कुरआनच्या बाराव्या तेराव्या भागापर्यंत विस्तारलेला आहे. तर एखादा इतका लहान आहे की तो दोन तीन संक्षिप्त वाक्ये व चौदा पंधरा शब्दापेक्षा जास्त नाही. परंतु लहान सूरह असण्याचा असा अर्थ कदापि नाही की त्यात वर्णित तत्त्वदेखील लहान आहे. वस्तुस्थिती अशी आहे की मोठ्या सूरहमध्ये सत्य-ज्योतीची जी किरणे एका विस्तृत क्षेत्रात पसरलेली आहेत तीच लहान सूरहमध्ये एका लहानशा क्षेत्रात सामावलेली आहेत. वस्तुत: या सूरहची स्थिती सारगर्भित सूक्तीप्रमाणे आहे. पुष्कळ धार्मिक दूरदर्शीपणाच्या बाबींची निकड अशीच होती की पवित्र कुरआनमध्ये काही लहान सूरहदेखील असावेत.

१) सर्वांत महत्त्वाचा दूरदर्शीपणा तर धर्माच्या मौलिक शिकवणी व त्याच्या मूळ चिंतनाला मनात सदैव ताजे ठेवण्याचा होता जी फार मोठी धार्मिक गरज होती. नि:संशय दीर्घ सूरहमध्ये केवळ या शिकवणी आहेत असेच नव्हे तर त्या संपूर्ण स्पष्टीकरण व आवश्यक प्रमाणासह आहेत. म्हणून त्या आठवणीत ठेवणारा या शिकवणी व चिंतनास आपल्या मनात सदैव ताजे ठेऊ शकतो. परंतु व्यावहारिकपणे व प्रत्यक्षपणे पाहिले तर असे लोक शेकड्यात काहीच आढळतील जे दीर्घ सूरह पाठ करणारे व त्यांना सातत्याने कंठस्थ ठेवणारे असतील. म्हणून आम मुस्लिमांना नजरेसमोर ठेवता हे आवश्यक होते की लहान लहान सूरहसुध्दा उतरविले जावेत ज्यात धर्माच्या मौलिक आदेशांचे वर्णन संक्षेपात असावे. जेणेकरून इस्लामी समाजातील कोणी एक व्यक्तीसुध्दा ते पाठ करणे आणि (कमीतकमी नमाजमध्ये अनिवार्यपणे) वारंवार त्यांची पुनरावृत्ती करीत राहणे आणि अशा प्रकारे धर्माच्या त्या मौलिक गोष्टी आपल्या मनात निरंतर ताज्या करीत राहण्याच्या सौभाग्यापासून वंचित राहता कामा नये. मग जर विचार केला तर ते थोडेसे लोकसुध्दा जे दीर्घ सूरह कंठस्थ ठेवणारे असतात. तेसुध्दा या आवश्यकतेपासून उदासीन दिसणार नाहीत. कारण मानवी मनाचा अभ्यास दर्शवितो की जर तपशील त्याच्यासाठी समाधानाचे कारण असेल तर त्याचबरोबर त्यांच्या लांब लचक विस्तारात तो बहुतेक स्वत: हरवून जातो. अर्थाच्या संपूर्ण क्रमाला आपल्या आवाक्यात आणू शकत नाही. त्याला या गोष्टीची गरज असते की हे अर्थ थोडक्या शब्दांतसुध्दा व्यक्त करून ते सुरक्षित केले जावेत.

थोडक्यात असे की आम व खास सर्वासाठी या गोष्टीची आवश्यकता होती की धर्माच्या मौलिक शिकवणीचे काही वाक्यांत व लहान लहान सूरहच्या रूपातसुध्दा वर्णन केले जावे. जेणेकरून त्या बुध्दी-पटलावर चित्रित व्हाव्यात. जिभांची त्यांच्या जपाने आपोआप हालचाल सुरू व्हावी. त्यांनी इस्लामी समाजात त्या उदाहरणांचे स्थान घ्यावे जी सामान्यपणे जिभेवर बसलेली आहेत. स्वीकृत मार्गदर्शक तथ्यांचे प्रतिनिधित्व करतात. स्पष्टपणे ही धर्म व धर्माच्या अनुयायींची एक अशी गरज होती जी सामयिक नव्हती तर ती चिरंतन होती.

२) दुसरी विशेष गरज प्रारंभिक काळात कुरआनच्या आवाहनाकडे आकृष्ट करण्याची होती. कारण त्या वेळी पवित्र कुरआनने आपल्या आवाहनाचा प्रारंभ केला होता. तेव्हा त्याचे श्रवण करण्याची स्वाभाविकपणे लोकांची तयारी नव्हती. अशी वस्तुस्थिती असल्यामुळे निकड अशी होती की या काळात ज्या गोष्टी सांगितल्या जात त्या एकीकडे तर उत्तम वर्णनशैलीत व मने हेलावून सोडणाऱ्या पध्दतीच्या असतील. दुसरीकडे सैध्दांतिक व स्पष्टसुध्दा असतील जेणेकरून उपेक्षा व तिरस्काराने पीडित हृदयापर्यंत त्यांचे शब्द

पोचावेत. मग जसजशी ही बेपर्वाई व अतत्परता कमी होत जाईल आणि लोक म्हणणे ऐकण्यास तयार होत जातील, तसतसे आवाहनात्मक संबोधनात विस्तार निर्माण होईल. जेव्हा तो क्षण येईल की दुर्लक्ष व अतत्परता, आवड व आकर्षणात बदलली असेल, तेव्हा धर्माचा तपशील ऐकविला जाईल. अल्लाहकडून दिव्य बोध निरंतर अवतरला जात रहावा. म्हणून पवित्र कुरआनचे लहान, मध्यम व दीर्घ सूरह सामान्यपणे स्थितीच्या याच निकडीमुळे उतरविले गेले आहेत. लहान सूरह बहुतेक याच काळात उतरलेले आहेत. जेव्हा कुरआनचे आवाहन आपल्या प्रारंभिक टप्प्यात होते आणि लोकांचे हृदय-पटल अद्याप त्याच्यासाठी खुले झाले नव्हते.

## आयत (वचन)

सूरहच्या विशिष्ठ लांबीच्या प्रमाणाच्या अंशांना, ज्यांची सीमा खुद्द महान अल्लाहकडून ठरविली गेली आहे, 'आयत' म्हटले गेले आहे. सूरहप्रमाणेच आयतींच्या विस्तार-मर्यादेतसुध्दा पुष्कळ फरक आहे. काही आयती एक-दोन शब्दांच्या आहेत तर काही आठ-दहा आणि काही पंधरा-वीस शब्दांच्या व काही तर त्यांच्यापेक्षाही अधिक शब्दांच्या आहेत. हे आवश्यक नाही की प्रत्येक आयत एक पूर्ण वाक्य असावी. बहुतेक आयती अशाच प्रकारच्या आहेत तर बऱ्याचशा अशासुध्दा आहेत की त्यांच्यापैकी कित्येकांच्या मिलनाने वाक्य पूर्ण होते. अशाच प्रकारे याच्या उलट कित्येक आयती अशासुध्दा आहेत ज्यांच्यापैकी प्रत्येक एकापेक्षा जास्त वाक्यांची आहे. याचे कारण असे आहे की आयतीची लांबी ठरवितांना वाक्य पूर्ण होण्याच्या तत्त्वाला नव्हे तर यमक-व्यवस्थेला प्राधान्य देण्यात आले आहे. ज्यांच्या मागे दोन महत्त्वाचे हेतु होते. एक तर असे की मजकूर यमकयुक्त असणे अरबी साहित्याच्या सौंदर्यात समाविष्ट होते आणि अरबस्तानवासीयांना याची फार आवड होती. दुसरे असे की पवित्र कुरआन कंठस्थ करण्यात ही गोष्ट मोठी सहाय्यक होती. काव्याच्या दोन ओळीप्रमाणेच यमकयुक्त मजकूरसुध्दा मानवी स्मरण शक्ती किती सहजपणे आपल्या आवाक्यात आणते याचा अनुभव प्रत्येक सुशिक्षित माणसाला आहे. म्हणून पवित्र कुरआन, त्याच्या रक्षणासाठीसुध्दा व त्याच्या अनुयायींच्या व्यावहारिक आवश्यकतेच्या दृष्टीनेसुध्दा, ज्याप्रकारे व्यापक प्रमाणावर पाठ केला जाणे आवश्यक होते, त्याची स्पष्ट निकड होती की त्याचे मजकुर यमकयुक्त असावेत.

'आयत' (वचन) याचा शाब्दिक अर्थ निशाणी व चिन्ह आहे. म्हणजे ती स्पष्ट गोष्ट जी एखाद्या लपलेल्या सत्याकडे निर्देश करते तिला अरबी भाषेत 'आयत' म्हटले जाते. शब्द 'आयत'च्या या मूळ अर्थाला समोर ठेऊन जर विचार केला तर पवित्र

कुरआनच्या आयतीना आयत म्हटले जाण्याची कारणे बऱ्याच प्रमाणात लक्षात येतील. उदाहरणार्थ

१) पवित्र कुरआनच्या आयती (वचने) एका चमत्कारिक वाणीचे अंश असल्यामुळे तो ईशवाणी असल्याचे चिन्ह व प्रमाण आहेत म्हणून त्यांचा 'आयत' या शब्दाने उल्लेख केला गेला.

२) पवित्र कुरआनच्या आयती स्वत:च मार्गदर्शन आहेत, कारण त्यांच्यापासून महान अल्लाहच्या गुणांचे व त्याच्या आज्ञा व आदेशांचे ज्ञान प्राप्त होते. म्हणूनदेखील त्यांना 'आयत' म्हटले गेले.

३) पवित्र कुरआनच्या शिकवणींचा पाया आज्ञा व श्रध्देच्या जबरदस्तीवर आधारित नाही, तर चिंतन व प्रमाणावर आधारित आहे. आणि त्याच्या आज्ञा तर्कपूर्ण चर्चा म्हणून आहेत. जणू पवित्र कुरआन केवळ आज्ञा व आदेशांचेच नाव नव्हे तर पुरावे व प्रमाणांचेसुध्दा नाव आहे. म्हणूनदेखील त्याच्या अंशाना आयत म्हटले गेले ( जेणेकरून त्याचा हा गुण दृष्टीआड होऊ नये).

पवित्र कुरआनच्या आयतीचे आपल्या अवतरलेल्या काळानुसार, दोन प्रकार आहेत - मक्की व मदनी. त्या आयतीना मक्की म्हटले जाते ज्या [(प्रेषित मुहम्मद (स.) यांचे मक्का शहर सोडून मदीनेला जाणे) पूर्वी अवतरली गेली होती, मग त्या मक्केत अवतरल्या गेल्या असोत किंवा एखाद्या अन्य ठिकाणी. त्या आयतीना 'मदनी असे म्हटले जाते ज्या नंतर उतरविल्या गेल्या होत्या. मग त्या मदीनेत अवतरल्या गेल्या असोत किंवा मदीन्या बाहेर एखाद्या अन्य स्थळी.

## पारे व रूकूअ

संपूर्ण कुरआनबरोबर तीस भागांत व पुन्हा प्रत्येक भाग अधिक लहान लहान भागात विभाजित केला गेला आहे. पहिल्या प्रकारच्या भागांना 'अंश' किंवा 'पारे' आणि दुसऱ्या प्रकारच्या भागांना 'रुकूअ' असे म्हणतात. ही विभाजने तौफ़ीक़ी (अल्लाहने किंवा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी केलेली) नाहीत. ती तौफ़ीक़ी असणे तर लांबचीच गोष्ट, प्रेषितत्वाच्या काळात, येथपावेतो की प्रारंभिक खलीफांच्या काळातसुध्दा, ती अस्तित्वात नव्हती. तर त्यानंतरच्या काळातील आहे. पाऱ्यांचे विभाजन हज्जाज बिन यूसुफ यांच्या राज्यपाल-कारकीर्दीत (हिजरी सन ७३ ते ९५) झाले आणि रूकूअचे विभाजन आणखी पुढे जाऊन केले गेले. हेच कारण आहे की या विभाजनाला काही विशेष आणि इस्लामी

धर्म कायद्यानुसार महत्त्व प्राप्त नाही. म्हणून पवित्र कुरआनच्या प्रतीत अमुक पारा (जुज्व) किंवा अमुक रुकूअचे शब्द मूळ पाठाच्या दरम्यान लिहिले जात नाही, तर समासात नोंद केली जाते. जेणेकरून कोणाचाही ते तौफ़ीक़ी असल्याचा गैरसमज होऊ नये.

त्या दूरदर्शीपणाच्या गोष्टी की ज्यांच्यासाठी हे विभाजन केले गेले होते, अशा आहेत की ज्यांच्यामुळे आम लोकांना पवित्र कुरआनचे पठन करणे व तो कंठस्थ करण्यात काही सुकरपणा सोपेपणा प्राप्त होईल, काही मार्गदर्शन प्राप्त होईल जसे की पुढे तपशीलावरून स्पष्ट होईल.

१) पाऱ्यांचे विभाजन महिन्यांचे दिवस समोर ठेऊन केले गेले आहे. याच्या पाठीमागे मूलत: या आवश्यकतेची भावना होती की मुस्लिमासाठी आपल्या धर्माशी आपला संबंध जिवंत व जागृत ठेवणे सदैव आवश्यक आहे. त्याचा सर्वांत महत्त्वाचा व प्रधान उपाय, स्पष्टपणे, असा आहे की त्याने संपूर्ण कुरआनचे पठन करीत राहावे. आता हा प्रश्न उभा राहतो की या पठनासंबंधी सामान्य लोकांची काय पध्दत असावी? त्यानी पवित्र कुरआनचे पठन किती करावे? धर्माच्या ज्या सेवकांनी पाऱ्यांचे विभाजन केले आहे, त्यांच्या मनात याचे उत्तर असे आहे की संपूर्ण कुरआनच्या पठनासाठी एक महिन्याची मुदत मध्यम व योग्य ठरेल आणि सामान्यपणे लोकांनी त्याचा तिसावा भाग पठन करीत राहावे. या विचाराने त्यांनी पवित्र कुरआनला तीस समान भागात विभाजित केले, जेणेकरून लोकांना दररोज पठनासाठी प्रमाण निश्चित करण्याचा त्रास होऊ नये. या बाबतीत त्यांनी संभवत: त्या हदीसापासून (पैगंबरांच्या वचनापासून) मार्गदर्शन प्राप्त केले ज्यात संपूर्ण कुरआन एका महिन्यात पठन करण्याचा उल्लेख आहे. उदाहरणार्थ सही बुखारी (हदीस-ग्रंथाचे नाव) ची ती हदीस जी अगोदरच्या पृष्ठावर नमूद केली गेली आहे आणि ज्यात असा मजकूर आहे की 'जिब्रईल (अ.) प्रेषित मुहम्मद (स.) यांना रमजानच्या पूर्ण महिनाभर रात्री येऊन भेटत असत आणि या भेटीत प्रेषित मुहम्मद (स.) त्यांना पवित्र कुरआन ऐकवीत असत.' या हदीस वरून अशी कल्पना केली जाऊ शकते की पवित्र कुरआन एका महिन्यात पूर्ण करणे ही योग्य व पसंत केलेली गोष्ट असेल. अशाचप्रकारे बुखारीचीच ती हदीस ज्यात अब्दुल्लाह बिन उम्र (रज़ि.) यांना पैगंबर (स.) यांनी दिलेला स्पष्ट आदेश आढळतो,

'कुरआनचे पठन एका महिन्यात पूर्ण करीत जा.'

पैगंबरांच्या या आदेशाने तर स्पष्टपणे असे कळते की आम मुस्लिमासाठी कुरआन पठन करण्याची हीच पध्दत प्रेषित मुहम्मद (स.) यांनी पसंत केलेली पध्दत होय.

अब्दुल्लाह बिन उम्र (रजि.) यांनी जरी आपल्या असामान्य आवडीमुळे व पठनशक्तीचा उल्लेख करून अंततः प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडून संपूर्ण कुरआन एका सप्ताहात पठन करून पूर्ण करण्याची परवानगी प्राप्त केली होती. परंतु स्पष्ट गोष्ट अशी आहे की ही एक विशेष परवानगी होती जी त्यांनी वारंवार आग्रह करून प्राप्त केली होती. नाहीतर सुरवातीला त्यांना असाच आदेश होता की पवित्र कुरआनचे एका महिन्यात पठन करीत जा.

या हदीसींचा विचार करता असे स्पष्ट होते की हा विचार पैगंबरांच्या अगदी इच्छेप्रमाणे होता की लोकांना पवित्र कुरआनचे पठन साधारणपणे तीस दिवसांत पूर्ण करण्याचा सल्ला दिला जावा.

ही गोष्ट समोर आल्यानंतर संपूर्ण कुरआनला समान तीस भागात (पारे) विभाजित करण्याचे पाऊल वास्तविकतः प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या इच्छेचीच एकप्रकारे पूर्तता होती.

या बाबतीत या स्पष्टीकरणाची काही विशेष गरज नाही की हे विभाजन केवळ परिमाणात्मक विभाजन आहे आणि यात काही अर्थपूर्णता अथवा अनुकूलता व संपर्काचा शोध अगदी निष्फळच नव्हे तर निष्कारणसुध्दा असेल. म्हणून या विभाजनात आपणास काही जागी असेदेखील दिसेल की पारा तर समाप्त झालेला आहे. परंतु अगोदरपासून सुरू असलेला विषय अद्याप समाप्त झालेला नाही आणि त्याच्या उरलेल्या भागाने पुढील पाऱ्याचा प्रारंभ होत आहे.

**२)** रुकूअचे निर्धारण व विभाजनाच्या पाठीमागेदेखील काही अशाच प्रकारचा विवेक कार्यरत होता जसा की पाऱ्यांच्या विभाजना पाठीमागे होता. म्हणजे असे की आयतींच्या दरम्यान अशा स्थळांची निवड केली जावी जेथे कुरआन-पठनाचा क्रम समाप्त केल्याने कसलाही अव्यस्थितपणा आणि दोष निर्माण होत नसेल अशा स्थळ-निवडीची गरज अशासाठी भासली की कुरआनच्या अर्थापासून अनभिज्ञ असलेले लोक स्वतःच याचे निर्धारण करू शकत नव्हते. कारण ज्याला आयतींचा अर्थच माहीत नसेल तो हे कसे जाणू शकतो की पठनाचा क्रम कोणत्या ठिकाणी समाप्त करणे योग्य ठरेल व कोणत्या ठिकाणी अयोग्य? तो तर अनिवार्यपणे अशा ठिकाणीसुध्दा आपले पठन बंद करू शकतो जेथे विषय अगदीच अपूर्ण राहिलेला असेल. स्पष्ट आहे की ही मोठी अडाणीपणाची व अप्रिय कृती ठरेल. मग विवशता व अज्ञानाच्या या अडाणीपणापासून लोकांना वाचविण्याची एकच पध्दत होती आणि ती हीच की कुरआनमध्ये अशा ठिकाणांचे निर्धारण केले जावे जेथे जर पठन समाप्त केले गेले तर एखादा अशा प्रकारचा दोष निर्माण होऊ नये.

परंतु रुकूअच्या या निर्धारणाच्या बाबतीत आणखी एक गोष्ट लक्षात ठेवली गेली आहे आणि ती अशी की हे निर्धारण त्या प्रत्येक ठिकाणी केले गेले नाही की जेथे पठनाचा क्रम खरोखर समाप्त केला जाऊ शकतो. तर त्याचबरोबर आयतीच्या एका योग्य संख्येचादेखील विचार ठेवला गेला आहे. पारा सामान्यत: पंधरा वीस रुकूअमध्ये विभाजितत केला गेला आहे. आणि एका रुकूअमध्ये मध्यम लांबीच्या आठ दहा आयती ठेवल्या गेल्या आहेत. लहान आयतींची संख्या लांबीप्रमाणे अधिक व दीर्घ आयतींची कमी आहे. सदर निर्धारण व स्थान निश्चितीच्या बाबतीत आयतींच्या एका योग्य संख्येचा हा विचार मुळात नमाज डोळ्यांसमोर ठेऊन केला गेला आहे. ज्यात प्रत्येक व्यक्तीला थोडे का असेना कुरआनचे पठन करावेच लागते. जणू रुकूअंच्या निर्धारणात ही गोष्ट सुद्धा दृष्टीसमोर ठेवली गेली आहे की हे निर्धारण कुरआनच्या इतक्या भागानंतर असावे जितके की एका रकअतमध्ये सामान्यत: पठन केले जाते अथवा पठन केले जावे. म्हणूनच आयतींच्या या संग्रहाचे नाव 'रुकूअ' ठेवले गेले कारण नमाजमध्ये 'रुकूअ' (वाकणे), क़ियाम (उभे राहणे) कुरआन-पठनानंतर असते. म्हणून हे नाव या गोष्टीकडे संकेत करणारे आहे की जर इच्छा असेल तर पवित्र कुरआनच्या इतक्या भागाचे पठन केल्यानंतर 'कियाम' संपवून रुकूअमध्ये जा.

# महत्त्वपूर्ण पारिभाषिक शब्द

प्रत्येक धार्मिक ग्रंथप्रमाणे पवित्र कुरआनचीदेखील एक विशिष्ट भाषा आणि काही विशिष्ट पारिभाषिक शब्द आहेत. कुरआनचे आवाहन व शिकवणी समजण्याच्या बाबतीत त्यांचे मौलिक महत्त्व आहे. कोणतीही व्यक्ती कुरआनशी थोडीदेखील परिचित होऊ शकत नाही जर अगोदर त्याच्या पारिभाषिक शब्दांचे अर्थ समजून घेतले नसतील. म्हणून पवित्र कुरआनचा परिचयदेखील यावर अवलंबून आहे की कमीतकमी महत्त्वाचे आणि विशेष पारिभाषिक शब्दांचे आवश्यक तितके स्पष्टीकरण समोर यावे.

## अल्लाह

पवित्र कुरआनचा सर्वांत महत्त्वाचा व सर्वांत मौलिक पारिभाषिक शब्द 'अल्लाह' आहे, म्हणून सर्वप्रथम त्याचाच अर्थ समजून घेतला पाहिजे.

शब्द 'अल्लाह' मुळात 'अलइलाह' होता, जो अधिक प्रयोगाने थोडयाशा परिवर्तनानंतर 'अल्लाह' बनला. 'अलइलाह'मध्ये मूळ शब्द केवळ 'इलाह' आहे आणि त्याच्यापूर्वी 'अल'चा जो अंश आहे तो अरबी भाषेतील प्रत्यय आहे जो एखाद्या सामान्य नामाला विशेष नाम बनविण्यासाठी सुरवातीला जोडला जातो, ज्याप्रमाणे की इंग्रजीत ऊप चा प्रयोग आहे. म्हणून 'अल इलाह'चा अर्थ झाला 'निश्चित व निर्धारित इलाह. 'इलाह'चा अर्थ आहे 'उपास्य'. हा शब्द 'अलिफ लाम हा'च्या त्रिअक्षरी धातुपासून बनला आहे. ज्याच्यापासून बनलेल्या क्रियापदांचे अर्थ असे — १) चकित होणे, २) एखाद्याच्या आश्रयाला जाऊन अथवा त्याच्याशी संबंध प्रस्थापित करून शांती व समाधान प्राप्त करणे, ३) एखाद्याकडे पूर्ण आवडीने धाव घेणे, ४) लपणे, ५) उंच होणे, ६) पूजा करणे - या विभिन्न अर्थात परकेपणा व सामंजस्यहीनता नाही तर सखोल स्वाभाविक संपर्क आहे जो विचार व चिंतनानंतर अगदी स्पष्ट होतो. 'इलाह' या शब्दाचा प्रयोग उपास्यासाठी जेव्हा अरबस्तानातील लोकांनी केला तेव्हा त्यात या सर्व अर्थांचा समावेश होता. म्हणजे त्यांच्यात 'इलाह' त्या व्यक्तिमत्त्वाला म्हटले जात असे जे मानवतेवर गुण बाळगत असावे. ज्याची वास्तविकता व श्रेष्ठत्वाचे ज्ञान प्राप्त करण्यास मानवी बुद्धि असमर्थ ठरते, ज्याचे व्यक्तित्व व गुणांचा विचार केल्यास परिणाम म्हणून आश्चर्यापलीकडे काहीही प्राप्ती होत नाही. तो दुसऱ्यांचा आश्रयदाता असावा, सर्वांचा प्रिय व सर्वांना हवासा वाटावा, दुसऱ्यांची गरज भागविणारा असावा, सत्ताधीश असावा, वैभवशाली असावा. त्याच्यापर्यंत बाह्येंद्रियांची पोचसुद्धा शक्य नसावी, आणि तो सर्वगुणसंपन्न असल्यामुळे याची पूजा करण्यास तो योग्य असावा. त्याच्या कोपचे भय वाटावे. परंतु हा पूर्ण इलाहचा

अर्थ होता. ज्याअर्थी त्यांचे 'इलाह' व उपास्य एक-दोन नव्हते तर असंख्य होते. ते एकापेक्षा अधिक उपास्यांना मानत असल्यामुळे हे शक्य नव्हते की त्यांनी सर्वांना त्या सर्व गुणांचे संग्रह समजावे. म्हणून जेव्हा ते हा शब्द 'इलाह' बोलत तेव्हा प्रत्येक प्रसंगी त्याचा अगदी बरोबर एकच अर्थ घेत नसत. तर ते तो शब्द एखाद्या अशा व्यक्तीसाठी लागू करीत असत जी वर उल्लेख केलेल्या सर्व गुणांचा संच असे. त्याबरोबरच ते अशा व्यक्तींनादेखील हा शब्द लागू करीत असत जे त्यांच्या विचाराप्रमाणे केवळ काही मोजक्याच गुणांचे स्वामी असत. अशा प्रकारेही वस्तुस्थिती कळली की अरबस्थान निवासियांप्रमाणे 'इलाह'चा अर्थ अशा प्रत्येक व्यक्तीला लागू होत असे जिच्यात वर उल्लेखिलेल्या गुणापैकी काही अथवा सर्व गुण असावेत. या आधारे ती उपासना करण्यास पात्रसुद्धा असावी, जर ती व्यक्ति ते सर्वगुणसंपन्न असेल तर ती पूर्ण इलाह आहे, नाहीतर तुलनेने निम्न स्तराचे काल्पनिक उपास्य.

'इलाह' शब्दाच्या या अर्थाला जर समोर ठेवले तर 'अल्लाह' (म्हणजे अलइलाह) चा अर्थ प्रकटपणे एखादी अशी विशेष व नेमस्त व्यक्ती होईल ज्यात वर उल्लेख असेल. सर्व गुण अथवा त्यांचा कोणताही अंश असेल, परंतु वास्तविकता अशी नाही, अरब लोकांत 'अल्लाह'चा अर्थ केवळ इतकाच नव्हता तर त्याच्यापेक्षा उच्च होता. ते 'अल्लाह' त्या विशेष सत्तेला सांगत असत ज्याच्यासंबंधी त्यांची श्रद्धा अशी होती की तो या सर्व गुणांनी संपन्न आहे. त्यांच्याशिवाय अन्य सर्व पूर्णता-प्राप्त गुण, उदाहरणार्थ, सृजन-शक्ती, पालन-शक्ती, उपजीवन देण्याची शक्ती आणि प्रशासन-शक्ति वगैरेंचादेखील स्वामी आहे. की जेव्हा आपल्या दुसऱ्या उपास्यांच्या बाबतीत त्यांची श्रद्धा अशी होती की त्यांच्यापैकी कोणीही असा नाही ज्यात हे सर्व गुण असतील किंवा ज्यात आढळणारा एखादा गुणदेखील अगदी अशाच प्रकारचा व दर्जाचा असावा की अल्लाहमध्ये आढळणाऱ्या त्या गुणाचा आहे. 'अल्लाह' व दुसऱ्या उपास्यांच्या बाबतीत त्यांच्या त्या श्रद्धा व विचारांचे सविस्तर प्रमाण पवित्र कुरआनमध्येसुद्धा आहे आणि प्राचीन अरबी साहित्यातसुद्धा आहे.

येथपर्यंत येऊन ही गोष्ट आपोआप लक्षात येते की अरब लोकांत असंख्य उपास्यांपैकी (ईश्वरांपैकी) केवळ याच विशिष्ट इलाहला 'अल्लाह' (अलइलाह) का म्हटले जाऊ लागले? असे का घडले की हा शब्द जो मुळात विशेषण होता आणि त्यांच्या प्रत्येक उपास्यासाठी प्रयुक्त होत होता तो केवळ याच एका सत्तेसाठी विशिष्ट झाला आणि त्याचे विशेषनाम ठरला? जोपर्यंत त्यांची श्रद्धा अशी होती की केवळ एकच सत्ता आहे जी सर्वगुणसंपन्न आहे आणि दुसऱ्या सर्व उपास्यापैकी कोणीही ईश्वर बनण्याचे पूर्णत्वाचे वैभव त्यात नाही. तेव्हा यात स्वाभाविक होते की त्यांच्या दृष्टीत ती सत्ता 'इलाह'च्या

प्रयोगाची प्रथम अधिकारी ठरते. हा शब्द इलाह ऐकून त्यांचे मन सर्वप्रथम त्याच्यांचकडे आकृष्ट होते. वास्तविकता तर अशी आहे की खरा इलाह व उपास्य त्यांनी त्यालाच समजले होते. त्याचा स्वाभाविक परिणाम असा झाला की त्यांनी जेथे आपल्या दुसऱ्या उपास्यांची वेगवेगळी स्थायी नावे ठेवली. त्यांनी ते ओळखले जात होते व त्यांचे स्मरण केले जात होते. तेथे या विशेष उपास्याचे त्यांनी एखादे वेगळे नाव ठेवले नसते तर त्याच 'इलाह' शब्दाला जो मुळात गुण होता, विशेष (अल) या चिन्हासह त्याचे नाव निश्चित केले असते. जेणेकरुन अशा प्रकारे त्याच्या उपास्य असण्याच्या विशेष, व्यक्तिगत व उच्चतर स्थितीची अभिव्यक्ती व्हावी. हे स्पष्ट आहे की 'इलाह' व उपास्य होण्याचा सर्वांत अधिकच नव्हे तर वास्तविक अधिकार त्याच सत्तेला प्राप्त आहे. एखाद्या अनुपम ग्रंथाचे नाव 'अल किताब' व एखाद्या अद्वितीय शिक्षकाचे 'अल मुआल्लिम' असे ठेवले जाते. तसेच अरबस्थानात नाव ठेवण्याची ही एक सर्वमान्य पद्धत होती आणि त्यानुसारच त्यांनी आपल्या त्या विशेष उपास्य व इलाहचे नाव 'अलइलाह' असे ठेवले. त्याशिवाय आपल्या भाषिक नियमानुसार त्यातून 'इलाह'चा 'इ' (अलिफ) गाळला कारण अशा शब्दाला त्यांची भाषिक रुची हलक्यात हलका व जिभेने सहजपणे उच्चार होणारा शब्द देऊ इच्छित होती की त्याचा विपुल प्रमाणात प्रयोग व्हावा आणि ज्याचे नाव वारंवार जिभेवर यावे. अशा प्रकारे 'अलइलाह' बदलून 'अल्लाह' झाला.

अरब लोकानुसार असा होता 'इलाह' व 'अल्लाह'चा पारिभाषिक अर्थ. जेव्हा पवित्र कुरआन अवतरला गेला तेव्हा ज्याअर्थी त्याचे संबोधित जन अरबच होते. त्याच्यामुळे त्याची भाषादेखील अरबी राहिली आणि त्याला सांगावयाचे होते त्याच भाषेतील शब्द व वाक्प्रचारमध्ये सांगावयाचे होते, म्हणून सृष्टीचे सृजन करणाऱ्या निर्मात्या व पालनकर्त्याला सुद्धा स्वाभाविकपणे अल्लाह याच नावाने संबोधिले जो अरब लोकांत प्रचलित होता. अशाच प्रकारे 'इलाह' या पारिभाषिक शब्दाचादेखील त्याने प्रयोग केला, परंतु या दोन्ही पारिभाषिक शब्दांना त्याने अगदी त्याच अर्थ व कल्पनासह घेतले नाही जो अरब लोकांच्या कल्पनेत होते, तर काही महत्त्वाच्या सुधारणा व मौलिक संशोधनसह घेतले.

**१)** सर्वांत महत्त्वाची सुधारणा व मौलिक संशोधन तर त्याने असे केले की 'इलाह' व 'अल्लाह' असण्याच्या सर्व गुणांना त्याने केवळ अल्लाहसाठीच विशेष ठरविले. त्याने सांगितले की कोणत्याही दुसऱ्या शक्तीमध्ये, मग ती कितीही मोठी का असेना, उपास्याचा एखादाही गुण नाही. म्हणून तुम्ही 'इलाह' म्हणा किंवा 'अलइलाह' आणि 'अल्लाह' म्हणा याचा अर्थ वास्तविकत: तीच एक सत्ता असेल, याच एका सत्तेसाठी हे शब्द प्रयुक्त होऊ शकतात आणि झाले पाहिजेत. दुसरी कोणतीही सत्ता या शब्दाने संबोधिली जाण्यास

पात्र नाही. नि:संशय त्याने आपल्या वाणीत जागोजाग 'इलाह' शब्दाचा त्या अर्थानेदेखील प्रयोग केला आहे जो अरबात प्रचलित होता. परंतु स्पष्ट आहे की हे त्यांच्या श्रद्धेची नक्कल व परंपरा म्हणून आहे. आपल्या स्वत:च्या श्रद्धेचे प्रकटन म्हणून नव्हे.

**२)** दुसरी मोठी मौलिक सुधारणा त्याने अशी केली की त्या विशेष नाम 'अल्लाह'बरोबर अरब लोक ज्या चांगल्या गुणांना जोडत असत ते सर्व त्यांच्या दृष्टीने उत्कर्ष-बिंदूपर्यंत पोचले होते. पण त्याने त्यांना अपूर्ण ठरवित सांगितले की तुमच्या अल्प बुद्धीने 'उपास्य' असण्याचे जे सर्वोच्च स्थान गृहित धरले आहे वास्तविकत: त्याच्या स्वत:मध्ये बऱ्याचशा पतनाच्या गोष्टीदेखील आहेत आणि श्रेष्ठतम गुणासंबंधी तुमची कल्पना चुकीची व अपूर्ण आहे. 'अल्लाह'चे गुण असे आहेत व त्याचे स्थान हे आहे.

'अल्लाह'च्या सत्तेला पवित्र कुरआनने ज्या गुणांनी विभूषित केले आहे ते संख्येत फार आहेत. थोडक्यात असे समजा की कोणताही गुण असा नाही की त्याच्यात नसेल. त्यांच्यापैकी काही गुण असे आहेत.

१) तो आणि केवळ तोच अनंत काळापासून आहे आणि सदैव राहील.

'अल्लाहशिवाय कोणीहि इलाह नाही, हय्य (अमर) क़य्यूम (सदैव राहणारा)' *(सूरतुलबक़रह)*

२) त्याला शरीर नाही आणि शरीर असण्यापासून तो पूर्णपणे मुक्त व उच्चतर आहे. *(सूरतुलकसस)*

३) डोळे त्याला पाहू शकत नाहीत. *(सूरतुलअनआम)*

४) त्याच्यासारखी कोणतीही वस्तु नाही. *(सूरतुश्सूरा)*

(तो कदापि कोणतीही शारीरिक आकृती धारण करीत नाही. तो कोणत्याही द्रव्याशी एकरूप होत नाही की एखाद्या वस्तूशी संयोगही करीत नाही).

५) वास्तविकत: इन्कार केला त्यांनी, ज्यांनी सांगितले, अल्लाह तर मरयम-पुत्र मसीह आहे. *(सूरतुल माइदह)*

६) तो प्रत्येक वस्तु निर्माण करणारा आहे आणि संपूर्ण सृष्टि त्याचीच रचना आहे. त्यानेच प्रत्येक वस्तु निर्माण केली आहे. *(सूरतुल अनआम)*

७) तो कोणाचा बापाही नाही आणि मुलगाही नाही. *(सूरह इख्लास)*

८) संपूर्ण सृष्टीची शासन - सत्ता प्रत्यक्षपणे त्याच्याच हातात आहे. *(सूरहयासीऽन)*

९) आकाशापासून पृथ्वीपर्यंत संपूर्ण सृष्टीची व्यवस्था तोच चालवितो. *(सूरह सजदा)*

१०) तो सर्वांचा अन्नदाता व पालनकर्ता आहे. आकाश व पृथ्वी आणि त्या दरम्यान जे

काही आहे, सर्वांचा पालनकर्ता आहे. *(सूरतुस्स्वाफ़्फात)*

११) जीवन व मृत्यु दोघांचा निर्माण करणारा तोच आहे. *(सूरतुलमुल्क)*

१२) तोच जीवन प्रदान करतो आणि मृत्यु देतो. *(सूरतुन्नज्म)*

१३) सर्वांना अभयदान व आश्रय देणारा आहे. *(सूरतुलहक्ष)*

१४) तो सर्व गोष्टी जाणणारा आहे. *(सूरतुल बकरह)*

१५) झाकलेल्या व लपलेल्या, घडलेल्या व घडणाऱ्या सर्व गोष्टी तो जाणतो. *(सूरतुल हश्र)*

१६) तो सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. *(सूरतुल अनआम)*

१७) निस्संदेह अल्लाह सर्वशक्तिमान आहे. *(सूरतुल बकरह)*

१८) सर्वावर प्रभावी आहे आणि कोणीही त्याच्या निर्णयाला अथवा आज्ञेला आव्हान देऊ शकत नाही. 'प्रभुत्वशाली, प्रभावशाली, अत्यंत महान'. *(सूरतुल हश्र)*

१९) तो तत्त्वदर्शी आहे. त्याचे कोणते ही कार्य तत्त्वदर्शिताशून्य व उद्देशरहित असत नाही. 'आणि तो तत्त्वदर्शी आहे सर्वकाही जाणणारा'. *(सूरतुस्सबा)*

२०) 'अति कृपावान व मोठा दयावान आहे.' *(सूरतुल फातिहा)*

२१) प्रेम व स्नेह त्याची रीत आहे. *(सूरतुल बक़रह)*

२२) त्याची कृपा व मेहेरबानी कणा-कणावर आच्छादिलेली आहे. *(सूरतुल अअसफ)*

२३) न्यायी आहे, लोकांशी पूर्णपणे न्यायाचा व्यवहार करतो. *(सूरह युनूस)*

'जेणे करुन त्याने न्यायपूर्ण मोबदला द्यावा त्या लोकांना ज्यांनी ईमान आणले व ज्यांनी पुण्य-कार्य केले.

२४) कोणावर कणभरदेखील अत्याचार करीत नाही. *(सूरह काऽफ)*

२५) त्याचे आदेश व आज्ञा सर्वच्या सर्व पूर्णपणे न्याय्य असतात. *(सूरतुल अनआम)*

२६) अवज्ञाकारी व शिरजोरांवर सूड उगविणारा आहे आणि अल्लाहशक्तिमान व सूड घेणारा आहे. *(सूरह आले इमरान)*

२७) माफी मागणाऱ्यांना माफ करीत असतो. 'आणि तो माफ करणारा व दया करणारा आहे.' *(सूरतुलबुरूज)*

२८) आणि मोठा क्षमा याचना स्वीकारणारा आहे. *(सूरतुन्नस्त्र)*

'निस्संदेह तो फार अधिक क्षमा याचना स्वीकारणारा आहे.

२९) पुण्य-कर्मांची कदर करणारा आहे. *(सूरतुत्तगाबुन)*

'आणि अल्लाह कदर करणारा आहे'.

३०) जे करू इच्छितो ते करून टाकतो. *(सूरतुलबुरूज)*

'करतो, जे कांही इच्छितो.'.

३१) बोलणारा आहे. *(सूरतुल बक़रह)*

'आणि त्यांच्यात कांही असेही आहेत, ज्यांच्याशी अल्लाहने वार्तालाप केला.'

३२) जे इच्छितो ते करतो. *(सूरह आले इमरान)*

'असेच अल्लाह जे इच्छितो ते करतो.'

३३) आणि जे काही इच्छितो केवळ तेच प्रत्यक्षात येऊ शकते, येथपावेतो की त्याच्या इच्छेविना कोणीही स्वत: काही इच्छाही करू शकत नाही. *(सूरतुद्दहर)*

'अल्लाहने इच्छा केल्याशिवाय तुम्ही इच्छा करू शकत नाही.'

३४) श्रीमंत आहे, प्रत्येक गोष्टीपासून बेपर्वा आहे. त्याला कोणत्याही वस्तूची गरज नाही. *(सूरतुलफ़ातिर)*

३५) स्वत: स्तुत्य आणि गुणांचा योग आहे. *(सूरह हूद)*

'नि:संशय तो स्तुत्य आणि गुणांचा मेळ आहे'.

३६) प्रत्येक दोषापासून मुक्त आणि प्रत्येक नैपुण्य धारण करणारा आहे. त्याच्यात कोणतीही गोष्ट अशी आढळत नाही जी 'इलाह' असण्याच्या वैभवास साजेशी नसावी. 'सर्व-शासक, अत्यंत गुणवान, शांती स्वरूप' *(सूरह हश्र)*

३७) तो सर्वप्रकारे अनुपम आहे, त्याला कोणत्याही वस्तूची उपमा दिली जाऊ शकत नाही. *(सूरतुश्सूरा)*

'त्याच्या समान कोणतीही वस्तु नाही'?

३८) पृथ्वी व आकाशातील कोणत्याही गोष्टीवरून त्याचा अनुमान केला जाऊ शकत नाही. 'आकाश व पृथ्वीवर त्याचे उदाहरण सर्वोच्च आहे.' *(सूरतुर्रूम)*

३९) उपास्य केवळ तोच आहे. *(सूरतुलबक़रह)*

'त्याच्याशिवाय कोणीही इलाह (उपास्य) नाही.

४०) संपूर्ण सृष्टीवर केवळ त्याचीच महानता चालते *(सूरतुलजासियह)*

'त्याचीच महानता आहे आकाश व पृथ्वी तलावर.

४१) आणि त्याच्याशिवाय कोणीही नाही की ज्यात या उपास्य होण्याचा व महान

असण्याच्या गुणाचा लेशमात्रदेखील आढळत असावा, सर्वच्या सर्व लाचार आणि शासित आहेत, आणि त्याचेच गुलाम व सेवक आहेत. *(सूरतुर्रूम)*

४२) मग असेही नाही की तो आपल्या गुलामांच्या व सेवकांच्यापैकी एखाद्याला जवळिकीची महत्ता प्रदान करून आपल्या सम्प्रभुत्वात भागीदार करून घेत असेल. त्याच्या प्रभुत्वात कोणीही भागीदार नाही. *(सूरतुलकहफ)*

अल्लाहच्या अस्तित्व व गुणांच्या बाबतीत या स्पष्टीकरणानंतर या प्रश्नाशी संबंधित काही गोष्टी आणखीसुद्धा आहेत ज्यांची माहिती करून घेणे आवश्यक आहे.

**१)** जेथपर्यंत अल्लाहच्या अस्तित्वाचा संबंध आहे, तेथपर्यंत त्याच्या वास्तविकतेपर्यंत मानवी चिंतनाची मजल असणे शक्य नाही. म्हणून त्याला केवळ त्याच्या गुणानेच ओळखले जाऊ शकते, ज्यांच्या दर्शनाने ही संपूर्ण सृष्टी भरलेली आहे आणि तेथे जे काही आहे ते सर्वच्या सर्व कोणत्या ना कोणत्या गुणाचेच प्रतीक आहे. म्हणून हेच कारण आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी असा आदेश दिला आहे,

*'अल्लाहच्या रचनेत चिंतन - मनन करीत राहा, परंतु खुद्द त्याच्या व्यक्तित्वासंबंधी असा प्रयत्न करु नका.'* (रूहुलमआनी, भाग २७)

अल्लाहचे अस्तित्व मानवी चिंतन व मननपेक्षा उच्चतर असणे एक उघड सत्य आहे. म्हणून मनुष्याच्या चिंतन क्षमता व सामर्थ्याची ज्या व्यक्तीला कल्पना असेल तिच्यापासून ही गोष्ट लपलेली असणे शक्य नाही की अल्लाहचे व्यक्तित्व तर फार महान गोष्ट आहे, सामान्यात सामान्य रचनांची स्थिती अशी आहे की त्यांच्या बाबतीत आमचे ज्ञान केवळ त्यांच्या गुणापर्यंतच जाऊन थांबते आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची वास्तविकता एका सीमेपर्यंत आमच्यासाठी एक रहस्यच बनून राहते. मग त्याच्या व्यक्तित्वाच्या वास्तविकतेला ओळखणे आमच्यासाठी कसे शक्य आहे जी अन्य सर्व रचनांपासून मौलिक रूपाने भिन्न आहे? जो सर्वप्रकारे अनुपम आहे ज्याची कोणत्याही अन्य वस्तूशी समानता नाही जो रचयिता आहे आणि त्याच्याशिवाय प्रत्येक वस्तु रचना आहे. जो स्वयंभू आहे आणि अन्य प्रत्येक वस्तु शक्य व घडणारी आहे. याचा प्रत्येक गुण चरम बिंदूला पोचलेला आहे आणि शाश्वत व प्राचीन आहे. त्या संपूर्ण सृष्टीत असा कोणीही नाही ज्याचा एक गुणदेखील अशा प्रकारचा असेल. मानवी चिंतन व विवेकाच्या कक्षेत जर एखादी गोष्ट येऊ शकते तर ते केवळ अल्लाहच्या गुणांचे ज्ञान होय. त्याच्या व्यक्तित्त्वाच्या वास्तविकतेपर्यंत पोचणे बौध्दिकदृष्ट्या एक अशक्य गोष्ट आहे. म्हणून पवित्र कुरआनने आपले कथन केवळ गुणांच्या चर्चेपर्यंतच सीमित ठेवले आहे.

या प्रश्नाच्या - अल्लाहच्या अस्तित्व व गुणांच्या प्रश्नासंबंधी अन्य काही प्रश्न

उभे केले जाऊ शकतात - की योग्य गुण 'व्यक्तित्व' आहेत अथवा त्याच्यापेक्षा भिन्न त्यांचे स्वत:चे एखादे स्थायी अस्तित्व आहे? भिन्न अस्तित्व आहेत तर व्यक्तित्वाशी त्यांच्या संबंधाचे काय स्वरूप आहे? ते कशा प्रकारे व्यक्तित्वात आढळतात? परंतु या स्पष्टपणे निव्वळ दार्शनिक चर्चा आहेत. ज्या मानवी सत स्वभावाच्या नव्हेत, तर वास्तविकत: त्याच्या मनन-चिंतन शक्तीच्या स्वत:ला न ओळखण्याची निर्मिती होत. पवित्र कुरआनने केवळ असेच नव्हे की अशा प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे दिली नाहीत तर त्यांचा उल्लेखदेखील अयोग्य ठरविला आहे या बाबतीत त्याने काही केले आहे तर केवळ असे की मनुष्याला त्याच्या ज्ञान व विवेक स्त्रोताचे स्मरण करून देऊन अशा प्रकारच्या वक्र-चिंतनापासून रोखले आहे. म्हणून जेव्हा काही लोकांनी हा प्रश्न उभा केला की वह्य (दिव्य बोध) काय आहे आणि त्याची वास्तविकता काय आहे? तेव्हा त्यांना सांगितले गेले की वह्यची वास्तविकता तुमच्या ज्ञान कक्षेत येणारी गोष्ट नव्हे. तुम्हाला सांगितले तरी का जावे? तुमच्या चिंतन व विवेकाची स्थिती तर अशी आहे की तिच्या समक्ष वह्य ची वास्तविकता उघड केली गेली तर त्यातून प्राप्ती इतकीसुध्दा होणार नाही जितकी की एका मुलासमक्ष एखाद्या जटिल दार्शनिक समस्येवर भाषण देण्यापासून होऊ शकते. *(सूरहबनी इस्त्राईल)*

याशिवाय असे प्रश्न उभे न करण्याचे व त्यांची उत्तरे न देण्याचे आणखी एक कारण होते आणि ते असे की अशा प्रकारच्या चर्चांचा त्या उद्देशांशी दूरवरचादेखील संबंध नव्हता ज्याकरिता पवित्र कुरआन अवतरला गेला होता. प्रत्येक दिव्य ग्रंथाप्रमाणे पवित्र कुरआन अवतरण्याचा उद्देशदेखील केवळ मार्गदर्शन आहे, लोकांची नैतिक सुधारणा त्यांच्या आत्म्याचे शुध्दीकरण, त्यांना सदाचार व सत्य प्रियतेची शिकवण देणे आणि त्या जीवनव्यवस्थेची शिकवण देणे जी खऱ्या स्वामीची प्रिय व मान्य व्यवस्था आहे. तिचे अनुसरण करून मनुष्य आपल्या जीवन-उद्देशाची पूर्ती करू शकतो, आणि आपला शेवट यशस्वी शेवट बनवू शकतो. हे स्पष्ट आहे की या उद्देशासाठी त्याला फक्त हे जाणून घेणे पुरेसे आहे की माझा निर्माता व स्वामी एक आहे. त्याचे अनेकानेक गुण आहेत आणि माझ्या व्यक्तित्वाच्या सीमेपर्यंत त्या गुणांच्या अमुक-अमुक निकडी आहेत. परंतु जर त्याला हे पुरेसे वाटले नाही तर अनावश्यक-तपशीलाच्या शोधात तो गुरफटतो. अल्लाहच्या अस्तित्वाच्या वास्तविकतेचा शोध करू लागतो. व्यक्तित्व व गुणांच्या वास्तविकतेचे ज्ञान घेऊ इच्छितो. मग त्याने आपल्या या शोधतृष्णेला कितीही योग्य व शास्त्रीय समजले तरी कोणताही दैवी ग्रंथ या बाबतीत त्याला प्रोत्साहन देऊ शकत नाही. उलट त्याला आपल्या अवतरण्याच्या उद्देशासाठी अगदी अनावश्यक व व्यर्थ ठरवून त्याला यापासून अलिप्त राहण्यास भाग पाडील.

२) उच्चतम गुणांचे हे आधिक्य व्यक्तित्वाच्या आधिक्याचे दर्शक कदापि नाही. (जसे की

काही धर्मांच्या अनुकरण करणाऱ्यांची कल्पना झाली आहे.) तर हे गुण व शक्ती, सर्वच्या सर्व याच एका अल्लाहच्या अस्तित्वात समाविष्ठ आहेत. म्हणून पवित्र कुरआनने या उघड सत्याला असे व्यक्त करून सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट केले आहे,

*'तुम्ही अल्लाह म्हणून त्याचा धावा करा किंवा रहमान म्हणून बोलवा जे कोणतेही (उत्तम) नाव घ्याल (त्याचा अर्थ अल्लाहचेच अस्तित्व असेल कारण) सर्व उत्तम नावे त्याच्यासाठीच आहेत.'* (सूरह बनी इस्त्राईल)

जर तुम्ही उपास्य असण्यासाठी आवश्यक ज्या गुण आणि शक्तीला समोर ठेऊन उपास्य अस्तित्वाची कल्पना कराल तर ते अस्तित्व सदैव केवळ तेच एक असेल ज्याचे नाव 'अल्लाह' आहे. असे समजू नका की उदाहरणार्थ जर तुम्ही दया व स्नेहाची कल्पना मनात ठेऊन रहमान म्हटले तर त्याचे तात्पर्य अन्य एखादे व्यक्तित्व असेल व जर काही अन्य गोष्टी व गुणांना दृष्टीसमोर ठेऊन 'अल्लाह' म्हटले तर त्याचे तात्पर्य एखादे अन्य व्यक्तित्व असेल.

निस्संशय वास्तविकता अशी आहे की प्रत्यक्ष आमच्या डोळ्यांसमोर जे जग आहे त्यात परस्परविरोधी प्रसंग व घटना प्रत्यक्षात येतात. येथे दया व कृपेचा वर्षावही होतो आणि प्रकोपाचे भूकंपसुध्दा येतात. येथे समाधान व सुखाची चवही मिळते व संकटाचे वावटळही उठतात. येथे आरोग्य व जीवनही आहे आणि आजार व मृत्यूसुध्दा. येथे सुख शांतीही आहे आणि उपद्रव व अत्याचार आहेत. परंतु याचा अर्थ कदापि असा नव्हे की या विभिन्न व परस्पर-विरोधी घटनांचे स्त्रोतदेखील विभिन्न आहेत आणि विभिन्न शक्तींचे मालक विभिन्न व्यक्ती आहेत. ज्या त्यांना प्रदर्शित करीत असतात. याउलट वास्तविकता अशी आहे की या सर्व घटना व प्रसंगाचा स्त्रोत केवळ अल्लाहच आहे. येथे जे काही प्रत्यक्षात येते ते त्याच्याच आज्ञेने येते आणि त्या सर्व शक्ती ज्यांच्या या घटना सूचक आहेत त्याच एका व्यक्तित्वाचे विभिन्न गुण आहेत आणि सर्वच्या सर्व त्याच्यातच केंद्रित आहेत. कोणत्या ही शक्तीचे आपले एखादे वेगळे अस्तित्व नसते आणि कोणताही गुण असा नाही ज्याचा स्वामी एखादी अन्य व्यक्ती असेल.

**३)** हे गुण ज्याने महान अल्लाहचे अस्तित्व विभूषित आहे सर्वच सौंदर्य व चांगुलपणाचे गुण आहेत व प्रत्येक प्रकारच्या दोष व उणिवांपासून मुक्त आहे. त्यांच्यापैकी कोणालाही महानतेचे गुण म्हणता येणार नाही. म्हणून पवित्र कुरआनने स्वत:च या गोष्टीलादेखील, की महान अल्लाह प्रत्येक प्रकारचे दोष व उणिवापासून मुक्त आहे, याचे एक स्थायी गुण बनविले आहे.

*'तो अल्लाह असा आहे ज्याच्याशिवाय कोणीही उपास्य नाही (सर्व जगाचा)*

*बादशाह आहे आणि प्रत्येक दोषापासून मुक्त व श्रेष्ठतर आहे (प्रत्येक उणिवांपासून दूर आहे).'* (सुरतुल हश्र)

या गोष्टीचे स्पष्टीकरण असे केले आहे,

*'त्याच्याकरिता सर्व चांगले गुण आहेत.'* (सूरह बनी इस्माईल)

या बाबतीत त्या अप्रिय प्रसंग व कटु घटनांमुळे कसलीही अडचण येता कामा नये जे जगात निरंतर घडत असतात. कारण या घटना आपल्या केवळ तात्पुरत्या प्रभावाच्या दृष्टीने व अगदी मर्यादित अर्थाने अप्रिय असतात. आपल्या अंतिम व वास्तविक परिणाम, तसेच पूर्णपणे दूरदर्शितेने आणि अगदीच मर्यादित अर्थात अप्रिय असतात. आपल्या अंतिम व खऱ्या अर्थाने, तसेच सर्व दूरदर्शितेच्या दृष्टीने व व्यापक अर्थाने कदापि अप्रिय असत नाहीत. अगदी त्याचप्रमाणे जसे रोग्याच्या शरीरावर चिरफाड करण्याची हत्यारे चालविणे अथवा त्याच्या तोंडात कडू औषधे घालणे, बागेच्या माळ्याकडून रोपे कापली जाणे, खुनी व बंडखोरांना न्यायालयाकडून फासावर चढविले जाणे दर्शनी अप्रिय असूनदेखील प्रत्यक्षपणे अजिबात अप्रिय नसते. म्हणून या जगात जर संसर्गजन्य रोगांचा प्रसार होत असेल, दुष्काळ पडत असेल पूर येत असतील, जुलुम करणारे, दुराचारी व उपद्रवींना संपत्ती व मानसन्मानाचा वसंत ऋतु उपभोगता येत असेल आणि सदाचाऱ्यांना संकटांचे तडाखे बसत असतील तर हा या गोष्टीचा पुरावा नव्हे की या जगाचा पालनकर्ता (अल्लाह न करो) गाफील, विध्वंसकारी, निर्दयी, रक्तपिपासू, खेळ करणारा आणि कदर न जाणणारा आहे. कारण अशा प्रकारच्या घटनामध्ये वरकरणी उपद्रव दिसतो, वास्तविकत: त्याच्या पाठीमागे महान सुधारणा असते आणि प्रकट विध्वंस अधिक महत्त्वपूर्ण निर्मितीचा शीर्षक असतो. ही गोष्ट वेगळी की एकीकडे तर उपद्रव व विध्वंसाच्या स्वभावात ओरड व दंगा असतो, म्हणून आम्ही त्याच्याकडे ताबडतोब आकृष्ट होतो आणि दीर्घकाळ डोळे लावून पाहत बसतो. परंतु निर्मितीच्या स्वभावात शांती असते आणि त्याकडे क्वचितच दृष्टी जाते.

एका घराचे जेव्हा बांधकाम चालू असते तेव्हा कसलाही आवाज येत नाही, परंतु जेव्हा ते कोसळते तेव्हा त्याच्या आवाजाने संपूर्ण वस्ती गर्भगळित होते. दुसरीकडे खुद्द मानवाच्या प्रवृत्तीची गोष्ट अशी आहे की तो आवडत्या गोष्टींच्या तुलनेत असह्य गोष्टीने व आनंदाच्या तुलनेत दु:खाने अधिक प्रभावित होतो. जर दहा गोष्टी त्याला आनंद देणाऱ्या असतील आणि केवळ एकच दु:खदायी घटना त्याच्यासमोर आली तर ही एकच घटना त्याच्या डोक्यात रेंगाळत राहील आणि त्या दहा गोष्टींचा त्याला विसर पडेल. या दोन्ही वास्तविकतांचा नैसर्गिक परिणाम असा होतो की संकुचित दृष्टीचा मनुष्य जागतिक घटनांचे खरे स्वरूप समजून घेण्यापासून वंचित राहील. स्पष्ट आहे की वरकरणी उपद्रव

व विध्वंस तर तो पाहतो परंतु त्यांच्या तळाशी असलेल्या रचनात्मक गोष्टी व श्रेष्ठतर दूरदर्शितेपर्यंत त्याची दृष्टी पोचत नाही. या घटनांपैकी कोणतीही घटना अशी नसते की ज्याचे फळ सुधारणा व रचना नसेल. म्हणून अल्लाहचा तो गुणदेखील जो या घटनेला कारणीभूत ठरला आहे निश्चितपणे रचनात्मक सौंदर्याचाच गुण असतो.

**४)** या अनेक गुणात कार्य व परिणामाची पूर्ण एकरूपता असते. यापैकी कोणताही गुण अशा प्रकारचे कार्य करीत नाही की त्याच्या परिणामस्वरूप एखाद्या अन्य गुणाच्या निकडी राहून जाव्यात. त्याच्या उलट प्रत्येक गुणाच्या आपल्या कार्य-मर्यादा आहेत. तो एका विशिष्ठ सीमा, संतुलनाच्या सीमेपर्यंत जातो आणि उल्लंघनाचे चिन्ह दिसताक्षणी तो थांबतो. उदाहरणार्थ, अल्लाहचा एक गुण रहमत (कृपा) आहे, परंतु तो दयाळू व कृपाळू असण्याचा अर्थ असा कदापि नाही की पुण्यशील व पापी सर्वच क्षमा प्राप्त करतील आणि तो त्याच्या अवज्ञाकारीनादेखील शिक्षा करणार नाही. कारण मग त्याला न्यायी, विवेकशील व कदर करणारा म्हटले जाणार नाही. अशाच प्रकारे त्याचा एक गुण आपले इच्छास्वातंत्र्य असण्याचा आहे. त्याचा अर्थ असा की तो जे इच्छितो ते करतो आणि जे इच्छितो केवळ तेच प्रत्यक्षात येते. परंतु याचा अर्थ असा कदापि नव्हे की मानवाची इच्छा व कृती काहीच नसते.

अल्लाहच ज्याला इच्छितो आणि जेव्हा इच्छितो कोणत्याही कारण आणि हक्काविना सन्मार्ग दाखवितो आणि सदाचारी बनवितो आणि ज्याला इच्छितो मार्ग भ्रष्टता व दुराचाराच्या खाईत ढकलून देतो. अशाच प्रकारे ज्याला इच्छील त्याला क्षमा करील आणि ज्याला इच्छील त्याला नरकात घालील याचा विचार न करता की कोणाचे कार्य जगात काय होते. कारण अशा स्थितीत तो विवेकशील, न्यायी व सत्यपारखी असण्यास काहीही अर्थ उरत नाही. म्हणून हीच वास्तविकता होती जी समजून देण्यासाठी पवित्र कुरआनने असे सांगतो की 'अल्लाह ज्यावर इच्छितो, कृपा-दृष्टी करतो.'

अल्लाह ज्याची इच्छितो त्याची क्षमा याचना मान्य करतो,

*'आणि अल्लाह सर्वकाही जाणणारा व विवेकशील आहे.'* (सुरतुतौबा - १५)

याचा अर्थ असा समजून घेऊ नये की अल्लाहची इच्छा डोळे बंद करून निर्णय घेत असते. नव्हे असे कदापि नाही. तो जे काही निर्णय घेतो ते पूर्ण ज्ञान व जाणिवेसह आणि सत्य व न्यायानुसारच करतो व विवेक आणि बुध्दिमत्तेची कोणतीही निकड विसरू शकत नाही.

**५)** अल्लाहच्या गुणांना व्यक्त करण्यासाठी व त्यांचे वर्णन करण्यासाठी ज्या शब्दांचा प्रयोग केला गेला आहे त्यापैकी बहुतेक शब्द तेच आहेत ज्यांचा प्रयोग लोकासाठीदेखील

होतो. उदाहरणार्थ, अलीम (जाणणारा), ख़बीर (खबर राखणारा), समीअ (ऐकणारा), बसीर (पाहणारा), अज़ीज़ (प्रभुत्वशाली), शकूर (कदर करणारा), रऊफ (मेहरबान), रहीम (दयाळू), हकीम (तत्त्वदर्शी), आदिल (न्यायी) आणि मुतकल्लीम (बोलणारा) वगैरे. परंतु हा केवळ शब्दांचा प्रयोग आहे, वास्तविकतेचा प्रयोग नाही. अर्थात जेव्हा या शब्दांचा वापर माणसासाठी होतो तेव्हा त्यांची वास्तविकता व अर्थ काही वेगळेच असतात. जेव्हा या शब्दांचा प्रयोग महान अल्लाहसाठी होतो तेव्हा काही औरच. पहिल्या स्थितीत त्यांचा अर्थ फारच सीमित व निम्न कोटीचा असतो आणि दुसऱ्या स्थितीत असीम उच्चतम कोटीचा असतो. उदाहरणार्थ; इल्म (ज्ञान) चा गुण घ्या. 'अलीम' अल्लाहही आहे आणि मनुष्यसुध्दा आहे, परंतु अल्लाह ज्ञानी असण्याचा अर्थ असा आहे,

**१)** तो प्रत्येक गोष्ट जाणतो मग त्या गोष्टीचा संबंध कोणत्याही काळ, कोणतेही स्थळ आणि कोणत्याही बाबीशी का असेना.

**२)** त्याचे हे जाणणे कधीही चुकीचे आणि सत्याच्या विरूध्द असत नाही.

**३)** हे ज्ञान त्याचे वैयक्तिक गुण आहे, ते कोणीही दिले नाही अथवा कोठूनही प्राप्त झाले नाही.

**४)** चिरंतन काळापासून असलेला गुण आहे आणि चिरकाळ राहील, त्यात परिवर्तन होणार नाही आणि संपणारदेखील नाही.

याउलट मानवाचे ज्ञानी असणे म्हणजे-

**१)** तो केवळ काही गोष्टी जाणतो आणि त्याही अत्यंत मर्यादित अर्थात भविष्य काळासंबंधी त्याचे ज्ञान शून्य आहे. भूतकाळासंबंधी म्हटले तर तो काही फार लांबपर्यंत जाऊ शकत नाही. येथपावेतो की वर्तमान व प्रत्यक्षात असलेल्या गोष्टींनादेखील आपल्या परिघित आणू शकत नाही.

**२)** जे काही तो जाणतो आवश्यक नाही की तेदेखील बिनचूक व सत्य असावे.

**३)** त्याचा हा गुण स्वत:चा नाही तर अल्लाहने प्रदान केलेला आहे आणि एखाद्या माणसाला केवळ इतक्याच प्रमाणात प्राप्त होतो जितका की अल्लाहने त्याला दिलेला असेल.

**४)** ज्याप्रमाणे तो स्वत: परिवर्तनशील व नष्ट होणारा आहे त्याचप्रमाणे, इतकेच नव्हे तर यापेक्षा अधिक, त्याचा हा गुणदेखील परिवर्तनशील व नश्वर आहे. तात्पर्य असा की अल्लाह ज्ञानी असणे व मनुष्य ज्ञानी असण्यात यापेक्षा अधिक फरक आहे, जितका फरक पूर्ण समुद्र व पावसाच्या एका थेंबात असतो.

अगदी हीच गोष्ट दुसऱ्या सर्व गुणांचीदेखील आहे.

या बाबतीत हा आक्षेप काही आक्षेप होऊ शकत नाही की जेव्हा वास्तविकतेत इतका मोठा फरक होता, तर मग पवित्र कुरआनने अल्लाहच्या गुणांना व्यक्त करण्यासाठी अशा शब्दांचा प्रयोगच का केला? ते अशासाठी की अखेर याशिवाय दुसरे काय करणे शक्य होते? ही तर एक सर्व मान्य गोष्ट आहे की पवित्र कुरआन आम्हां मानवांच्याच मार्गदर्शनासाठी उतरविला गेला आहे. आणि ही गरज तोपर्यंत पूर्ण होऊ शकत नव्हती जोपर्यंत 'गैब' (भूतकालीन, भविष्यकालीन, प्रत्यक्ष-परोक्ष) च्या वास्तविकतेनेदेखील, ज्यांचा हा अल्लाहच्या गुणांचा एक महत्त्वाचा भाग आहे, आम्हाला सूचित केले गेले नसते. कारण या वास्तविकताच तर धर्म व मार्गदर्शनाचा मूळ पाया होत्या. आता प्रश्न असा आहे की या वास्तविकतांचे ज्ञान आम्हाला कशा प्रकारे दिले गेले असते? काय याचा याशिवाय अन्य काही मार्ग असू शकत होता की त्यांना आमच्या मानवी भाषेतच आणि आमच्या शब्दांच्या माध्यमानेच व्यक्त केले जावे? स्पष्ट आहे की याशिवाय अन्य कोणताही मार्ग असणे शक्य नव्हते, म्हणून परोक्षाच्या दुसऱ्या बाबीप्रमाणेच अल्लाहच्या गुणांनादेखील वर्णन व शिकवणीसाठीसुध्दा सुयोग्यप्रकारे आम्हाला परिचित असलेल्या शब्दांचाच प्रयोग केला गेला. आता उरली ती शंका की एखादे वेळी अल्पज्ञ लोकांनी शब्द एकच असल्यामुळे अल्लाहच्या गुणांची कल्पनादेखील मानवी गुणावरून करू नये. म्हणून तात्विक व विस्तृत विवेचन, दोन्हीप्रकारे पुरेपूर खुलासा केला गेला. तात्विक शंका - समाधानासाठी ही गोष्ट सांगितली गेली,

*'कोणतीही वस्तु अल्लाह समान नाही.'* (सूरतश्शुरा)

*'आकाश व पृथ्वी सर्वत्र त्याचेच वैभव सर्वोच्च आहे.'* (सूरतुर्रूम)

तपशीलात जाऊन विभिन्न गुणासाठी अशी स्पष्टीकरणे दिली गेली की त्यानंतर अशा प्रकारचा कोणताही गैर समज होण्याची शक्यताच उरत नाही. उदाहरणार्थ याच 'इल्म' (ज्ञान) चा प्रश्न घ्या. पवित्र कुरआनने जेथे महान अल्लाहला 'अलीम' (ज्ञानी) म्हटले आहे तेथे जागोजागी या 'अलीमियत' (ज्ञानी असण्याचा गुण)चे स्पष्टीकरणदेखील अशा प्रकारे केले आहे.

*'तो प्रत्येक गोष्ट जाणतो.'* (सूरतुल बक़रह)

*'तो मनातील रहस्येदेखील जाणतो.'* (सूरह आलि इमरान)

*'तो प्रत्येक लपलेली व उघड गोष्ट जाणतो.'* (सूरतुल हश्र)

*'तो संपूर्ण सृष्टीतील लपलेली सत्ये चांगल्या प्रकारे जाणतो.'* (सूरतुलहुजुरात)

अशाच प्रकारे दुसऱ्या गुणांच्या बाबतीतसुध्दा आवश्यक स्पष्टीकरणे दिली

आहेत.

६) पवित्र कुरआनने अल्लाहच्या अस्तित्व व गुणांची कल्पना प्रस्तुत करताना केवळ एकच मनसामान्य मानवाच्या मनाला समोर ठेवले आहे. एखाद्या विशिष्ठ वर्गाच्या मनाला नव्हे. अशा छिद्रान्वेषणाचे पथ्य पाळले आहे जे सामान्य लोकांच्या आकलनशक्तीच्या बाहेरचे आहे. दुसऱ्या शब्दांत असे की त्याने या बाबतीत 'सामान्य' व 'विशिष्ठ' चा फरक केलेला नाही. असे केले नाही की 'विशिष्ठ' लोकासाठी काही वेगळे म्हटले व 'सामान्य' लोकासाठी काही वेगळे. विशिष्ठ लोकांना काही अशा कल्पना दिल्या असाव्यात ज्या तत्त्वज्ञानाच्या कल्पनांचा संयोग असाव्यात आणि सामान्य लोकांना अशा कल्पना दिल्या असाव्यात ज्या अनुभूतिपरक असाव्यात. याउलट त्याने कोणत्याही अपवादाविना सर्व माणसासमोर अल्लाहच्या अस्तित्व व गुणांच्या कल्पना अगदी समान रूपाने ठेवल्या आहेत. ही गोष्ट त्याने ज्या महान कल्याणासाठी अवलंबिली आहे ती एखाद्या अशा माणसापासून लपून राहू शकत नाही जो हे जाणतो की अल्लाहकडून अवतरलेला ग्रंथ वास्तविकत: कोणत्या उद्देशाने उतरविले जात आहेत? आणि मानवी जीवनाची ती कोणती क्रांती आहे जी प्रत्यक्षात आणण्यासाठी पवित्र कुरआन अवतरला गेला आहे? जेव्हा पवित्र कुरआन आपल्या या सर्वांत महत्त्वाचा व मौलिक पारिभाषिक शब्द म्हणजे 'अल्लाह' चा प्रयोग करतो तेव्हा त्याचा अर्थ वरील संपूर्ण चर्चेनुसार येतो. याची कल्पना नाही की एखाद्या धर्माचा व धार्मिक भाषेचा एखादा पारिभाषिक शब्द या सर्वंकष अर्थाचा आहे किंवा नाही? जर असेल तर 'अल्लाह' चा अनुवाद त्या शब्दाने करण्यास हरकत नाही, नाही तर स्पष्ट आहे की असे करणे कोणत्याही प्रकारे योग्य ठरणार नाही.

## नबी व रसूल (प्रेषित)

पवित्र कुरआनचे दुसरे सर्वांत महत्त्वाचे पारिभाषिक शब्द 'नबी' आणि 'रसूल' आहेत. नबी व रसूल तो मनुष्य असतो ज्याच्यावर अल्लाहचे उपदेश अवतरले जातात, जेणेकरून त्याने स्वत:देखील त्याची अम्मल बजावणी करावी आणि ते अल्लाहच्या दुसऱ्या दासापर्यंतसुध्दा पोचवावे.

शब्दकोशात उंच जमिनीलादेखील 'नबी' असे म्हणतात. मार्गचिन्हालादेखील 'नबी' म्हणतात. अशाच प्रकारे शब्दकोशात 'रसूल'चा अर्थ आहे 'पाठविला गेलेला', मग तो एखादा संदेश असो अथवा एखादा 'पैगंबर' असो. जणू त्या माणसाला, ज्याच्यावर अल्लाहचा उपदेश अवतरला जातो. 'नबी' अशासाठी म्हटले गेले आहे की तो आपल्या पदाप्रमाणे सर्व माणसापेक्षा उच्चतर ही असतो आणि त्यांच्यासाठी साफल्य व मुक्तीच्या सरळमार्गाचे चिन्हदेखील असतो. अशाच प्रकारे त्याला 'रसूल' अशासाठी

म्हटले गेले आहे की तो सृष्टीच्या शासकाकडून त्याच्या प्रजेकडे पाठविला गेलेला 'संदेश वाहक' आणि 'दूत' असतो, जो त्यांच्यापर्यंत त्याच्या आज्ञा पोचवितो.

'नबी' व 'रसूल'च्या व्यक्तीत्वासंबंधी पवित्र कुरआनने खालीलप्रमाणे स्पष्टीकरण केलेले आहे.

**१)** तो मनुष्य आणि केवळ मनुष्य असतो. अगदी आमच्या व तुमच्यासारखाच मनुष्य. म्हणून कोणत्याही अपवादाविना सर्वच नबी आपल्याबद्दल 'आम्ही तुमच्याप्रमाणेच मनुष्य आहोत.' *(सूरह इब्राहीम)* या गोष्टीची अगदी स्पष्ट शब्दांत घोषणा करीत राहिले आहेत. याशिवाय माणसापैकीदेखील केवळ पुरूषांनाच नबी बनविले जात राहिले आहे, स्त्रियापैकी कोणालाही या कामासाठी कधी निवडले गेले नाही.

*'आम्ही तुमच्या अगोदर रसूल पाठविले नाही, पण पुरुष, ज्यांच्या कडे आम्ही वह्य (दिव्य बोध) पाठवीत होतो.'* (सूरह युसूफ)

ज्याअर्थी नबी मनुष्य होते त्या अर्थी स्वाभाविकपणे दुसऱ्या माणसाप्रमाणेच त्यांच्यादेखील भौतिक गरजा व मानवी निकडी असत. जसे की म्हटले गेले आहे, 'निस्संदेह हे लोक जेवण करीत असत आणि बाजारात ये-जा करीत असत.' *(सूरतुलफुर्कान)* आणि 'आम्ही त्यांना पत्नी व मुलाबाळांवाले बनविले होते.' *(सुरतुर्रद)*

या सर्व स्पष्टीकरणानंतर नबीचे मनुष्य असणे दैदिप्यमान सूर्याप्रमाणे स्पष्ट होते. तरी ज्याअर्थी ही बाब महत्त्वाची होती त्या अर्थी निषेधात्मक पैलूनेदेखील कोणत्याही चुकीच्या विचाराला वाव ठेवला जाऊ नये. म्हणून हेदेखील स्पष्ट केले गेले की नबी फरिश्ते (देवदूत) नसत.

*'सांगा, जर पृथ्वीवर फरिश्ते आरामात चालत-फिरत असते. तर आम्ही अवश्य त्यांच्यावर आकाशातून रसूल फरिश्ते पाठविले असते.'* (सूरह बनी इस्राईल)

असेही नाही की महान अल्लाहने 'अवतार' घेतला असेल आणि स्वत:च मानव-रूप धारण करून जगात येत असेल. म्हणून ख्रिश्चनांच्या एका टोळीने जेव्हा असे म्हटले की 'अल्लाह मरयम-पुत्र ईसा (येशू) आहे, तेव्हा कुरआनने त्याला 'कुफ्र' (नास्तिकता) ठरविले.

*'निश्चितपणे कुफ्र केला त्या लोकांनी ज्यांनी सांगितले, अल्लाहच मरयमपुत्र ईसा (येशू) आहे.'* (सुरतुलमाइदह)

**२)** नबी व रसूल असणे म्हणजे पैगंबरी व प्रेषितत्व एक पद आहे, ज्याच्यासाठी महान अल्लाहकडून विशिष्ठ लोकांची निवड व नेमणूक होत असते.

*'अल्लाह फरिश्ते व मानवांमधून संदेश वाहकाची निवड करतो. निस्संदेह अल्लाह ऐकणारा व पाहणारा आहे.'* (सुरतुलहज्ज)

या बाबतीत त्या निवडलेल्या व नियुक्त होणाऱ्या लोकांच्या स्वत:च्या विचारांना काही स्थान नसते आणि त्यांच्या कोणत्याही प्रयत्नालादेखील स्थान नसते. मानवाच्या स्वत:च्या मनीषा व इच्छेने आणि त्याच्या प्रयत्नाने ही गोष्ट प्राप्त होत नसते. हा अल्लाहच आहे जो या गोष्टीचा निर्णय घेऊ शकतो की त्याने आपला प्रेषित कोणाला बनवावे.

*'अल्लाह जाणतो की त्याने आपला प्रेषित कोणाला बनवावे.'* (सूरतुल अनआम)

स्मरण व चिंतनाने आणि तपस्येने मनुष्य आध्यात्मिक दृष्टीने फार उंच जाऊ शकतो आणि स्वत:मध्ये देवदूतांच्या गुणांचा रंग भरू शकतो. परंतु हे शक्य नाही की त्याने आपल्या या तपस्येच्या बळावर प्रेषितत्वाच्या पदापर्यंत पोचावे आणि आपल्या या तपस्येमुळे प्रेषितत्वाच्या सन्मानाच्या पोषाखाने विभूषित व्हावे. त्याला कारण असे की जसे आताच कळले की प्रेषितत्व एक पद व कर्तव्य आहे आणि कोणतेही पद स्वत:च केवळ आपल्या प्रयत्नाने प्राप्त होत नसते, तर एखाद्या अधिकारप्राप्त शासकाच्या आज्ञा व नियुक्तीनेच प्राप्त होत असते. म्हणून प्रेषितत्वसुध्दा, जे एक महान दैवी पद आहे, त्यालाच प्राप्त होऊ शकतो ज्याच्यासाठी सृष्टी व मानवाच्या खऱ्या शासकाचा नियुक्ती-आदेश लागू झाला असेल.

३) नबी जो उपदेश करतो आणि धर्म व धर्म-कायदा म्हणून ज्या गोष्टीची शिकवण देतो ती स्वत: त्याच्याकडून नसते तर ती अल्लाहकडून असते. प्रत्येक नबी लोकांना हेच सांगतो की 'मी तुम्हाला आपल्या पालनकर्त्याचे आदेश ऐकवितो आणि त्याचाच संदेश पोचवितो.'

*'मी तुम्हाला आपल्या पालनकर्त्याच्याच आज्ञा ऐकवीत आहे आणि त्याचाच संदेश पोचवीत आहे.'* (सूरतुल अअराफ)

जेव्हा नबीची प्रत्येक गोष्ट अल्लाहकडूनच असते तेव्हा त्याचा अर्थ असा झाला की त्याचे पालन करणे खऱ्या अर्थाने अल्लाहच्या आज्ञेचे पालन करणे होय, आणि त्याची अवज्ञा करणे वस्तुत: अल्लाहची अवज्ञा करणे होय. जसे की स्पष्ट शब्दांत सांगितलेही गेले आहे,

'ज्याने रसूलच्या आज्ञेचे पालन केले, त्याने अल्लाहच्या आज्ञेचे पालन केले.' *(सूरतुन्निसा)*

आम्ही (म्हणजे अल्लाहने) ज्या कोणत्याही रसूलला पाठविले ते अशासाठीच पाठविले की अल्लाहच्या आज्ञेप्रमाणेच त्याच्या आज्ञेचे पालन केले जावे.

*'आम्ही (म्हणजे अल्लाहने) ज्या कोणत्या रसूलला पाठविले ते अशासाठी पाठविले की अल्लाहच्या आज्ञेप्रमाणे त्याच्या आज्ञेचे पालन केले जावे.'* (सूरतुन्निसा)

खुद्द 'रसूल' हा शब्द दर्शवितो की खरी गोष्ट अशीच असणे शक्य आहे कारण अल्लाहचे रसूल म्हणजे अल्लाहने पाठविलेले असण्याचा अर्थच असा आहे की तो जे काही सांगेल ते आपल्या वैयक्तिकरीत्या व आपल्याकडून सांगणार नाही. तर आपल्याला पाठविणाऱ्याकडून सांगेल आणि म्हणून त्याचे आज्ञापालन अथवा त्याची अवज्ञादेखील त्याची व्यक्तीश: आज्ञा पाळणे किंवा अवज्ञा नसेल तर जगाच्या पालनकर्त्याचीच अवज्ञा अथवा आज्ञापालन असेल.

या स्पष्टीकरणाने 'नबी' व 'रसूल' या कुरआनातील पारिभाषिक शब्दांचा जो अर्थ निश्चित होतो, आपल्या लक्षात आले असेल की अल्लाहपर्यंत पोच व धार्मिक महानता व श्रेष्ठत्व व्यक्त करणारे दुसऱ्या असंख्य शब्द व पारिभाषिक शब्दांच्या अर्थापासून तो मूलत: भिन्न आहे. बुजुर्ग (महात्मा), वली (संत), पीर (सिध्द पुरूष), फकीर, साधु, संत, गुरू, ऋषि, मुनि व अशा प्रकारच्या दुसऱ्या शब्दांपैकी कोणताही शब्द असा नाही की जो हा अर्थ व्यक्त करू शकेल. म्हणून हा कुरआनातील पारिभाषिक शब्द आपली वास्तविकता व पात्रतेच्या दृष्टीने एक असा शब्द आहे ज्याची कल्पना व अर्थ स्पष्ट करण्यासाठी त्याचाच प्रयोग करणे भाग आहे. एखाद्या दुसऱ्या शब्दाने जरी त्याचे भाषांतर केले गेले तरी त्याच रूपात की जेव्हा तो अगदी तीच कल्पना प्रस्तुत करीत असेल आणि लोक ते ऐकून त्याचा हाच अर्थ समजत असतील. फारसी भाषेचा शब्द 'पैगंबर' त्याच प्रकारचा एक शब्द आहे.

अखेरीस 'नबी' व 'रसूल'मधील एक फरकदेखील समजून घेणे आवश्यक आहे. हा फरक या दोन्ही शब्दांच्या प्रयोगातील आहे. पवित्र कुरआनने जरी या दोन्ही शब्दांना त्या विशिष्ठ अर्थात घेतले आहे ज्याचे स्पष्टीकरण आमच्यासमोर येऊन गेले आहे. परंतु 'नबी'चा शब्द त्याच परिभाषा व अर्थासाठी ठराविक आहे. 'रसूल'चा शब्द त्याप्रकारे ठराविक नाही. 'नबी'चा शब्द तर असा आहे की पवित्र कुरआन जेंव्हा जेव्हा याचा प्रयोग करतो तेव्हा निश्चितपणे तोच विशिष्ठ मनुष्य अपेक्षित असतो ज्याच्यावर महान अल्लाहकडून वह्य अवतरली आहे. परंतु 'रसूल' हा शब्द 'नबी' या शब्दाचा समानार्थी असण्याबरोबरच पुष्कळ ठिकाणी त्याचा शाब्दिक अर्थात प्रयोग झाला आहे. म्हणजे तो नबीसाठीदेखील प्रयुक्त झालेला आहे, आणि गैर-नबीसाठीदेखील. जागो जागी फरिश्त्यांनादेखील अल्लाचे

रसूल (प्रेषित) म्हटले गेले आहे. ते अशासाठी की तेदेखील महान अल्लाहकडून विभिन्न कार्यावर नेमलेले व पाठविलेले असतात. आता उरला हा प्रश्न की मग 'रसूल' हा शब्द कुरआनमध्ये कोठे 'नबी'चा समानार्थी समजला जावा व कोठे शाब्दिक अर्थात प्रयुक्त समजावा? तर या बाबतीत संदर्भाचीच मदत घ्यावी लागेल जो स्पष्टपणे प्रत्येक ठिकाणी आपल्याला आढळेल.

## वह्य (दिव्य प्रकटन)

पवित्र कुरआनचा तिसरा महत्त्वाचा पारिभाषिक शब्द 'वह्य' (दिव्य बोध) आहे. अल्लाहकडून नबीवर उतरविले जात असते त्या मार्गदर्शनाला 'वह्य' म्हटले गेले आहे.

'वह्य'चा खरा शाब्दिक अर्थ 'तीक्ष्ण संकेत' आहे, मग तो हाताने असो, दृष्टीने असो, केवळ आवाजाने असो, बोलण्याने असो, लिखित असो, कोणत्याही प्रकारे असो. मग ज्याअर्थी संकेत अथवा इशारा कोणालाही एखाद्या गोष्टीपासून सावध करण्यासाठी असतो, दुसरीकडे त्यात गुप्ततेचा अर्थदेखील समाविष्ट असतो, त्याअर्थी या शब्दाचा अर्थ गुप्त सूचना देणे, गुप्तपणे सांगणे आणि मनात एखादी गोष्ट घालणेदेखील होतो. या शब्दाचा धातु 'ईहा' आहे, यापासून बनणारी क्रियापदे याच सर्व विभिन्न अर्थात आणि कोणत्याही विशिष्ठतेविना प्रत्येक वस्तूसाठी प्रयुक्त होतात. पवित्र कुरआनमध्ये ही क्रियापदे 'अल्लाह', 'सैतान', 'मनुष्य' सर्वांसाठी वापरली गेली आहेत, परंतु जेव्हा गोष्ट या क्रियापदांच्या प्रयोगाची नसेल आणि खुद्द हा शब्द 'वह्य' वापरला जात असेल तेव्हा मग अर्थ व प्रयोगाची ही व्याप्ती संपुष्टात येते. याचा अर्थ मुख्यत्वेकरून केवळ ती मार्गदर्शनाची वाणी असते जी नबींना अल्लाहकडून मिळते आणि अशा पध्दतीने मिळते जी सामान्य माणसाच्या अनुभूतीच्या आवाक्याबाहेरची असते. म्हणजे खास 'वह्य' शब्द कुरआनचा एक विशिष्ठ पारिभाषिक शब्द आहे आणि तो प्रत्येक ठिकाणी याच परिभाषेत प्रयुक्त झालेला आहे की जेव्हा 'ईहा' आणि त्याच्यापासून बनलेल्या क्रियापदाचे स्वरूप पारिभाषिक शब्दांचे नाही आणि ते सामान्यपणे आपल्या शाब्दिक अर्थाने वापरले गेले आहेत. 'वह्य' केवळ महान अल्लाहकडून असते आणि केवळ त्यांच्या नबींच्यासाठी असते की जेव्हा 'ईहा' अल्लाह व गैर-अल्लाह सर्वांकडून असतो आणि प्रत्येक जीवासाठी असतो.

नबींवर अवतरणाऱ्या प्रत्येक मार्गदर्शनाला म्हणूनच 'वह्य' म्हटले गेले आहे. की त्याचे अवतरणे दुसऱ्या मानवांच्या दृष्टीपासून लपविलेले असते.

'वह्य' केवळ अर्थाचे नाव नसते, तर त्यात अर्थ, शब्द व शब्दांचा क्रम हे सर्वकाही असते. दुसऱ्या शब्दांत असे की महान अल्लाहकडून नबीवर जे मार्गदर्शन अवतरले जाते. ज्याप्रकारे त्याचा अर्थ महान अल्लाहकडून असतो त्याप्रकारे त्यांचे

शब्ददेखील त्याच्याचकडून असतात आणि त्या शब्दांचा तो क्रमदेखील, ज्याने की ते वाक्याचे रूप धारण करते. म्हणून या 'वह्य'ला स्पष्टपणे 'कलामुल्लाह' (अल्लाहची वाणी)देखील म्हटले गेले आहे.

'वह्य' (पवित्र कुरआन) प्रेषित मुहम्मद (स.)पर्यंत पोचण्याच्या क्रियेस 'नुजूल' (उतरणे) अथवा 'इन्जाल' आणि तन्जील अवतरणे म्हटले गेले आहे. हे 'नुजूल' म्हणजे काय होते? हे अवतरविला जाण्याची क्रिया प्रत्यक्षात कशी येत असे? या बाबतीत कुरआन व 'सहीह हदीस'मध्ये जे स्पष्टीकरण आढळते त्याचा खुलासा असा आहे-

**अ)** महान अल्लाहचा एक खास फरिश्ता (देवदूत) ज्याचे नाव जिब्रईल (अ.) आहे. तो अल्लाहची ही वाणी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हृदयावर अवतरीत असे.

*'हे नबी (स.)! सत्यनिष्ठ फरिश्त्याने या (कुरआन) ला तुमच्या हृदयावर अवतरले आहे.'* (सूरतुश्शुअरा)

*'तर निश्चितपणे त्याने त्याच्या (म्हणजे अल्लाहच्या) आज्ञेने त्याला तुमच्या हृदयावर अवतरले आहे.'* (सुरतुलनबकरह)

तात्पर्य असे की हाच फरिश्ता प्रेषित मुहम्मद (स.)पर्यंत कुरआन पोचविण्यासाठी माध्यम होता. महान अल्लाह ज्या वेळी जितक्या आयती (ईशवचन) अवतरू इच्छित असे तितक्या आयती जिब्रईल (अ.) यांच्या हवाली करून त्यांच्याकडे (पैगंबराकडे) अवतरित करीत असे. ते पूर्ण सत्यनिष्ठा व जबाबदारीने त्या आयती आणून त्यांच्या (पैगंबरांच्या) हृदयावर अवतरीत असत. या बाबतीत निश्चितपणे ते केवळ एक माध्यम व आज्ञाधारक सेवक म्हणून होते. यात त्यांचे स्वत:चे मत आणि मर्जीला वाव नसे. ते अल्लाहच्या आज्ञेविना कधी येत नसत जसे की दुसऱ्या आयतीच्या शब्द 'बिइजनिही' वरून स्पष्ट होते. आणखी एका आयतीत जसे की खुद्द त्यांच्याच तोंडून हे स्पष्टीकरण आढळते,

*'हे नबी (स.)! जेव्हा जेव्हा आम्ही (वह्य घेऊन) उतरतो तेव्हा तुझ्या पालनकर्त्याची आज्ञा मिळाल्यावरच उतरतो.'* (सूरह मरयम)

त्या 'वह्य' आणि 'अल्लाहच्या वाणी'त कोणतीही कमी-जास्त किंवा कोणत्याही प्रकारचा बदल होऊ देत नसत, जसे त्यांना 'अरूहुल अमीन'. (अर्थात सत्यनिष्ठ फरिश्ता म्हणून स्पष्ट संबोधिले गेले आहे.)

पवित्र कुरआनमध्ये काही ठिकाणी ही गोष्ट की जिब्रईल (अ.) यांनी हा कुरआन प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हृदयावर अवतरिला, अशा त-हेने सांगितली आहे,

*'हा (कुरआन अल्लाहकडून) पाठविलेल्या वह्यशिवाय काही नाही, ज्याची प्रचंड शक्ती (असलेल्या फरिश्त्यांनी) त्याला (म्हणजे पैगंबरांना) शिकवण दिली आहे.'*

*(सूरतुन्नज्म)*

यावरून 'हृदयावर उतरविण्याचा' अर्थ काही सामान्य स्वरूपाचा नव्हता. तर 'शिकवणीचा' म्हणजे पूर्णपणे शिकविण्याचा होता, ज्याच्यानंतर महान अल्लाहची ही वह्य आपल्या मूळ स्वरूपात 'जशीच्या तशी' प्रेषित मुहम्मद (स.) यांना पाठ होत असे.

**ब)** जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हृदयावर वह्य अवतरली जात असे तेव्हा त्यांच्यात (पैगंबरात) पराकोटीची एकाग्रता उत्पन्न होत असे आणि ते सभोवतालच्या वातावरणापासून पूर्णतः दुरावत असत.चेहऱ्याचा रंग लाल होत असे आणि स्पष्ट दिसत असे की त्यांच्या स्नायूवर फार मोठे ओझे पडले आहे आणि ते थकू लागले आहेत. थंडीच्या दिवसांतदेखील त्यांच्या कपाळावर घामाचे थेंब स्पष्ट दिसत असत. *(बुखारी शरीफ)* जर ते उंटावर स्वार झालेले असले तर उंटाच्या पाठीवरील लाकडी हौदा चरचर आवाज करू लागे. *(फतहुलबारी भाग १)*

एकदा हारिस इब्ने हिशाम (रजि.) यांनी विचारले की आपल्यावर वह्य कशी अवतरते? प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले, 'कधी तर असे वाटते की जणू माझ्या कानात घंटानाद होत आहे. वह्य अवतरण्याची ही स्थिती मला कठीण वाटते. मग अल्लाहची वाणी माझ्यापर्यंत पोचवून फरिश्ता निघून जातो आणि तोपर्यंत मी तिला पूर्णपणे सुरक्षित केलेले असते. कधी असे घडते की फरिश्ता मानवी रूप धारण करून माझ्या समक्ष उपस्थित होतो आणि मला जे ऐकवावयाचे असते ते ऐकवितो आणि मी त्याने ऐकविलेली वाणी पाठ करतो.'

या कथनावरून असे कळते की फरिश्ता (देवदूत) दोन रूपात येत असे. एक तर मानवी रूपात व दुसरे आपल्या खऱ्या रूपात. या दुसऱ्या रूपासंबंधी पैगंबरांचे हे कथन की ते माझ्यासाठी 'अशद्दु' (फार कठीण) ठरत असते हे स्पष्ट करते की तीव्रता व कठीण असण्याच्या दृष्टीने पहिले रूपदेखील कमी नव्हते. अर्थात फरिश्त्याकडून वह्य ग्रहण करणे एक असाधारण कार्य होते आणि ती शिकणे-शिकविण्याच्या कार्याला परिचित कार्य कदापि समजता कामा नये. असे वाटते की फरिश्त्याकडून वह्य ग्रहण करण्यासाठी प्रेषित मुहम्मद (स.) बाह्येंद्रियांचा उपयोग करीत नसत तर आंतरिक शक्तींना एकत्रित करून ते एखाद्या अन्य जगतात प्रवेश करीत असत. अशा तऱ्हेने दृश्यजगतापासून उच्च बनून वह्य आपल्या हृदयावर उतरून घेण्यास ते सक्षम बनत असत. एकाग्रतेची ही दशा, चेहरा तांबडा होणे, कपाळ घामाघूम होणे, कानात घंटीसमान आवाज येणे याच गोष्टीचा परिणाम असे. कोणत्याही परिस्थितीत सत्याचे योग्य ज्ञान तर अल्लाहलाच असू शकते.

आमच्यासमोर वह्य उतरण्याची गोष्ट ज्या सीमेपर्यंत स्पष्ट आहे ती केवळ इतकी आहे की अशी स्थिती होत असे. ज्यात त्यांच्यावर अल्लाहची वह्य फरिश्ता उतरवीत असे आणि ही स्थिती स्पष्टपणे जागृतावस्थेची असूनदेखील प्रकटजगतापासून दूर जाण्याची असे, काही अशा प्रकारे दूर जाण्याची जशी आमची स्थिती स्वप्नात होत असते.

या आहेत त्या गोष्टी ज्या वह्य उतरण्याच्या प्रश्नासंबंधी आम्हाला सांगितल्या गेल्या व आम्हाला समजू शकल्या.

आता उरली अधिक चर्चा व शोधाची बाब म्हणजे हा प्रश्न की वह्य खरोखर आहे तरी काय? तर हा प्रश्न दुसऱ्या शब्दांत वस्तुत: असा प्रश्न आहे की वह्यची वास्तविकता काय आहे? परंतु काय सामान्य मनुष्य वह्यची वास्तविकता समजू शकतो? पवित्र कुरआनचे उत्तर आहे की नाही. ज्या वेळी ती अवतरत होती त्या वेळी त्याच्या भांडखोर विरोधकांनी सरळ सरळ हा प्रश्न उभा केला होता, 'ही वह्य आहे तरी काय गोष्ट?' तेव्हा त्याच्या उत्तरा दाखल महान अल्लाहने आपल्या नबींना सूचना दिली,

*'सांगा वह्य माझ्या पालनकर्त्याच्या (विशेष) बाबीपैकी आहे, आणि तुम्हांला फार कमी ज्ञान दिले गेले आहे.'* (सूरह बनी इस्माईल)

म्हणजे मनुष्य जाणणे त्याच्या व समजण्याच्या ज्या नैसर्गिक क्षमता घेऊन जन्माला आला आहे त्या इतक्या व अशा नाहीत की तो वह्यची वास्तविकता समजू शकेल. तार्किक दृष्टीने पाहिले तर हे एक अत्यंत तर्कपूर्ण उत्तर आहे. कारण प्रेषितत्व जरी मानवांनाच प्रदान केले जात आहे तरी ते सामान्य मानवी शक्तीपेक्षा निश्चितपणे एक जादा शक्ती आहे आणि त्याची वास्तविकता केवळ तोच मनुष्य समजू शकतो ज्याला स्वत:ला या सौभाग्याने गौरवान्वित केले गेले आहे.

एखादे मूल म्हातारपणाच्या वयातील अनुभूतींना आणि एखादा साध्या स्वभावाचा अशिक्षित मनुष्य शास्त्रीय तथ्यांना समजू शकत नाही. वास्तविकत: त्याच्यात ती समजून घेण्याची पात्रता जरी कार्यरूपाने असत नाही पण मूलत: कोणत्याही परिस्थितीत ती असते. प्रेषितत्वाच्या विशिष्ठ गोष्टींना एखादा नबी नसलेला मनुष्य कसे समजू शकतो की जेव्हा त्याच्यात त्यांना समजू शकण्याची पात्रता मूलत: नसते? होय, एखाद्या गोष्टीची वास्तविकता व मूळ स्वरूपास योग्यप्रकारे समजून घेणे ही गोष्ट वेगळी आहे आणि त्याची एक संदिग्ध कल्पना करणे दुसरी गोष्ट आहे. पहिली गोष्ट जर आमच्यासाठी अशक्य असेल तर हे आवश्यक नाही की दुसरीसुध्दा अशक्यच असावी. मात्र वास्तविकता बहुधा याच्या उलटच असते. कित्येक गोष्टी अशा आहेत की ज्यांच्या वास्तविकतेपर्यंत पोचणे शक्य झाले नाही, परंतु तरी ही उदाहरणाव्दारे आणि सभोवतालच्या विविध माहितीच्या

आधारे आमच्या अनुमानाची दृष्टी त्यांचे दर्शन घेतल्याशिवाय राहत नाही. वह्य आणि ती उतरण्याची बाबसुध्दा अशाच प्रकारची आहे, निस्संदेह आम्हास माहीत नाही आणि माहीत होणेही शक्य नाही की वह्यचे खरे स्वरूप व वास्तविकता काय आहे. परंतु त्याचबरोबर आमच्या माहिती व अनुभवाप्रमाणे काही अशा गोष्टीदेखील आहेत ज्यांना जर आमच्या अनुमानाने शिडी बनविले तर त्याची झलक (दर्शन) दुरून का होईना, मिळू शकते.

या गोष्टीत सर्वांत महत्त्वाच्या व स्पष्ट गोष्टी खरी स्वप्ने आहेत. ही स्वप्ने अशी आहेत की एक घटना जी आता भविष्यात कधी काळी घडणार आहे. एका झोपलेल्या माणसाला, काहीशा रहस्यपूर्ण पध्दतीने, आताच प्रत्यक्ष घडतांना दिसते. अशा तऱ्हेने त्याला उद्या घडणाऱ्या गोष्टीची सूचना एका निश्चित स्वरूपात आजच मिळते. विचार करा भविष्यात प्रत्यक्षात येणारी एक घटना मानवी बुध्दीला, ज्या वेळी तो आपल्या सभोवतालपासून पूर्णपणे बेसावध व संबंधरहित असतो. अगोदरच कशी अनुभूति होते? आणि कोठून व कशा प्रकारे त्याला याची सूचना मिळते? ज्या लोकांना या सृष्टीच्या पाठीमागे एखाद्या न पाहिलेल्या शक्तीचे आणि काही उच्च वास्तविकतांचे अस्तित्वच मान्य नाही, ते या बाबतीत न जाणो काय काय सांगत असतात. परंतु अल्लाहवर आणि त्याच्या महानतेवर विश्वास ठेवणारा त्याला याशिवाय अन्य काही समजू शकत नाही की वास्तविकत: वरील जगताची एक कृपा आहे.

ज्याने कधी-कधी सेवकांना गौरवान्वित केले जात असते. म्हणजे परोक्षाचे ज्ञान बाळगणारा आणि घटनांना प्रत्यक्षात आणणारा त्यांना स्वप्नावस्थेत एका विशेष पध्दतीने, अगोदरच सांगत असतो की पुढे अशी घटना घडणार आहे. स्वप्नात परोक्ष जगतातून काही गोष्टी अशा प्रकारे कळणे एक असे सत्य आहे ज्याचा मनुष्याला निरंतर अनुभव येत असतो. असा अनुभव असून, वह्य उतरणे आणि महान अल्लाहकडून काही खास सेवकापर्यंत मार्गदर्शन पोचणे, न समजणारी, गोष्टी असली तर असो, परंतु ती कदापि अकल्पनीय राहत नाही. तथापि जेव्हा एक सामान्य मनुष्य हेच समजू शकत नाही की खुद्द त्याच्या डोक्यात स्वप्नावस्थेत अमुक गोष्ट कशा प्रकारे उघड झाली? आणि त्याच्या या स्वप्नाची वास्तविकता काय आहे? तेव्हा तो वह्य आणि वह्य उतरण्याच्या वास्तविकतेला कसे जाणू शकतो?

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी फर्माविले,

*'मुस्लिमाची (खरी) स्वप्ने, प्रेषितत्वाचा शेचाळीसवा भाग आहेत.'*

(तिर्मिज़ी अबवाबुरूअया)

अशाच प्रकारे खुद्द त्यांची (प्रेषित मुहम्मद (स.) यांची) स्थितीदेखील अशीच आहे की वह्य उतरण्याचा प्रारंभ होण्यापूर्वी निरंतर सहा महिन्यांचा काळ खऱ्या स्वप्नांचाच काळ होता. म्हणजे त्या मुदतीत (प्रेषित मुहम्मद स.) बहुतेक स्वप्न पाहत असत आणि जे काही स्वप्नात ते पाहत असत ते नंतर प्रत्यक्षात डोळ्यांसमोर येत असे. जणू हा काळ त्यांच्या सामान्य मानवी स्थिती आणि त्यांच्या प्रेषितत्वाच्या स्थिती दरम्यानचा अंतरिम (मध्यावधी) काळ होता आणि ही स्वप्ने एकप्रकारे प्रेषितत्वाची प्रस्तावना होती. या गोष्टीवरून कळते की सत्य स्वप्नांचे अस्तित्व, वह्य व वह्य उतरण्याच्या स्वरूपाची एक संदिग्ध कल्पना अवश्य देऊ शकत होते. कारण त्यांना वह्य व प्रेषितत्वाच्या बाबीशी एक प्रकारची अनुरूपता प्राप्त आहे. कदाचित हीदेखील एक महत्त्वपूर्ण गरज व हित आहे की ज्याला दृष्टीसमोर ठेऊन खऱ्या व चांगल्या स्वप्नांना नबींसाठीच खास ठेवले नाही तर दुसऱ्या लोकासाठीदेखील सर्वसाधारण केले गेले. तसेच वह्यचा क्रम समाप्त झाला तरीदेखील खऱ्या स्वप्नांचे व्दार कियामत (अंतिम दिन) पर्यंत उघडे ठेवले गेले आहे. जेणेकरून वह्य उतरण्याच्या स्वरूपाची, कमीतकमी एक प्रारंभिक कल्पना करण्यासाठी एक दूरवर्ती उदाहरण व मार्गदर्शन सदैव अस्तित्वात राहील.

## फरिश्ते (देवदूत)

पवित्र कुरआनमध्ये एका विशेष रचना म्हणजे फरिश्त्यांचा उल्लेख जास्त करून आलेला आहे आणि विभिन्न कारणाने हा शब्ददेखील कुरआनच्या अत्यंत महत्त्वाच्या पारिभाषिक शब्दांपैकी एक आहे. विशेषकरून अशासाठी की हेच फरिश्ते आहेत ज्यांच्यातील काहीजण 'अंबिया' ('नबी'चे अनेकवचन) पर्यंत अल्लाहची वह्य पोचविण्याचे माध्यम राहिले आहेत. ते असे व्यक्तित्व आहेत ज्यांचे वैभव व महानता सामान्यत: लोकासाठी उपद्रवाचे कारण बनत राहिले आहेत आणि ज्यांच्या सन्मानात अतिरेक करून मनुष्य अनेकेश्वरत्व, नास्तिकता व मूर्तिपूजेच्या विनाशकारी मार्गभ्रष्टतेत गुरफटत राहिलेला आहे. कोठे त्यांना (अल्लाह रक्षण करो) महान अल्लाहची संतती बनविलेले आहे तर कोठे त्यांना अल्लाहच्या विभिन्न गुणांचेच दुसरे नाव समजले गेले आहे आणि अशा तऱ्हेने देवी-देवतांची कल्पना अस्तित्वात आली. म्हणून आवश्यक आहे की त्यांच्याविषयीदेखील कुरआनने प्रस्तुत केलेला विचार स्पष्टपणे समजून घेतला जावा.

फरिश्ते सामान्य माणसासाठी परोक्षाची गोष्ट आहेत आणि आमच्या इंद्रियांच्या पकडीबाहेर आहेत. म्हणून 'वह्य'प्रमाणेच त्यांचीसुध्दा मूळ वास्तविकता आम्ही समजू शकत नाही आणि धार्मिक दृष्टीने त्याची काही गरजदेखील नाही. धार्मिक दृष्टीने ज्या गोष्टीची गरज आहे ती केवळ अशी आहे की आम्हाला त्यांच्या स्थिती व गुणांचे योग्य

ज्ञान मिळावे. म्हणून हे ज्ञान आम्हाला दिले गेले आहे. पवित्र कुरआनचे कथन व प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या स्पष्टीकरण प्रकाशात फरिशत्यांची स्थिती व त्यांचे गुण खालीलप्रमाणे आहेत.

**१)** 'फरिश्ते महान अल्लाहची एक मोठी प्रतिष्ठित, उच्च पद प्राप्त व निकटवर्ती रचना आहेत.' *(सूरतुल अंबिया २६)*

**२)** हे सदैव महान अल्लाहच्या आज्ञा व इच्छेला बांधील असतात. कुरआन असे तर सांगत नाही की त्यांच्यात अल्लाहच्या आदेशांचे उल्लंघन करण्याची क्षमताच नसते, पण या वास्तविकतेचे वारंवार स्पष्टीकरण करतो की ते कृतीने कधीही अवज्ञा करीत नाहीत आणि पूर्णपणे आज्ञापालनच त्यांची रीत आहे.

*'आणि ते त्याच्या आज्ञेनेच कार्य करीत असतात.'* (सूरतुल अंबिया २७)

ते महान अल्लाहच्या प्रशंसा, नाम स्मरण व पावित्र्य वर्णनात निरंतर मग्न राहतात.

*'आम्ही तुमच्या प्रशंसेबरोबर नामस्मरण व पवित्र वर्णनं करतो. आणि त्यांच्यावर प्रत्येक क्षणी अल्लाहचे भय आच्छादित राहते.'* (सूरतुल बकरह)

*'आणि ते त्याच्या (अल्लाहच्या) भयाने कापणारे असतात.'*

(सूरतुल अंबिया २८)

**३)** त्यांना असामान्य व बिनहिशेबी शक्ती प्रदान केल्या गेल्या आहेत आणि त्यांची संख्या असंख्य आहे इतकेच नव्हे तर त्यांच्यासंबंधी विचार व अनुमान केला जाऊ शकत नाही.

**४)** सृष्टीत त्यांचा दर्जा 'राज्य-कर्मचाऱ्याप्रमाणे आहे जे अल्लाहच्या आज्ञा व आदेशानुसार जगाच्या संपूर्ण कारखान्याची व्यवस्था करीत असतात. आमच्या या जगापासून सृष्टीच्या शेवटच्या टोकापर्यंत ज्या आज्ञा लागू होतात. त्या याच फरिश्त्यांव्दारेच होतात आणि असे असते की त्यांच्या स्वत:च्या मतांना व मर्जीला या बाबतीत अजिबात वाव नसतो. त्यांना आपल्या स्वामीकडून जी आज्ञा मिळते केवळ तिचेच पालन ते करतात. अशा प्रकारे त्यांना असामान्य व असंख्य शक्ती प्रदान होण्याचा अर्थ याशिवाय अन्य काही नाही की जी महान कर्तव्ये त्यांना सोपविली जातात त्यांची योग्यप्रकारे अंमलबजावणी करण्याची त्यांना पूर्ण शक्ती दिली गेली आहे.

**५)** पदांच्या दृष्टीने त्यांचे असंख्य वर्ग आहेत ज्यांचे ज्ञान अल्लाहशिवाय कोणालाही नाही. तथापि मूळ रूपाने त्यांचे दोन वर्ग आहेत. सामान्यवर्ग व विशेषवर्ग. विशेषवर्गाच्या फरिश्त्यांना पवित्र कुरआनने एका विशिष्ठ नाव 'रूह'ने संबोधिले आहे. हे सामान्य

फरिश्त्यापेक्षा श्रेष्ठतर दर्जाचे स्वामी असतात आणि अल्लाहचे अधिक निकटवर्ती असतात. अल्लाहच्या आज्ञा मिळण्याची कृपा प्रथम त्यांच्यावरच होते. नंतर ते आज्ञा घेऊन खालच्या वर्गाच्या त्या फरिश्त्यापर्यंत पोचवितात ज्यांच्या विभागाशी त्या आज्ञांचा संबंध असतो. या विशेषवर्गाच्या प्रमुखाचे नाव जिब्रईल आहे. हे आपल्या स्मरणात असेल की हाच तो फरिश्ता आहे जो नबीपर्यंत अल्लाहची वह्य पोचविण्याचे महान कर्तव्य करीत असतो आणि ज्याच्याद्वारे अल्लाहने प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हृदयावर कुरआन अवतरित केला आहे.

## इस्लाम (परिपूर्ण जीवनपध्दती)

या धर्माचे नाव ज्याचे आवाहन पवित्र कुरआन करतो आणि जे कुरआनमध्ये आहे तो 'इस्लाम' होय. इस्लामचा शाब्दिक अर्थ आज्ञापालनासाठी मान तुकविणे व स्वत:ला हवाली करणे होय. परंतु जेव्हा या शब्दाच्या निव्वळ शाब्दिक अर्थाशिवाय धार्मिक अर्थाने प्रयोग होतो तेव्हा त्याचा अर्थ विशेष करून केवळ अल्लाहसमोर नतमस्तक होणे स्वत:ला त्याच्या हवाली करणे होय. जणू पवित्र कुरआनने प्रस्तुत केलेल्या धर्माला इस्लाम अशासाठी म्हटले आहे की हा शब्द त्याच्या वास्तविकता व हेतूचे उत्तम प्रतिनिधित्व करीत होता. कारण त्याच्या आगमनाचा हेतू याशिवाय अन्य काही नव्हता की अल्लाहच्या दासांनी स्वत:ला प्रसन्नचित्ताने या आज्ञांच्या हवाली करावे ज्याना कुंरआनव्दारे त्याने प्रदान केल्या आहेत.

निस्संशय केवळ या धर्माचीच नव्हे तर त्या प्रत्येक धर्माची जो महान अल्लाहकडून आला होता, हेतू व वास्तविकता हीच होती आणि कोणत्याही अपवादाविना अल्लाहकडून आलेल्या सर्वच धर्मांच्या आगमनाचा उद्देश केवळ लोकांनी आपले जीवन त्यांच्या हवाली करावे. अशा प्रकारे आपल्या खऱ्या स्वामीचे आज्ञाधारक बनावे. म्हणून अर्थाच्या दृष्टीने त्यापैकी प्रत्येक धर्म इस्लामच होता. खुद्द पवित्र कुरआननेदेखील ही वास्तविकता वारंवार प्रकट केली आहे आणि म्हटले आहे की मूळ व उद्देशाच्या दृष्टीने सर्व धर्म एकच होते. ज्या नबीवर जो ग्रंथ अवतरला होता तो वास्तविकत: इस्लाम (अल्लाहचे पूर्ण आज्ञापालन)चेच आवाहन घेऊन अवतरला होता. म्हणून जेथपर्यंत मूळ स्वरूपाचा संबंध आहे केवळ कुरआनचे अनुसरण करणाऱ्यांचाच नव्हे तर संपूर्ण मानवजातीचा धर्म नेहमीच इस्लाम राहिलेला आहे. मानवजातीवरच काय, तो तर येथपर्यंत स्पष्ट करतो की इस्लामच संपूर्ण सृष्टीचा धर्म आहे (आले इमरान ८३) आणि हे अशा प्रकारे कणापासून सूर्यापर्यंत या जगातील प्रत्येक वस्तु त्याच कायद्यांचे पालन करीत आहे जे तिच्यासाठी तिच्या रचयिताने निश्चित ठरवून दिले आहेत. अल्लाहकडून आलेले सर्वच धर्म आपल्या उद्देश व आपल्या

स्वरूपाच्या दृष्टीने 'इस्लाम'च होते. पवित्र कुरआनने मुख्यत्वे करून केवळ त्याच धर्माला 'इस्लाम' म्हटले आहे जो त्याने प्रस्तुत केला आहे. या वैशिष्ठ्य व विशेष पदाचे कारण कुरआन व त्याने प्रस्तुत केलेल्या धर्माचा तो विशिष्ठ विशेष दर्जा आहे जो त्याला अल्लाहने अवतरलेल्या अन्य ग्रंथाच्या व धर्मांच्या तुलनेत प्राप्त आहे आणि ज्याचा तपशीलवार परिचय 'पवित्र कुरआनची प्रमुख वैशिष्ट्ये' या चर्चेत वर गेला आहे. या धर्माच्या या प्रमुख व वैशिष्ठ्य पूर्ण दर्जाने त्याला उचितच अधिकार दिला की 'इस्लाम'. या शब्दाने केवळ त्याची वास्तविकता व हेतूचेच प्रतिनिधित्व करू नये तर त्याचे नावसुध्दा असावे. जेव्हा दुसऱ्या धर्मांच्या बाबतीत तो केवळ त्यांच्या सत्यता व उद्देशांचाच प्रतिनिधी राहिलेला आहे. अगदी त्याचप्रमाणे की ज्याप्रमाणे वास्तविकत: अल्लाहकडून उतरलेला प्रत्येक ग्रंथ कुरआन होता. परंतु नाव म्हणून हा शब्द केवळ त्याच एका ग्रंथासाठी विशिष्ठ केले गेले जो प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरला आहे.

तात्पर्य असा की हेसुध्दा कुरआनच्या धर्माचे एक प्रमुख गुण आहे की नावाच्या बाबतीत त्याचा संबंध एखाद्या व्यक्ती अथवा जातीशी जोडला गेला नाही तर आपल्या वास्तविकता व हेतूशी जोडला गेला आहे. त्याचा परिणाम असा आहे की एखादी व्यक्ती त्याचे नाव ऐकूनच कल्पना करू शकते की हा कोणता धर्म आहे, आणि तो कशाचे आवाहन करतो? जगातील अन्य धर्म आपल्या नावाने अशा प्रकारचे कोणतेही मार्गदर्शन करीत नाहीत, कारण त्यांचा संबंध उद्देश व वास्तविकतेऐवजी व्यक्तित्व व जातीशी आहे. ईसाइयतचे नाव 'ईसाइयत' (ख्रिश्चन) अशासाठी आहे की तो प्रस्तुत करणारे ईसा (अ) होते. बौद्ध मताला 'बौद्ध मत' अशासाठी म्हटले गेले की त्याचे संस्थापक महात्मा बुद्ध होते. 'जरतुश्ती' धर्माचे नाव जरतुश्तच्या नावावर आधारित आहे. 'यहूदियत' (ज्यू) धर्माचे नाव अशासाठी यहूदियत आहे की 'बनी इस्राईल' (यहूदी जात) या जातीत 'यहूदी' टोळीने मोठी प्रतिष्ठा व महत्त्व प्राप्त केले होते आणि दुसरे इस्राईली टोळ्या त्याच्यासमोर गौण ठरल्या होत्या इतक्या की संपूर्ण जातीवरच त्या टोळीचे नाव प्रभावी ठरले होते. याशिवाय मूसा (अ.) यांचा धर्मकायदा याच नावाने प्रचलित झाला. परंतु कुरआनने आपले आवाहन व आपल्या धर्माला प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तित्व किंवा त्यांच्या जातीशी संबंध जोडून त्याचे नाव मुहम्मदियत अथवा अरबियत किंवा हाशमियत ठेवले नाही. तर केवळ 'इस्लाम' ठेवले जी त्याच्या तात्त्विक स्वरुपाची, त्याच्या विश्वव्यापी दर्जाची व त्याच्या उच्च वैभवाची निकड होती.

## मोमिन आणि मुस्लिम (आज्ञाधारक)

पवित्र कुरआनच्या महत्त्वपूर्ण व स्पष्ट पारिभाषिक शब्दांत 'मोमिन' व 'मुस्लिम'देखील

आहेत, जे मुळात एकाच सर्वव्यापी सत्याच्या दोन बाजू आहेत. एक ज्ञानाची बाजू व दुसरी व्यावहारिक बाजू म्हणून म्हटले पाहिजे की दर्शनी ते दोन पारिभाषिक शब्द असूनदेखील मुळात ते एकच आहेत.

'मोमिन' त्या व्यक्तीला म्हटले गेले आहे जो पवित्र कुरआनला योग्य.व त्याच्या अपेक्षित पद्धतीने अल्लाहचा ग्रंथ मान्य करतो. म्हणजे असे की त्याने ज्या श्रद्धा व तात्विक सत्यांना आपल्या आवाहनाचा पाया ठरविले आहे ते खरे आहेत असे मनस्वी मान्य करतो आणि शिवाय जिभेनेदेखील ते मान्य करतो आणि तशी घोषणा करतो. या श्रद्धा अथवा तात्त्विक सत्ये पाच आहेत आणि कुरआनच्या शब्दांत त्यांचा एकत्रित उल्लेख आहे-

*'तर चांगुलपणा त्या व्यक्तीचा चांगुलपणा आहे जी मानते अल्लाहला, अंतिम दिनाला, फरिश्त्याना, दैवी ग्रंथांना व नबींना.'* (सूरतुल बकरह)

१) 'अल्लाहला मानणे' म्हणजे केवळ त्यालाच 'इलाह' व 'उपास्य' मानले जावे आणि सर्व पूर्णता प्राप्त गुण व ईशगुण त्याच्यासाठीच विशिष्ट असल्याचे मान्य करणे. याशिवाय या गुणांच्या स्वाभाविक निकडीदेखील पूर्णपणे मुख्यत: त्याच्यासाठीच आहेत असे समजावे. म्हणजे हे सर्व अधिकारसुद्धा आणि ते सर्व हक्कदेखील अल्लाहमध्येच केंद्रित असल्याचे मान्य केले जावे जे त्याच्या गुणांसाठी अगदी आवश्यक आहेत. उदाहरणार्थ, दासांना आज्ञा करणे आणि त्यांच्यासाठी कायदे बनविण्याचा खरा अधिकार, त्यांच्या बाबतीत निर्णय करण्याचा अधिकार विनंत्या ऐकणे व मान्य करण्याचा अधिकार, त्यांना क्षमा करण्याचा व शिक्षा देण्याचा अधिकार, त्यांना नफा किंवा तोटा, शांती अथवा संकट, आरोग्य अथवा रोग, जीवन किंवा मृत्यु देण्याचा अधिकार, त्याचप्रमाणे स्वत:च्या आज्ञेचे पालन का-कू न करता करविण्याचा अधिकार, आपल्या इच्छा पूर्ण करविण्याचा अधिकार, आपली उपासना करविण्याचा अधिकार वगैरे. (अल्लाहला असेच आणि अशाच प्रकारे मानणे, कुरआनचे आवाहन व इस्लामचा खरा पाया आहे आणि त्याला 'तौहीद' (एकेश्वरत्व) ची श्रद्धा म्हणतात.)

२) 'अंतिम दिवसाला मानणे' म्हणजे एक असा दिवस येण्यावर विश्वास ठेवणे की जेव्हा या जगाचा अंत होईल, जगाची संपूर्ण व्यवस्था ढासळेल. आणि या पृथ्वीवर एक जीव सुद्धा जिवंत उरणार नाही. यानंतर जगाच्या पहिल्या मनुष्यापासून अंतिम माणसापर्यंत सर्वच्या सर्वजणांना पुन्हा जिवंत करून अल्लाहसमोर हजर केले जाईल. तेथे जगातील त्यांच्या कर्मांची पूर्ण नोंद समोर ठेवली जाईल आणि एक-एक माणसाचा हिशेब घेऊन सत्कर्मांचा चांगला व दुष्कर्मांचा वाईट मोबदला दिला जाईल. म्हणजे ज्या माणसाचे

कर्मपत्र 'ईमान' (विश्वास) व सत्कर्म हे आज्ञापालन व उपासनेचे कर्मपत्र सिद्ध होईल त्याला महान अल्लाह उत्तम मोबदला देऊन परिपूर्ण दुसरे जीवन प्रदान करील जे सदैव कायम राहणारे असेल. ज्या माणसाच्या कर्मपत्रात ईमानऐवजी अनेकेश्वरत्व व नास्तिकता, सत्कर्माऐवजी दुराचार आणि आज्ञापालन व उपासनेऐवजी खऱ्या स्वामीविरुद्ध बंडाचा पुरावा आढळेल त्याला कष्टप्रद जीवन दिले जाईल आणि हे जीवन सदैव बाकी राहील. (हे कुरआनचे आवाहन व इस्लामचा महत्तम पाया आहे आणि त्याला 'परलोकाबद्दल श्रद्धा' म्हणतात.)

३) 'फरिश्यांना मानणे' म्हणजे त्यांच्या अस्तित्वाला सत्य मानले जावे आणि त्यांनाबरोबर त्याच गुणांचे स्वामी मानले जावे ज्यांचे स्पष्टीकरण 'फरिश्ते' या मथळ्याखाली आता वर गेलेले आहे.

४) 'अल्लाहकडून अवतरित ग्रंथांना मानणे' म्हणजे महान अल्लाहकडून मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी जितके ग्रंथ अवतरले आहेत त्या सर्वांना अल्लाहचे ग्रंथ म्हणून मान्य केले जावे. त्यांच्यापैकी ज्या ग्रंथासंबंधी पवित्र कुरआनने या गोष्टीची विश्वसनीय साक्ष दिलेली आहे की ते अल्लाहकडून उतरविलेले होते, त्यांना तर निश्चिती व नामनिर्धारणासह अल्लाहचे ग्रंथ मानले जावे. ज्यांच्या बाबतीत ही साक्ष नसेल त्यांच्या बाबतीत केवळ 'परोक्ष' व तात्विकदृष्ट्या ही श्रद्धा ठेवली जावी की हे सर्व माहीत नसलेले ग्रंथदेखील अल्लाहचे ग्रंथ होते.

अल्लाहकडून अवतरलेल्या ग्रंथांना मानण्याची एक आवश्यक बाजू अशीसुद्धा आहे की अस्तित्वात असलेले व ज्ञात ग्रंथांपैकी प्रत्येकालादेखील तोच दर्जा दिला जावा जो महान अल्लाहकडून त्याला प्राप्त झालेला आहे. व्यावहारिकदृष्ट्या याचा अर्थ असा आहे की पवित्र कुरआनला अंतिम ग्रंथ मानले जावे, असा अंतिम ग्रंथ ज्याने मागील सर्व ग्रंथांना रद्द ठरविले आहे आणि कुरआनच्या व्यावहारिक अनुसरणावरच आता प्रत्येक माणसाची मुक्ती अवलंबून आहे.

'नबींना मानणे' म्हणजे महान अल्लाहने सुरवातीपासून अखेरपर्यंत जितके नबी पाठविलेले आहेत, कोणताही फरक न करता त्या सर्वांना 'अल्लाहचे नबी' म्हणून मान्य केले जावे. त्यांच्यापैकी ज्यांची नावे घेऊन पवित्र कुरआनने स्पष्ट केले आहे की ते अल्लाहचे नबी होते, त्यांना तर नावाच्या स्पष्टीकरण व निश्चितीसह नबी म्हणून मानले जावे आणि उरलेल्यांच्या बाबतीत नबी असल्याबद्दल श्रद्धा केवळ परोक्ष व तत्त्वत: ठेवली जावी.

या श्रद्धेची एक आवश्यक बाजू अशीदेखील आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांना

अल्लाहचे अंतिम नबी मानले जावे आणि त्याबरोबरच हेदेखील मान्य केले जावे की त्यांचे अनुसरण संपूर्ण मानवजातीसाठी आवश्यक आहे. म्हणजे ते नबी बनल्यापासून या जगाच्या अंतिम क्षणापर्यंतचा काळ केवळ त्यांच्या प्रेषितत्वाचा काळ आहे. दुसऱ्या सर्व नबीपैकी प्रत्येकाचा प्रेषितत्वकाळ अल्लाहच्या आज्ञेने समाप्त झालेला आहे व आता अन्य एखाद्याचे अनुसरण अल्लाहच्या दरबारी मान्य होण्याजोगे नाही.

'मुस्लिम' त्या व्यक्तीला म्हटले गेले आहे की जी 'मोमिन' असण्याच्या व्यावहारिक निकडी पूर्ण करण्यासाठी प्रयत्नशील असते. जी कुरआन व इस्लामचे अनुसरण करणारी असेल, जी अल्लाहच्या आज्ञेपुढे स्वत:ला समर्पित करते. या शब्दाचा अर्थच 'इस्लामधारक' म्हणजे महान अल्लाहची आज्ञाधारक व उपासक होय. ही गोष्ट स्पष्ट आहे की कुरआनला मानणे व त्याच्या आवाहनाच्या मूळ श्रद्धावर विश्वास ठेवण्याला तोपर्यंत काहीच अर्थ नाही जोपर्यंत त्याच्या आज्ञा व मार्गदर्शनाचे अनुसरण सुद्धा केले जात नाही. म्हणून जी व्यक्ती कुरआनचा स्वीकार करुन आणि त्याच्या मूळ श्रद्धावर विश्वास ठेवून 'मोमिन' बनते तिच्या बाबतीत स्वाभाविकपणेच नव्हे तर निश्चितपणे असे समजले जाऊ शकते की आता ती या मार्गदर्शनाच्या संपूर्ण संचाला ज्याचे नाव कुरआन व इस्लाम आहे आपल्या व्यावहारिक जीवनासाठी 'मार्गदर्शन-ग्रंथ' बनवील. हेच कारण आहे की कुरआनला मान्य करताक्षणीच एक व्यक्ती केवळ 'मोमिन'च नव्हे तर 'मुस्लिम'सुद्धा ठरते.

'मुस्लिम' या शब्दाला केवळ एकाच गुणाचे स्थान आहे असे नव्हे तर तो कुरआन व प्रेषित मुहम्मद (स.) यांना मानणाऱ्यांचे नावसुद्धा आहे. म्हणून स्पष्टपणे म्हटले गेले आहे,

*'त्याने तुमचे नाव मुस्लिम ठेवले आहे.'* (सूरतुल हज्ज)

जणू ज्याप्रमाणे कुरआनने प्रवर्तीत केलेल्या धर्माचा संबंध एखाद्या व्यक्तीविशेष अथवा जातीशी नाही त्याप्रमाणे त्याला मानणाऱ्यांचे नावदेखील अशा एखाद्या संबंधापासून पूर्णत: दूर आहे. त्याचे नाव जर 'इस्लाम' आहे, तर यांचेसुद्धा 'मुस्लिम' आहे आणि अशा प्रकारे केवळ गुणवाचक स्वरुप असल्यामुळे हे नावदेखील आपल्या आधारभूत सैद्धान्तिक स्वरूपाचा स्वत:च प्रतिनिधी आहे. आता ही गोष्ट वेगळी की दुसरे लोक आपल्या समुदायगत स्वभाव, आपल्या पैतृक चिंतनशैली व आपल्या प्रचलित रिवाजांच्या प्रभावामुळे 'मुस्लिम' आणि 'मुहम्मडन'मधील फरक समजू शकत नाहीत. परिणामत: इस्लामच्या अनुयायींना 'मुस्लिम' म्हणण्याऐवजी 'मुहम्मडन' म्हणतात.

हाच शब्द 'मुस्लिम' आहे जो फारसी भाषेत 'अलिफ' (अ) व 'नून' (न) जोडून 'मुस्लिम' बनलेला आहे.

# कुफ्र व काफिर (विद्रोही)

'कुफ्र' हा 'ईमान'चा विरूद्धार्थी पारिभाषिक शब्द आहे. या शब्दाचा मूळ शाब्दिक अर्थ 'लपविणे' असा आहे. अशाच प्रकारे 'काफिर'चा शाब्दिक अर्थसुध्दा जो याच 'कुफ्र' शब्दाचा कर्तृवाचक नाम आहे 'लपविणारा' असा होतो. हा शब्द (काफिर) अरबी भाषेत त्या अनेक गोष्टींसाठी विशेषण म्हणून वापरला जातो ज्या लपविण्याचे कार्य करतात. उदाहरणार्थ- रात्र, समुद्र व शेतकरी वगैरे. रात्र संपूर्ण जगाला आपल्या काळ्या आच्छादनात लपवून टाकते. समुद्राने स्वत:मध्ये अनेक जिवांना लपविले आहे. शेतकरी पेरणी करताना बीजांना जमिनीत लपवितो. म्हणून शाब्दिक अर्थाच्या दृष्टीने यांच्यापैकी प्रत्येक 'काफिर' आहे.

कुरआनच्या भाषेत 'कुफ्र' चा दोन अर्थाने प्रयोग झाला आहे. एक तर 'अल्लाहशी कृतघ्नता करणे' आणि दुसरा अर्थ धर्माच्या मूळ श्रध्दांपैकी एखाद्या श्रध्देचा इन्कार करणे. असे तर 'कुफ्र' या शब्दाचे हे दोन भिन्न-भिन्न अर्थ आहेत. परंतु वास्तविकत: या व्दित्वामध्येदेखील मोठी सखोल एकरूपता व स्वाभाविक एकता आहे आणि दोहोंत जर काही फरक असेल तर तो केवळ इतका आहे की जितका बीज व रोपात असतो किंवा सूर्य व त्यापासून निघणाऱ्या किरणांमध्ये असतो. इन्कार या अर्थाचा कुफ्र मुळात कृतघ्नता या अर्थाच्या कुफ्रपासून निर्माण होतो आणि तो याचाच आवश्यक परिणाम असतो. 'कुफ्र'चा मूळ शाब्दिक अर्थ आणि त्याचा पारिभाषिक अर्थ अथवा अर्थामध्ये जो संबंध आहे तो समजण्यासाठी एखाद्या लांबलचक स्पष्टीकरणाची आवश्यकता नाही. कृतघ्न व इन्कार करणारा जे काही करतो ते याशिवाय अन्य काय असते की तो महान अल्लाहच्या उपकारांना लपवितो. त्याच्या पालनकर्ता असण्याच्या अधिकारांना लपवितो. आपल्या दास्यत्वाला लपवितो आणि अंतत: आपल्या मूळ स्वभावाला की ज्यात सर्व जगांच्या पालनकर्त्या अल्लाहबद्दल कृतज्ञता, उपासना व आज्ञापालनाची भावना सामावलेली आहे तिला लपवितो. तर मग अल्लाहशी कृतघ्नतेला किंवा त्याच्या गुण व गुणांच्या निकडींच्या इन्काराला जर 'कुफ्र' म्हटले गेले तर हा एक अत्यंत व्यापक व सुयोग्य अर्थ होता जो घेतला गेला.

'कुफ्र' व 'काफिर' (म्हणजे कुफ्रवाले) हे शब्द जेव्हा कुरआनमध्ये म्हटले जातात तेव्हा सामान्यपणे हेच दुसरे अर्थ दृष्टीसमोर असतात. म्हणजे काफिरचा अर्थ असा मनुष्य आहे जो अल्लाहच्या गुणांपैकी एखाद्या गुणाचा इन्कार करतो किंवा त्याच्या निकडींचा इन्कार करतो किंवा अंतिम दिनाचा इन्कार करतो किंवा वह्य व प्रेषितत्वाचा इन्कार करतो किंवा फरिश्त्यांच्या अस्तित्व व त्यांच्या गुणांचा इन्कार करतो किंवा एखाद्या पैगंबराला पैगंबर मानण्यास नकार देतो किंवा अल्लाहच्या एखाद्या ग्रंथाला अल्लाहचा ग्रंथ मानण्यास

नकार देतो.

इन्कार या अर्थाच्या 'कुफ्र' शब्दाच्या विभिन्न श्रेणी आहेत, जसे की ईमानच्या विभिन्न श्रेणी आहेत. उदाहरणार्थ, एक कुफ्र तो आहे जो सत्य गोष्टीची व्याख्या व स्पष्टीकरण केले असता केला जातो आणि एक तो आहे जो न जाणण्यावर आधारित आहे. ही गोष्ट सत्य आहे की या दोहोंची स्थिती समान असू शकत नाही. म्हणूनच न्यायाच्या दृष्टीने त्यांचे परिणाम सुद्धा एकसमान असू शकत नाहीत. अगदी शक्य आहे की कुफ्रची काही रूपे अशीही असणे शक्य आहे जी कुफ्र असूनदेखील महान अल्लाहच्या दरबारात क्षमायोग्य असतील. केवळ असेच नव्हे की हे शक्य आहे तर कुरआनच्या संकेतावरून कळते की वास्तविकता अशीच आहे. उदाहरणार्थ, जर एखाद्या रसूलचे आवाहन एका व्यक्तीपर्यंत पोचले नाही अथवा पोचले तरी योग्यप्रकारे नाही म्हणून ती व्यक्ती त्याच्या प्रेषितत्वावर ईमान आणित नाही, त्याचा इन्कार व कुफ्र करते तर तिला या बाबतीत निश्चितपणे लाचार समजले जाईल. याउलट तौहीद (एकेश्वरत्व) चा इन्कार करणाऱ्याला कोणत्याही परिस्थितीत क्षमा केली जाणार नाही. कारण एकेश्वरत्वाची कल्पना मानवाच्या स्वभावात वसलेली आहे आणि तिच्या उघड निशाण्या प्रत्येक दृष्टीसमोर व प्रत्येक ठिकाणी आहेत. म्हणून या स्पष्ट सत्याचा इन्कार करण्यात मानवाला कदापि लाचार समजले जाऊ शकत नाही.

त्याचप्रमाणे हेही शक्य आहे की कुफ्रची काही रुपे अशी असू शकतील जी कठोरतम शिक्षेस पात्र असतील. केवळ परलोकातच नव्हे तर या जगातील जीवनातसुद्धा जे मोबदल्याचे नव्हे तर केवळ कर्माचे स्थान आहे, मानवाला अत्यंत वाईट परिणामाला तोंड देण्यास पात्र बनवतील. कुरआनचे कथन आहे की हेदेखील एक सत्य आहे आणि जगाने अनेकदा याचे प्रमाणदेखील आपल्या डोळ्यांने पाहिलेले आहेत. अशा प्रकारच्या कुफ्रचे अत्यंत स्पष्ट उदाहरण त्या लोकांचा कुफ्र आहे ज्यांना ईमानचे आवाहन सरळसरळ नबींद्वारे प्राप्त झाले होते. ज्यामुळे त्यांच्यापुढे सत्याचे स्पष्टीकरण व युक्तिवाद पूर्ण करण्यात अजिबात कोणतीही कसर उरली नव्हती. अशा लोकांशी अंतिमदिनी जो काही व्यवहार होईल तो होईलच पण या जगातसुद्धा त्यांना अशी शिक्षा दिली गेली की त्यांना समूळ नष्ट केले. एक तर भूकंप, वादळ, ज्वालामुखी किंवा दगडांच्या वर्षावाच्या प्रकोपाने पापणी लवते न लवते तोपर्यंत त्यांना नष्ट करून टाकले गेले किंवा मग ईमानधारकांच्या तलवारीने त्यांना समूळ नष्ट करून टाकले आणि त्यांना ज़िम्मी (इस्लामी राज्यातील मुस्लिमेतर प्रजा) म्हणूनदेखील जिवंत राहण्याचा अधिकार दिला गेला नाही. कुफ्र करणाऱ्या दुसऱ्या लोकांना या अधिकाराचा लाभ घेण्याची संधी सदैव शिल्लक ठेवली गेली.

# शिर्क आणि मुशरिक (अश्रध्दावंत)

'शिर्क'चा शाब्दिक अर्थ 'भागीदारी' आहे. 'शरअ'च्या (मुस्लिम धर्मशास्त्राच्या) परिभाषेत 'शिर्क'चा अर्थ असा आहे- अल्लाहशिवाय इतर कोणाला अल्लाहच्या अस्तित्वात किंवा त्यांच्या गुणात किंवा या गुणांच्या निकडीत सामील ठरविणे.

**१)** अल्लाहच्या व्यक्तित्वात सामील ठरविण्याची काही रूपे अशी आहेत.

**अ)** अल्लाहच्या अस्तित्वाला अन्य एखाद्याचे अस्तित्व किंवा अन्य एखाद्याचे अस्तित्व अल्लाहचे अस्तित्व ठरविणे म्हणजे अल्लाहशी एकरूपता किंवा त्याच्यात मिसळण्याची श्रद्धा ठेवणे.

**ब)** एखाद्याला त्याच्या भाऊकीचा समजणे. (अल्लाहचा भागीदार समजणे.)

**क)** एखाद्याला त्याचा बाप किंवा मुलगा ठरविणे.

**२)** अल्लाहच्या गुणात सामील ठरविण्याचा अर्थ असा आहे की त्या गुणापैकी एखादा गुण अन्य एखाद्या व्यक्तित्वात असल्याचे मानणे आणि त्याच विशिष्ट अर्थात असल्याचे मानणे ज्या अर्थात तो अल्लाहमध्ये आढळतो.

**३)** गुणांच्या निकडीत सामील ठरविण्याचा अर्थ आहे की त्या गुणांच्या स्वाभाविक परिणामात, जे अधिकार व हक्क अल्लाहसाठी सिद्ध होतात त्यांच्यापैकी एखाद्या अधिकाराचा किंवा हक्काचा, अन्य एखाद्याला सुद्धा स्वामी मानणे. उदाहरणार्थ, अल्लाहचा एक गुण असा आहे की आज्ञा करण्याचा व निर्णय देण्याचा पूर्ण अधिकार त्यालाच आहे. या गुणाची एक आवश्यक निकड तर अशी आहे की भाग्य बनविण्याचा, बिघडविण्याचा अधिकार त्याच्याच हातात आहे. दुसरे असे की विनंत्या, प्रार्थना व मागण्या त्याच्यापुढे प्रस्तुत केल्या जाव्यात हा अधिकार त्याला प्राप्त आहे. आता जर एखादा मनुष्य संकट आल्यास अन्य एखाद्याचा धावा करीत असेल किंवा आपला एखादा उद्देश प्राप्त करण्यासाठी आपल्या विनंत्या अन्य कोणासमोर प्रस्तुत करीत असेल तर त्याला अल्लाहच्या एका विशेष गुणात सामील करणे ठरेल.

जो मनुष्य अशा प्रकारच्या श्रद्धा ठेवत असेल, म्हणजे अल्लाहच्या व्यक्तित्वात किंवा त्याच्या गुणात किंवा या गुणांच्या निकडीत एखाद्या अल्लाह नसलेल्या व्यक्तित्वाला सामील व भागीदार ठरवीत असेल तर कुरआनच्या भाषेत त्याला 'मुशरिक' म्हटले जाते.

'शिर्क'ला कुरआनने 'मोठा अत्याचार' म्हणजे अल्लाहचे सर्वांत मोठे अधिकारहरण ठरविले आहे आणि म्हटले आहे- *'त्याला क्षमा कदापि मिळणार नाही.'*

# अहले किताब (ग्रंथधारक)

'अहले किताब'चा शाब्दिक अर्थ 'ग्रंथधारक' आहे. परंतु कुरआनच्या परिभाषेत ज्याप्रमाणे 'किताब' चा एक विशिष्ट व सीमित अर्थ ठरविला आहे आणि त्याचा अर्थ केवळ अल्लाहकडून अवतरलेला ग्रंथ आहे निव्वळ ग्रंथ नव्हे. त्याचप्रमाणे 'अहले किताब'चादेखील एक विशेष व ठराविक अर्थ आहे आणि त्याचा अर्थ केवळ यहूदी (ज्यू) व ईसाई (ख्रिश्चन) होय. सर्वच धार्मिक ग्रंथांना मानणाऱ्या जाती व जमाती नव्हे. हे खरे आहे की जेव्हा 'किताब'चा अर्थ अल्लाहचा ग्रंथ आहे तर 'अहले किताब'चा अर्थसुद्धा अल्लाहच्या ग्रंथाला मानणारे होईल आणि तो काही विशेष ग्रंथांना माननाऱ्यांपर्यंत सीमित न राहता अल्लाहच्या सर्वच ग्रंथांना मानणाऱ्यांपर्यंत व्यापक असला पाहिजे व त्यांना लागू झाला पाहिजे. परंतु जेथे ही गोष्ट खरी आहे तेथे हेदेखील एक मान्य सत्य आहे की सध्या जगात जितके धार्मिक ग्रंथ आढळतात, त्यांच्यापैकी केवळ तीनच ग्रंथ असे आहेत जे अल्लाहचे ग्रंथ असल्याबद्दल कुरआनने पुष्टी केलेली आहे. ते म्हणजे (१) तौरात, (२) इन्जील व (३) जबूर. म्हणून जेव्हा तो 'अहले किताब' या शब्दाचा प्रयोग करतो तेव्हा त्याचा अर्थ स्वाभाविकपणे केवळ याच तीन ग्रंथांना मानणाऱ्या लोकांपर्यंत सीमित होईल.

तौरातच्या नावावर अस्तित्वात आसलेला समुदाय 'यहूदी' (ज्यू) आहे. आणि इन्जीलद्वारे जाहीर होणारा समुदाय 'ईसाई' (ख्रिश्चन) आहे. उरला जबूर तर त्याच्या आधारे कोणताही वेगळा समुदाय अस्तित्वात आला नाही. कारण हा काही एखादा स्थायी ग्रंथ नाही आणि तो केवळ तौरातच्या परिशिष्ठासारखा आहे जो प्रसिद्ध इस्त्राईली प्रेषित दाऊद (अ.) यांच्यावर उतरला होता आणि ज्याला यहूदी व ईसाई लोक मानतात.

या तिन्ही ग्रंथांव्यतिरिक्त ज्या बाकीच्या ग्रंथांना अल्लाहचे ग्रंथ म्हणून मानले जात आहे. त्यांचा उल्लेख ज्याअर्थी कुरआनमध्ये नाही त्या अर्थी त्यांचे प्रमाण व पुष्टीच्या आधारे त्यांच्यापैकी कोणालाही अल्लाहचा ग्रंथ आणि त्याला मानणाऱ्यांना 'अहले किताब' म्हटले जाणे शक्य नाही. तथापि अनुमानाची कवाडे अवश्य खुली आहेत. पण हे स्पष्ट आहे की अनुमान बरोबरही असू शकतो आणि चुकीचादेखील. म्हणून त्याला कुरआनची स्वीकृती व पुष्टी असलेला कोणत्याही प्रकारे ठरविले जाऊ शकत नाही. वास्तविकत: येथे चर्चा कुरआनच्या एका परिभाषेच्या अर्थ व उद्देशाची, दुसऱ्या शब्दांत कुरआनच्या स्वीकृती व पुष्टीचीच आहे.

तात्पर्य असा की 'अहले किताब' हा पारिभाषिक शब्द यहूदी व ईसाईकरिता आहे व एखाद्या तिसऱ्या गटाला त्याच्या क्षेत्रात दाखल केले जाऊ शकत नाही.

**- ० - समाप्त - ० -**